संगममाला-१ भेट तिसरी

# मराठी ग्रंथालयांचा इतिहास




संपादक :

**ल. वा. पडोळे**

प्रस्तावना :

**डॉ. पु. म. जोशी,** एम्. ए., पीएच. डी. (लंडन)
डिरेक्टर ऑफ आर्काइव्हज, मुंबई सरकार






रामनवमी शके १८७३ १५ एप्रिल १९५१

महाराष्ट्र ग्रंथालय संघ पुरस्कृत ग्रंथमाला—क्रम २

# मराठी ग्रंथालयांचा इतिहास

श्री

# ' महाराष्ट्र ग्रंथालय संघा 'चा पुरस्कार

महाराष्ट्रांतील—अखंड महाराष्ट्रांतील—ग्रंथालय चळवळीची पूजा बांधण्याच्या आकांक्षेने पूजा प्रकाशनाने मराठी-भाषिकांसाठी सिद्ध केलेल्या ' मराठी ग्रंथालयांचा इतिहास ' या लेखसंग्रहाचा हार्दिक पुरस्कार करतांना ' महाराष्ट्र ग्रंथालय संघा ' ला आनंद वाटणें अगदी साहजिक आहे. अनेक दृष्टींनी स्वयंसिद्ध असणाऱ्या श्री. पडोळे यांच्यासारख्या प्रकाशकाने संघाचा पुरस्कार आदरावा यामध्ये त्यांची अखंड महाराष्ट्राची संघ-संघटना प्रबळ व प्रभावी करण्याची सर्वस्वी निरपेक्ष अशी सद्बुद्धिच दिसून येते. अशा सह-कार्यानेच आपण आपली सर्व प्रकारची उन्नति करून घेणार आहोत.

प्रस्तुत संग्रह अनेक लेखक-अभ्यासकांच्या भिन्न भिन्न पातळी-वरील तज्ज्ञतेचा, अनुभवाचा आणि लेखनगुणाचा परिपाक आहे. आणि सहजच त्याला इंग्रजींतील ' रायटर्स ॲण्ड् आर्टिस्ट्स् इयर बुक ', ' ऑथर्स हॅण्डबुक ' किंवा तत्सम संदर्भसंग्रहाचें स्वरूप आलेलें आहे. मराठींतील पूर्वीच प्रसिद्ध झालेल्या ' प्राचीन व अर्वाचीन ग्रंथालयें ' ( कानडे ), ' पंचारती ' ( मराठी ग्रंथालय संघ ), ' ग्रंथ आणि ग्रंथालयें ' ( पुणें ग्रं. संघ ) अशा पुस्तकांचा उद्देश कांहीसा असाच होता. परंतु प्रस्तुत पुस्तकास साक्षेपाने जोडलेले संस्थापरिचय, ज्ञानार्थे ग्रंथमंदिरम्, ग्रंथप्रकाशक व ग्रंथविक्रेते यांची नामावळी वगैरे विभाग वारंवार तपासून अद्ययावत् केले पाहिजेत असें असल्यामुळे अशल्या प्रकारच्या अधूनमधूनच्या प्रकाशनाच्या किंवा नियमितपणे प्रसिद्ध होणाऱ्या एखाद्या ' ग्रंथालय वार्षिका 'च्या द्वारा तें काम साधणें केव्हाहि अवश्यच समजलें जाईल.

या लेखसंग्रहांत वस्तुस्थितीबद्दल असमाधान, भावी सुस्थिती-संबंधी आकांक्षा आणि ती सुस्थिति आणण्यासाठी अवश्य गोष्टींबद्दल सूचक कल्पना मांडलेल्या आढळतात. यांची पूर्तता करण्यासाठी म्हणें हाच खरोखर 'महाराष्ट्र ग्रंथालय संघा'चा निरपवाद उद्देश आहे. त्यांपैकी ग्रंथालयविषयक प्रश्नांची चर्चा करणारें 'साहित्य सहकार' हें नियतकालिक (मासिक) आणि ग्रंथपालन शास्त्राचा मातृभाषेंत चालविलेला (पुणें व नंतर मुंबई) प्राथमिक वर्ग ह्या गोष्टी आज अस्तित्वांत आलेल्या आहेत. प्रकाशनाचें कामहि यथा-काल होईल. संकल्पित आहे. संघाने गेल्या (मुंबईच्या) महाराष्ट्र ग्रंथालय परिषदेच्या वेळींच श्री. वाकनीस यांचें 'ग्रंथसंस्कार' हें उपयुक्त पुस्तक पुरस्कृत करून पुरस्कारकार्याची प्रथा सुरू केली. त्यानंतर सहाच महिन्यांत आपलें सुंदर प्रकाशनापत्य संघाला सालंकृत दत्तक देऊन श्री. पडोळे यांनी संघाचें फार मोठें कार्य केलें आहे.

अशा प्रकारचीं संकलनात्मक कार्यें यशस्वी होण्याकरिता आवश्यक असणाऱ्या कित्येक गोष्टींमध्ये सर्वसाधारण जनतेची आणि कार्यकर्त्यांची आस्था प्रमुख होय. तिच्या मर्यादा आता अनुभवाने लक्षांत आल्या आहेत. तेव्हा यापुढे ज्यांना ज्यांना म्हणून ह्या कामाचें महत्त्व पटेल त्यांनी त्यांनी जरूर ते कष्ट भोगून प्रत्यक्ष संशोधनाचाच मुहूर्त करणें अवश्य आहे. 'महाराष्ट्र ग्रंथालय संघा'चा अवतार अशा सर्व प्रयत्नांना यथाशक्ति परंतु मुक्तहस्ताने सर्व प्रकारचें साह्य देण्याकरिताच आहे.

प्रस्तुत इष्टपूजासमर्पणाने ग्रंथालयदेवता पुष्ट आणि संतुष्ट होवो.

पुणें<br>१३।६।५१

**दि. वि. काळे**<br>कार्याध्यक्ष, महाराष्ट्र ग्रंथालय संघ

अमृतालाहि पैजेंत मागे टाकणाऱ्या
मराठी मायबोलीचा आद्य ग्रंथकार

**मुकुंदराज**

आणि गीर्वाण वाणींतील
ज्ञानरूपी अमृताची अमोल देणगी
मराठीला देणारा
मराठींतील पहिला कवि

**संत ज्ञानेश्वर**

यांना सादर अर्पण

UNIVERSITY BUILDINGS
DELHI 8
Date : 31 March 1951

Dr. S. R. Ranganathan, M. A, D. Litt., L. T. F. L. A.,
President, Indian Library Association,
and Professor of Library Science.

I have learnt with pleasure that Shri L. V. Padole of Puja Prakashan is bringing out a brochure on the libraries of Maharashtra. When the State of Brihan-Maharashtra is established, there is no doubt that it will be one of the most cultured constituent States of Bharatavarsha. I find that the proposed brochure covers Brihan-Maharashtra in anticipation of its formation.

While I am equally interested in the library development of every part of Bharatavarsha, the promotion of this book on the libraries of Maharashtra has particular value to me. That is because Maharashtra has got the greatest concentration of the librarians that have had training with me during the last quarter of a century.

I know that there are competent, enthusiastic, industrious librarians in the Maratta country. If they work together placing public good above all narrow personal ends, if they think alike without developing centrifugal tendencies, and if they all work hard with courage, unqualified respect for truth, and sincere determination to serve the country, Maharashtra will surely become an ornament in the library personality of Baratavarsha.

(sd.) *S. R. Ranganathan*

युनिव्हर्सिटी बिल्डिंग्ज, दिल्ली, ८
ता. ३१ मार्च १९५१

डॉ. एस. आर. रंगनाथन्, एम्.ए., डी.लिट., एल्.टी., एफ्.एल्.ए. (लंडन)
अध्यक्ष, भारतीय ग्रंथालय संघ
व प्राध्यापक, ग्रंथालय शास्त्र, विश्वविद्यालय दिल्ली.

'पूजा प्रकाशना'चे श्री. ल. वा. पडोळे हे महाराष्ट्रांतील ग्रंथालयांसंबंधी एका पुस्तकाचें आयोजन करीत आहेत हें कळून मला फार आनंद झाला. जेव्हा बृहन्महाराष्ट्राचे राज्य अस्तित्वांत येईल तेव्हां भारतवर्षाच्या सर्व घटनात्मक राज्यांमध्ये तें एक अत्यंत पुढारलेलें व सुसंस्कृत राज्य ठरेल यांत शंका नाही. बृहन्महाराष्ट्राचें एक वेगळें राज्य स्थापित होईल या अपेक्षेने या पुस्तकांत बृहन्महाराष्ट्रांतील सर्व ग्रंथालयांचा अंतर्भाव करण्यांत आला असावा असें दिसतें.

भारतवर्षाच्या सर्व विभागांमधील ग्रंथालयांच्या प्रगतिबद्दल मी समप्रमाणांतच उत्सुक असलों तरी 'मराठी ग्रंथालयांच्या' ह्या इतिहासाला मी जरा विशिष्ट महत्त्व देतों. याचें कारण असें की, गेल्या पावशतकांत माझ्या जवळून जेवढे ग्रंथपाल शिक्षण घेऊन गेले आहेत त्यांपैकी बहुतेक सर्व महाराष्ट्रांतच एकत्रित झालेले आहेत.

मला याची जाणीव आहे की, महाराष्ट्रांत उत्साही, उद्योगी व स्पर्धाळु असे ग्रंथपाल आहेत. सर्व संकुचित व्यक्तिगत किरकोळ फायद्यांचा लोभ सोडून जनहितैषी बुद्धीने जर त्यांनी एकत्र येऊन काम केलें आणि फुटीरवृत्तीची वाढ न होऊं देतां सर्वांनी एकाच विचाराने, धैर्य व सत्याविषयीं नितांत आदर आणि देशसेवेची दुर्दम्य इच्छा यांनी प्रेरित होऊन जर नेटाने काम सुरू केलें तर भारतवर्षाच्या ग्रंथालयरूपी शरीरावर महाराष्ट्र एखाद्या पैलूदार दागिन्याप्रमाणे शोभूं लागेल यांत मला संदेह नाही.

(सही) **एस. आर. रंगनाथन्**

पंतप्रधान
मुंबई सरकार
ता. १२-४-१९५१

"ग्रंथालयाचें सामाजिक महत्त्व फार थोर आहे या बाबत आता दुमत असणें शक्य नाही. 'शहाणे करून सोडावे सकळ जन' या भूमिकेवरूनच ग्रंथालयांचें कार्य होत असतें. पण ग्रंथालयाशीं निगडित ज्या अनेक बाबी आहेत त्यांच्या इतिहासाची वास्तव कल्पना करून देण्यास अशा ग्रंथाची जरूर होती. महाराष्ट्रांतील ग्रंथालयांची स्थापना, महाराष्ट्रांत छापण्याच्या कलेची सुरवात, त्याचप्रमाणे ग्रंथालय प्रवृत्ति, वगैरेंचा उद्गम व विकास इत्यादि विषयांची माहिती महाराष्ट्रांतील ग्रंथपालांना असली तरी सामान्य वाचकांना ती उपलब्ध असली पाहिजे. कोणत्याही संस्थेच्या वा राष्ट्राच्या पूर्वेतिहासामुळेच तिचें भवितव्य ठरविण्यास मदत होते व स्फूर्ति मिळते. प्रकाशकांचा उपक्रम स्तुत्य आहे व त्याचें चीज महाराष्ट्र करील अशी आशा आहे."

(सही) **बा. गं. खेर**

# अनुक्रमणिका

# ग्रंथालयांची ऐतिहासिक पार्श्वभूमि

ग्रंथालय शास्त्राच्या अभ्यासांत ग्रंथालयांच्या इतिहासाचा अभ्यास हा एक महत्त्वाचा भाग आहे. हा इतिहास केवळ अभ्यासूंनाच उपयोगाचा नसून सामान्य वाचकाला पण अनेकविध, मनोरंजक व उद्बोधक माहिती देणारा असा आहे. या समजुतीनेच या प्रस्तावनेंत ग्रंथालयांची ऐतिहासिक परंपरा व एतद्विषयक कांही गोष्टींची माहिती देण्याचें मी योजिलें आहे. या पुस्तकास " मार्मिक व महत्त्वपूर्ण प्रस्तावना " लिहिली जाणार आहे असा बभ्रा प्रकाशकांनी अगोदरच करून ठेवल्यामुळे माझ्यासारखा लेखनभीरु प्रस्तावनाकार जरासा गोंधळून गेल्यास नवल नाही. तेव्हा हा प्रस्तावाचा प्रयत्न वाचकांना आवडो व प्रकाशकांनी लावलेल्या कसास तो उतरो अशी नांदी करूनच पुढच्या लिखाणाला लागतों.

जगांतील प्राचीन संस्कृतींचे देश म्हणजे इजिप्त, सुमेरिया–बॅबिलोनिया, चीन, भारत आणि आजच्या इजिप्त व इराक यांच्या दरम्यान असलेलीं फिनीशिया वगैरे राष्ट्रें. यांच्यापैकी आपल्या भारतांत लेखनकलेचा आविष्कार फारच उशिराने झाला. ऋग्वेदांतील कांही उल्लेखांवरून लेखनकला भारतांतील प्राचीन आर्यांना ज्ञात होती हें उघड आहे. पण ती नित्याच्याच काय पण महत्त्वाच्या व्यवहारांकरितासुद्धा वापरण्यांत येत नव्हती असें दिसतें. शिवाय ऋग्वेदाचा कांही भाग प्राचीन आर्यकुलें भारतांत येण्याच्या आधीचा आहे असा अनेक विद्वानांचा कयास आहे. आणि वेदांच्या ऋचा व इतर ग्रंथाचें जतन ते ही सर्व विद्या मुखोद्गत करूनच करीत असत. या

अशा परिस्थितींत ग्रंथ प्रसिद्ध करण्याची पद्धत पण या मुखोद्गत विद्येस अनुरूप अशीच होती. यज्ञयागाच्या समयीं जेव्हा राजांचा व ऋषींचा मेळावा या समारंभाकरिता एकत्र येत असे त्या वेळीं अभिरसभूयिष्टा अशा या परिषदेपुढे ऋषी आपली ग्रंथरचना पढत असत व तिच्यावर अनेक वादविवाद होऊन तिला या विद्वत्परिषदेची पसंती मिळत असे. शिवाय वसिष्ठ, विश्वामित्र, व्यास, कण्व इत्यादि ऋषींच्या आश्रमांतून वेदांचें अध्ययन चालू असे व या अध्ययनांमून अनेक वेदवेदांगांवर वादविवाद होऊन विद्वानांना आपापली विचार-सरणी मांडण्यास अवसर मिळत असे. उपनिषदें, ब्राम्हणें, आरण्यकें याची प्रसिद्धि अशा तऱ्हेनेच झाली व प्राचीन भारतांतील ग्रंथ प्रसिद्ध करण्याची पद्धत हीच होय.

अविभाज्य भारताची सर्वांत प्राचीन जी मोहन जो–दरो संस्कृति तिच्या अवशेषांत लिखाण सापडतें असा अनेक विद्वानांचा दावा आहे. पण जोंपर्यंत ही मोहन जो–दरो लिपि वाचतां येत नाही तोपर्यंत या कोडयाचा उलगडा होणें कठिण. कदाचित ती लिपीही नसेल अशी शंका कांही दुसऱ्या विद्वानांनी घेतलेली आहे. माझ्या मतें या कोडयाचा उलगडा जुन्या सुमेरियन किंवा तत्सम संस्कृतीच्या अवशेषांत सापडावा; कारण इजिप्तमध्ये अलेक्झँड्रिया जवळ सापडलेला "रोझेटा स्टोन" किंवा इराणमध्ये बेहिस्तुन येथे असलेला "दरायस धी ग्रेट" यांचा शिलालेख यांच्या त्रिभाषिक लिखाणामुळेच प्राचीन ईजिप्तच्या "हायरोग्लिफिक" व सुमेरिया–बॅबिलोनिया, असीरिया या देशांत जारी असलेल्या "क्यूनेइफॉर्म" लिप्यांचा उलगडा झाला, आणि तोही इ. स. १८०० नंतर म्हणजे फक्त या दीडशें वर्षांच्या अवधींत. प्राचीन भारत व सुमेरिया या देशांचें व्यापारी व सांस्कृतिक दळणवळण होतें ही गोष्ट मान्य आहे,

व म्हणूनच सुमेरियन संस्कृतीच्या अवशेषांत आज ज्ञात असलेली सुमेरियन लिपि व अगम्य अशी मोहन जो-दरोची लिपि या दोन्ही लिप्यांमध्ये लिहिलेला असा लेख सापडणें शक्य आहे. असें जर सुदैवाने झालें तर प्राचीन भारतांतील मोहन जो-दरो संस्कृतीची लिपि व भाषा याबाबत ठाम माहिती आपल्यास मिळूं शकेल. हें होईपर्यंत तरी मोहन जो-दरोच्या लिपि किंवा भाषेविषयी लिखाण म्हणजे हवेंतील वावडया होत असें मला वाटतें.

आता ज्ञात किंवा अभ्यास करून समजतां येईल अशी लेखनकला प्रथम सुरू कोठे झाली हा प्रश्न सहाजिकच निघतो. आज उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून असें दिसून येतें की प्राचीन सुमेरिया व इजिप्त या देशांत या कलेचा प्रथम आविष्कार झालेला आहे. दोन्ही देशांत अगदी पहिलें लिखाण चित्रलिपींतच होत असे; पण इजिप्त देशांत तें दगडावर कोरीत असत, तर सुमेरियांत तें मातीच्या लहान लहान विटांवर करण्यात येत असे. विद्वानांचा तर्क असा आहे की हे सुमेरियन लोक बाहेरून येऊन प्राचीन सुमेरियांत स्थाईक झाले व येतांना बरोबर ते आपली लिहिण्याची कला घेऊन आले. ते सुमेरियांत कोठून आले याचा नीटसा सुगावा अजून लागलेला नाही. पण त्यांची पहिली वस्ती एखाद्या डोंगराळ प्रदेशांत, पश्चिम इराण मध्ये कोठे तरी असावी व या ठिकाणीं ते दगडावर चित्रलिपींत कोरून लिहीत असावेत. सुमेरिया या त्यांच्या नव्या देशांत दगड किंवा खडकाचा तर मागमूसही नाही. कारण हा देश तैग्रिस-यूफ्राटिस यांच्या आजूबाजूचा व अंतर्वेदींतील असल्याकारणाने तो अगदी सपाट व फक्त माती असलेला, डोंगर किंवा टेकडया नसलेला, असा होता व आजही तो प्रदेश, म्हणजे आजचा इराक देश, तसाच आहे. तेव्हा या सुमेरियन लोकांनी लिहिण्याकरितां या मातीचाच उपयोग

करण्याचें ठरविलें. मातीच्या लहान लहान विटा करून त्याच्यावरच ते आपल्या देवतांच्या प्रार्थना व इतर मजकुराचें चित्रण करूं लागले. अर्थातच फत्तरावर खोदण्याचीं पूर्वीचीं आयुधें सोडून त्यांना नव्या तऱ्हेचा चित्रग अथवा लेखनसामग्रीचा अवलंब करावा लागला. सुमेरियन लोकांनी वापरलेली लेखणी हीच जगांतील पहिली लेखणी. या लेखणीच्या टोकाने ते मातीच्या मऊ विटांवर चित्रें लिहीत. पण हें चित्रणाचें काम कांही खडकांवरील चित्रणासारखें नीट होईना. म्हणून मग त्यांनी या चित्रलिखाणालाच कलाटणी देऊन "क्यूनेई-फार्म" ही नवी पद्धत उपयोगात आणली. या संधिकालच्या लिहि-लेल्या विटा आज उपलब्ध आहेत व त्यांचा काल खिस्तपूर्व सुमारें तीन हजार वर्षांचा आहे. म्हणजे पृथ्वीवरील पहिलें लिखाण साधारण पांच हजार वर्षांपूर्वी झालें.

इजिप्तमधील पहिल्या लिखाणाचा काळ याच्या आसपासचाच. नाईल नदीच्या आजूबाजूचा प्रदेश कोरण्यास युक्त अशा दगडांनी समृद्ध असल्याकारणाने प्राचीन मिसरी लोकांनी यांचा चांगलाच उपयोग केला व पांच हजार वर्षांपूर्वी त्यांनी लिहून ठेविलेल्या वंशावळी व ऐतिहा-सिक उल्लेख आजसुद्धा आपणास पहावयास मिळतात. या मिसर देशां-तील पिरामिडांमधूनहि अनेक लेख सापडलेले आहेत. पण याच सुमारास हे लोक कागदासारख्या दुसऱ्या एका माध्यमाचा लिहिण्याकरतां उप-योग करूं लागले. यालाच नंतर ग्रीक लोकांनी 'पॅपिरस' हें नांव दिलें. यावरूनच पुढे इंग्रजींतील पेपर हा शब्द आला. नाईल नदीच्या तीरावर वाढणाऱ्या एका उसासारख्या मोठ्या लव्हाळयांतील गरापासून पॅपिरस तयार करीत असत. या गराच्या पट्ट्या चिकटवून लेखकाला पाहिजे त्या लांबीरुंदीचा पॅपिरस तयार करीत व त्यावर लिहून काढलें म्हणजे त्याची गुंडोळी करून ती मातीच्या रांजणांत सुरक्षित रहावी म्हणून ठेवीत

असत. अर्थात सुमेरियन लोकांप्रमाणे इजिप्शियन लोकांनाही नव्या तऱ्हेच्या लेखणीचा अवलंब करावा लागला. लेखणीने भराभर चित्रें काढण्यास अवघड पडूं लागलें म्हणून यांनीही आपल्या चित्रलिपीला मोड घालून ती पॅपिरसवर लिहितां येईल अशा तऱ्हेचें सुटसुटीत रूप तिला दिलें. या लिपीला हायरॅटिक असें म्हणतात. पण पॅपिरस जरी उपयोगांत आला तरी इजिप्शियन लोकांनी फत्तरावर हायरोग्लिफ्स खोदण्याची सवय मात्र सोडून दिली नाही. व ही पद्धत ग्रीक व रोमन अंमल इजिप्तमध्ये जारी झाल्यानंतरहि चालू राहिली.

चीनची लेखनकला सुमेरिया किंवा प्राचीन इजिप्त यांच्या लिखाणाइतकी जुनी नाही. खिस्तपूर्व ११ व्या किंवा १२ व्या शतकांत लिहिण्याचा उगम चीनमध्ये झाला असावा. पण या देशाने आघाडी मारली ती कागद शोधून काढण्यांत. जगांतील पहिला कागद चीन देशांत इ. स. १०५ च्या सुमारास तयार झाला व त्यानंतर कित्येक शतकांनी त्याचा फैलाव इतर देशांत झाला. कागद करण्याची कला चिनी लोकांपासून प्रथम अरब लोक शिकले व त्यांनीच या कलेचें ज्ञान युरोपांत नेलें. कागदाचा प्रसार होण्याच्या पूर्वी मध्ययुगीन युरोपांत कमावलेल्या चामड्यावर लिहीत असत व त्याला व्हेलम् किंवा पार्चमेंट म्हणत. व्हेलम् हें वासराच्या चामड्यापासून व पार्चमेंट हें मेंढ्यांच्या चामड्यापासून तयार करीत. छापण्याच्या कलेचा उद्गम झाल्यानंतर मात्र ही परिस्थिति बदलली व कागदाचा सर्रास उपयोग होऊं लागला.

चामड्यावर लिहिण्याची पद्धत प्राचीन इजिप्तमध्ये क्वचित् वापरण्यांत येत असे. पण लिहिण्याकरितां चामडें वापरण्याचा प्रघात अलेक्झँडरच्या मृत्यूनंतर त्याच्या साम्राज्यांत ज्या ग्रीक राजवटी सुरू

झाल्या त्यांनीच मोठ्या प्रमाणांत सुरू केला व उत्तम व्हेलम् व पार्चमेंट तयार करण्याच्या उद्योगास त्यांनी हरतऱ्हेने उत्तेजन दिलें. फक्त इजिप्तचे ग्रीक राजे टॉलेमी यांनी मात्र पूर्वापार पॅपिरस वापरण्यावरच भर दिला. इतकेंच नव्हे तर आपल्या राज्यांतून एशिया मायनरमधील ग्रीक राज्यांकडे होणाऱ्या पॅपिरसच्या निर्यातीवर कडक निर्बंध घातले. अर्थातच "गरज ही शोधाची आई" या इंग्रजी म्हणीप्रमाणे या आशिया मायनरमधील ग्रीक लोकांनी लिहिण्याकरितां चामडें तयार करण्याच्या उद्योगाला चालना देऊन त्याची जोपासना केली. खुद्द ग्रीस देशांतही पार्चमेंट व व्हेलम् यांचा उपयोग केला जात असे. या अनुषंगाने प्राचीन ग्रीस देशांतील एका चालीचा उल्लेख गंमतीदार वाटेल म्हणून देतों. प्राचीन ग्रीस देशांत शहराशहरांचीं निरनिराळीं गणराज्यें असत व त्यांच्या सभांतून अनेक वेळा मतदानाचे प्रसंग येत. अशा कांही प्रसंगीं मतांची लेखी नोंद करावी लागत असे. विशेषतः एखाद्या मोठ्या माणसाबद्दल निंदाव्यंजक ठराव असेल तर जे त्या ठरावास अनुकूल मत देणारे असतील त्यांना या व्यक्तीचें नांव एका चिठ्ठीवर लिहून गणकांच्या स्वाधीन करावें लागे. अशा चिठ्ठ्या खापराच्या तुकड्यांच्या म्हणजे फुटक्या घागरी, मोडलेले खुजे यांच्या असत व त्यांना "ऑस्ट्राका" असें म्हणत. यावरूनच "वाळीत टाकणें" याला जो इंग्रजी शब्द "ऑस्ट्रसाईझ" तो आलेला आहे. असो.

सुमेरिया किंवा प्राचीन इजिप्त वा चीन यांच्या लेखनपद्धतींत मुळाक्षरें नसत, तर प्रथम वस्तू व नंतर कल्पना यांचें चित्रीकरण होत असे. मुळाक्षरांनी लिहिण्यास सुरवात प्रथम इसवी सन पूर्व १४०० च्या सुमारास झाली असावी असें अनुमान उगारिट अथवा रास-शम्रा या पॅलेस्टाईनमधील प्राचीन शहरांच्या हल्ली

झालेल्या उत्खननावरून काढतां येतें. या देशांतील लोक हल्लीच्या अरबांचे पूर्वज होत ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. यांच्या संस्कृतीचा संघर्ष उत्तरेकडील हिटाइट व मितन्नि या आर्य संस्कृतींशीं झाला. तेव्हा मूळाक्षरांची कल्पना कोणी कोणाकडून घेतली हें समजणें जरा कठीणच आहे. दुसरी ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे हे मितन्नि लोक इंद्र, वरुण, नासत्य या वैदिक देवतांना भजणारे होते. भारतीय आर्यांनी आपली लेखनकला आपल्याच एखाद्या सजातीय आर्य कुळापासून घेतलेली असणें संभवनीय आहे. पण या विषयाचा अधिक उहापोह करण्याइतका माझा अभ्यास नाही व माझी विद्वत्ताहि नाही.

आपल्या पूर्वजांना लेखनकला अवगत होती हें मी मागे सांगितलें आहेच. परंतु प्राचीन काळीं वेदवेदांगें किंवा इतर ग्रंथ लिहून ठेवण्यास त्यांनी ती उपयोगांत आणली नाही हें खरें. पाणिनी लिपि, लिपिकार हे शब्द देतो व अलेक्झँडरच्या वेळेला आलेल्या नियार्कस या लेखकाने हिंदुस्थानांतील लोक लिहिण्याकरितां कागदाचा उपयोग करीत असाही उल्लेख केलेला आहे; परंतु तो केवळ अपवादात्मकच असावा असें वाटतें. कारण या काळीं बुद्धांचीं जीं धर्मपुस्तकें लिहीलीं गेलीं तीं लाकडाच्या फळ्यावर, ताडपत्रावर, भूर्जपत्रावर किंवा प्रसंगविशेषीं ताम्रपटावर लिहीत असत. अर्थशास्त्रांत कागद, भूर्जपत्र, तालपत्र यांचा उपयोग कोणकोणत्या कार्यांकरितां करावा याचा उल्लेख आहे. शिवाय " सौवर्णी लेखनी कार्या रौप्यं च मषिभाजनम् " व " दीपज्वाला समुद्गूत कज्जलेन मषीभवेत् " हे लेखनसामग्रीविषयी जुने उल्लेखही सापडतात. भूर्जपत्र, तालपत्रावरील लिहिलेली ही प्राचीन ज्ञानसंपत्ति अर्थात काळाच्या विशाल उदरांत गडप झालेली आहे. पण वेद मात्र लिहिले गेले नव्हते. इ. स. ६७१

च्या सुमारास इत्सिंग नांवाचा चिनी प्रवासी हिंदुस्थानांत यात्रेसाठी व शिकण्यासाठी आला होता. त्याने आपल्या प्रवासवर्णनांत लिहून ठेवलें आहे की वेद तोंडींच शिकविले जातात व कागदावर किंवा तालपत्रावर लिहीत नाहीत. इत्सिंगला अनेक ग्रंथांच्या नकला करून घ्यावयाच्या होत्या, पण त्याकरतां त्याला कागद मिळेना. शेवटीं या कामाकरिता लागणारा कागद त्याला चीनमधून आणवावा लागला.

इसवी सनाच्या ११ व्या शतकापासूनची अनेक हस्तलिखितें आज उपलब्ध आहेत; हीं अर्थातच तालपत्रावर लिहिलेलीं आहेत. पण काश्मीरमध्ये इ. स. १०८९ सालीं नकललेलें शतपथ ब्राम्हणाचें एक कागदी हस्तलिखितहि कांही वर्षांपूर्वी उजेडांत आलें. हाच आपणास माहीत असलेला असा हिंदुस्थानांत कागदावरील पहिला लेख होय. तालपत्रांचें लेखन व त्यांचा संग्रह जैनधर्मीयांनी फार कसोशीने केला, याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच. आचार्य हेमचंद्रांची गाढ विद्वत्ता व कुमारपाल याने ग्रंथलेखनास दिलेलें उत्तेजन या संयोगामुळे सर्व गुजराथभर तालपत्रावर पुस्तकें लिहिण्याची चढाओढच सुरू झाली. जैन धर्मात ग्रंथलेखन व ग्रंथजतन यांना फार महत्त्व दिलें गेलें असल्यामुळे या धर्माचा पगडा गुजराथेवर बसल्यानंतर ग्रंथविषयक या दोन्ही गोष्टींकडे लोकांचें अर्थातच फार लक्ष गेलें. जैन मुनी आपल्या परिभ्रमणांत याबाबत प्रचार करीत असत. या कारणाने अनेक जैन धर्मविषयक व इतर ग्रंथ गुजराथेंत तयार झाले व नकलले गेले. यामुळे ग्रंथलेखकांचा दर्जा वाढला. त्यांचें काम बहुधा नुसतें जुना ग्रंथ नकलण्याचें असे. पण मुळाबरहुकूम नकल करण्यासही लेखक चांगला विद्वान् असावा लागे. म्हणूनच लेखक कसा असावा याविषयी दंडक सापडतात.

सर्वदेशक्षराभिज्ञः सर्वभाषाविशारदः ।
लेखकः कथितो राज्ञः सर्वाधिकरणेषु वै ॥
मेधावी वाक्पटु धीरो लघुहस्तो जितेन्द्रियः ।
परशास्त्रपरिज्ञाता एष लेखक उच्यते ॥

असें अपूनमुद्रा नकललेल्या हस्तलिखितांत चुका असण्याचा संभव होताच, म्हणून शेवटीं लेखक आपली कैफियत कधी कधी सादर करतो.

आदर्श दोषात् मतिविभ्रमाद्वा यत्किंचिन्न्यूनं लिखितं मयात्र।
तत्सर्वमार्यैः परिशोधनीयं प्रायेण मुह्यंति हि ये लिखन्ति ॥

किंवा

यदक्षरपरिभ्रष्टं मात्राहीनं च यद्भवेत् ।
क्षन्तव्यं तद् बुधैः सर्वं कस्य न स्खलते मनः ॥

पण एखादा लेखक आपल्या वरची जबाबदारी अलगद मूळ ग्रंथावर टाकून मोकळा होतो.

यादृशं पुस्तकं दृष्ट्वा तादृशं लिखितं मया ।
यदि शुद्धमशुद्धं वा मम दोषो न दीयते ॥

तर दुसरा कोणी छातीठोकपणे सांगतो

परिपूर्णं पुस्तकं सावधानेन लिखितम् ।

आणि बहुतेक सर्व जण वाचकांना विनन्ति करितात की, "महाराज, हें पुस्तक लिहून काढण्यास मला फार कष्ट झाले आहेत, तरी त्याचें आपण फार काळजीपूर्वक जतन करा."

भग्नपृष्ठि कटिग्रीवा तप्तदृष्टिरधोमुखैः ।
कष्टेन लिखितं शास्त्रं यत्नेन परिपालयेत् ॥

आतापर्यंत प्राचीन लेखनकलेचा इतिहास ढोबळपणाने सांगितला. आता ग्रंथालयांच्या इतिहासाकडे वळतों.

प्राचीन लेखनकलेचा उगम सुमेरिया व इजिप्त या देशांत प्रथम झाला. अर्थातच जगांतील पहिलीं ग्रंथालयें या देशांत सापडावीं हें ओघाने आलेंच. आणि या ग्रंथालयांतील पुस्तकें विटांवर किंवा पॅपिरसच्या भेंडोळ्यांवर लिहिलेलीं असत. विटांवर ग्रंथ लिहिणाऱ्या लेखकाला एक मोठा फायदा होता. तो हा की जर प्रकाशकांनी त्याचीं हस्तलिखितें "साभार परत" पाठविलीं तर अगदीच निराश न होतां आपल्या ग्रंथांच्या पानांचें एक घर तयार करून त्यांत तो राहूं शकत असे ! अशी घटना सुमेरिया किंवा इतर राज्यांत घडली किंवा नाही याबद्दल मात्र पुरावा मजजवळ नाही !

सुमेरियन, बॅबिलोनियन, असीरियन या संस्कृति एका पाठोपाठ होऊन गेल्या. प्रत्येक संस्कृतीच्या उत्कर्षांत विद्येस प्राधान्य होतें व साधारण प्राचीन काळच्या प्रत्येक शहरांत ग्रंथालयें होतीं. सर्व विद्या ब्राह्मणांच्याच हातांत असल्याकारणाने शाळा व ग्रंथालयें साधारणतः ब्राह्मणांचें वास्तव्य असलेल्या ठिकाणींच म्हणजे देवळापाशीं असत. ग्रंथालयांना "लिहिलेल्या विटांचें घर" व ग्रंथपालाला "लिहिलेल्या विटांचा अधिपति" अशीं नांवें होतीं. देवदेवतांच्या प्रार्थना, पौराणिक ऐतिहासिक गोष्टी व दंतकथा, काव्यें, धर्मनिर्णयाबाबत ग्रंथ, गणित-विषयक पुस्तकें अशा अनेक प्रकारचे ग्रंथ या ग्रंथालयांत असत. एका ग्रंथालयांत तर शुक्राच्या चांदणीची वृद्धि व क्षय यांच्या घेतलेल्या वेधांच्या विटा सापडलेल्या आहेत; आणि यांचा काल ख्रिस्तपूर्व १७०० हा आहे ! त्याचप्रमाणे हम्मूराबी या राजाची कायद्याची स्मृति दगडावर तर खोदलेली आहेच, पण विटांवर लिहून तिच्या

प्रति अनेक ग्रंथालयांत ठेवलेल्या होत्या. जगाच्या इतिहासांत ही पहिली कायद्याची स्मृति होय.

असीरियन राजवट सुरू होईपर्यंत ग्रंथालयें हीं देवळांशींच संबंधित असत व सरकारी किंवा शहराचा दप्तरखानाहि याच ठिकाणीं असे. लहान मुलांच्या शाळा व मोठ्यांच्या अभ्यासाची जागाही हीच. कित्येक ठिकाणीं सापडलेल्या अवशेषांवरून शाळांतून पाठ्य पुस्तकें कशीं असत याची नीट कल्पना येते. असुरब निपाल या असीरियन सम्राटाने आपल्या राजवाड्याजवळ एक महाभव्य ग्रंथालय स्थापन केलें. असुरब निपाल याची कारकीर्द ख्रिस्तपूर्व सातव्या शतकांतली, म्हणजे सुमेरियन, बॅबिलोनियन संस्कृति संपुष्टांत आल्यानंतर कित्येक शतकांनंतरची. पण आपल्या ह्या शाही ग्रंथालयांत असुरब निपालने कित्येक सुमेरियन व बॅबिलोनियन भाषांतील ग्रंथ गोळा करून जतन करून ठेविले होते. आपली धार्मिक विधीची भाषा जशी संस्कृत त्याचप्रमाणे असीरियन लोकांची सुमेरियन. असुरब निपालच्या ग्रंथालयांत सुमेरियन-बॅबिलोनियन-असीरियन भाषांचे कोश, त्यांचीं व्याकरणें व या भाषांतील सर्व उपलब्ध वाङ्मय एकत्र आणलें होतें. ग्रंथालयांतील ज्ञानाचें वर्गीकरण करून त्यांचा कॅटलॉगहि तयार केलेला होता व ग्रंथालयांतून बाहेर वाचण्याकरिता जाणाऱ्या पुस्तकांची नोंदहि ठेविली जात असे. या ग्रंथालयाची सुरुवात जरी असुरब निपालचा बाप व आजा यांनी केली तरी तिची जोपासना करून तिला नांवारूपाला आणण्याचें काम असुरब निपालनेच केलें. ग्रंथ शोधनार्थ त्याने कित्येक विद्वानांना देशोदेशीं पाठवून मूळ ग्रंथ किंवा त्यांच्या नकला मिळविल्या व या ग्रंथालयांतहि लेखकांचा तांडा सदैव काम करीत असे. चिकण मातीचे ढीगचे ढीग तयार होऊन पडले आहेत, याच्यापासून पुस्तकांकरिता बारिक बारिक

विटा तयार करण्यांत कारागीर गुंतले आहेत, तयार असलेल्या विटांवर लेखक व लेखिका सांगितलेला मजकूर भराभर उतरून घेत आहेत, विद्वान लोक त्या परत तपाशीत आहेत, भाजण्याकरिता विटा धाडण्यांत येत आहेत, व त्यानंतर ग्रंथालयीन सोपस्कार त्यांच्यावर होऊन त्या ग्रंथालयांत प्रविष्ट होत आहेत, हा सर्व सोहळा या ग्रंथालयाचें नांव घेतल्यावर डोळ्यापुढे उभा राहतो. पण असुरत्र निपाल हा येवढें करूनच थांबला नाही तर त्याने आपलें ग्रंथालय आमजनतेकरिता खुलें ठेवलें. हेंच जगांतील पहिलें सार्वजनिक ग्रंथालय.

पश्चिम आशियांतील इतर अनेक प्राचीन ग्रंथालयांची माहिती सांगत बसल्यास त्यांचा विस्तार फारच वाढेल, परंतु ग्रंथालय शास्त्राचा अभ्यास करणारांनी ह्यांची माहिती जरूर करून घ्यावी येवढीच शिफारस येथे करतों. या प्रदेशाप्रमाणेच प्राचीन इजिप्त-मधेही अनेक ग्रंथालयें होतीं असा उल्लेख मी मागे केलेला आहेच. कांही ग्रंथालयांतील पुस्तकांचा जरी मागमूस लागत नसला तरी पुष्कळशीं पॅपिरसवर लिहीलेलीं पुस्तकें युरोपियन पुराणवस्तु संशो-धकांनी मिळविलेलीं आहेत. यांपैकीच खिस्तपूर्व सुमारें १५०० ला लिहिल्या गेलेल्या वैद्यकी पुस्तकांत हृदयाची क्रिया कशी होते याचा सविस्तर तलास लावण्याचा प्रयत्न केला आहे. "आत्म्याचें इस्पितळ"* "मानसिक दवाखाना" "विचारांचें औषध" अशीं नांवें प्राचीन इजिप्तचे लोक आपल्या ग्रंथालयांना देत असत. शिवाय "ग्रंथागार" "पॅपिरसांचें घर" हीं नांवें तर **सर्रहा** वापरलीं जातच. ग्रंथपालाचा

---

*"आत्म्याचें इस्पितळ" हें नांव अलेक्झॅड्रियाच्या म्यूझियमला दिलें होतें हें एका लेखांतील विधान बरोबर नाही. हें नांव रॅमिसीस दुसरा (इ. स. पूर्व १३००–१२३६) याने आपल्या ग्रंथालयास दिलें होतें.

अधिकार व हुद्दा पण मोठा असे. "ग्रंथागाराचा लेखक" "ग्रंथागाराचा अधिपति" असा त्याचा उल्लेख होत असे व राजदरबारीं त्याला मोठाच मान असे.

कथा, नाटकें, सामाजिक व आर्थिक विषयांवरील निबंध, वैद्यकीय चर्चा, अनेक प्रकारच्या पशुपक्ष्यांविषयीच्या गोष्टी व अर्थात् देवदेवतांचीं स्तुतिस्तोत्रें व धर्माचरणाचे नियम इत्यादि विषयांवरील पुस्तकें या ग्रंथालयांतून असत. आपल्या सर्वांना माहित असलेली व आवडती अशी जी सिंदबादची गोष्ट तिचा पहिला उगम इजिप्तमधलाच आणि तो पण खिस्तपूर्व २००० च्या सुमाराचा. प्राचीन इजिप्तच्या लोकांचा सर्वांत मोठा व प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे "मृतांचें पुस्तक,". याच्या प्रति अनेक पिरॅमिडांमधून खोदलेल्या आहेत व पॅपिरसवर लिहून त्या अनेक ग्रंथालयांत जतन करून ठेविलेल्या होत्या. ही प्राचीन इजिप्तची ग्रंथसंपत्ति, त्याचप्रमाणे प्राचीन पश्चिम आशियांतील ज्ञानभांडार आज आपल्याला इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स, अमेरिका इत्यादि देशांत विखुरलेलें सापडेल. हल्ली बगदाद, कैरो इत्यादि पौर्वात्य शहरीं पण या अवशेषांची दखल घेतली जात आहे. आपल्यालाही ग्रंथालयांबद्दल तेंच म्हणतां येईल. या प्राचीन देशांच्या मानाने जें आपलें परवाचें मोंगल साम्राज्य त्याच्या शाही किताबखान्याचीं पुस्तकें पाहावयाचीं असल्यास आपल्याला असेंच देशोदेशीं हिंडावें लागेल.

प्राचीन जगांतील महाप्रसिद्ध ग्रंथालय इजिप्त किंवा सुमेरच्या राजांचें नव्हतें तर तें ईजिप्तमधे स्थाईक झालेले ग्रीक राजे टॉलेमी यांनी स्थापलें. हेंच तें प्रसिद्ध अलेक्झँड्रियाचें म्युझियम. याची सुरवात पहिला टॉलेमी याने इ. स. पूर्व २९० मध्ये केली. याच्या

नंतर तिसऱ्या टॉलेमीने तर याच्या जोपासनेची पराकाष्ठा केली. अलेक्झँड्रिया बंदरांत जें जहाज येई त्याच्यावर ग्रंथ असल्यास ते या म्युझियममधे प्रविष्ट केले जात व त्यांच्या प्रतीच त्या जहाजाच्या अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केल्या जात. एकदा तर याने अगदी कमालच केली. याच सुमारास ग्रीसमध्ये अथेन्स शहरीं एक फार मोठें सार्वजनिक ग्रंथालय भरभराटीस आलें होतें. त्या ग्रंथालयाकडून या स्वारीने अनेक मौल्यवान् पुस्तकें उसनवारीने मागविलीं. पण याची खोड अथेन्सच्या लोकांना माहीत असल्याकारणाने ते ह्या व्यवहारास तयार होईनात. टॉलेमीने त्यांना मागतील ती रकम अनामत देण्याचें कबूल केलें व या अटीवर अथेन्सहून अलेक्झँड्रियाला ग्रंथ आले. पण अखेरीला बाळ गुणावर गेलेंच. मूळ ग्रंथ ठेऊन घेऊन त्यांच्या नकलाच फक्त अथेन्सला त्याने पाठविल्या आणि निरोप पाठविला की टेवलेली अनामत रकम अथेन्सने जप्त करावी !

अलेक्झँड्रियाची म्युझियम व तिच्या ग्रंथालयांतील संग्रह अरबांनी जाळला हा प्रवाद साफ खोटा आहे. इ. स. पूर्व ४८ च्याच्या सुमारास रोमन सेनानी ज्युलियस सीझर याच्याविरुद्ध झालेल्या बंडाळींत हें ज्ञान-भांडार बेचिराख झालें असें इतिहास सांगतो. अरबांची संस्कृति ग्रंथांचा अनादर किंवा ग्रंथालयांची धुळधाण करणारी अशी नव्हतीच. उलट विद्वत्तेबद्दल त्यांना फार आदर असे. प्रख्यात खलीफा हरून अल-रशीद याने तर हिंदुस्थानांतील ज्ञान बगदादला मानमरातबाने आणिवलें व अनेक संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें त्याने अरबी भाषेत करविलीं. हिंदूंचे संख्याशास्त्र अरबांनीच युरोपांत फैलाविलें. ज्याला हल्लीं अरबी अंक म्हणतात ते मूळ हिंदचेच व अरबी लोकांनी या अंकांना दिलेल्या हिंदसा या अरबी नांवांत त्यांनी

हें ऋण पुरेपूर कबूल केलेलें आहे. चिनी लोकांपासून कागद करण्याची कला शिकून तिचा जगभर फैलाव अरबांनीच केला. बगदाद, दमास्कस, कैरो येथे मोठमोठीं ग्रंथालयें स्थापून त्यांनी विद्वत्तेची कदर फार चांगल्या तऱ्हेने केली. पण मध्ययुगीन अरबांच्या ग्रंथालयांत कर्तृत्वाचा परमोच्च बिंदु म्हणजे स्पेन देशांतील कॉर्डोव्हा येथील बादशाही ग्रंथालय. अनेक सुखसोयींनी समृद्ध अशी ही संस्था होती. व तिचा उपयोग कोणालाही करतां येत असे. अभ्यासूंना कागद, लेखण्या, शाई इत्यादि साधनें मोफत मिळत असत व विद्वान् ग्रंथपाल त्यांच्या सेवेला नेहमी तत्पर असत. जेव्हा इस्लामी स्पेनमध्ये निरक्षरता ही अपवादात्मकच असे, त्या वेळीं युरोपांतील इतर देशांत साक्षरतेची सुरुवातही झालेली नव्हती. साधारण माणूस साक्षर नसायचाच आणि मध्ययुगीन युरोपांतील पहिलीं ग्रंथालयें हीं इस्लामी ग्रंथालयांप्रमाणे सर्वांना अभ्यास करण्याच्या संस्था नव्हत्या तर त्या धार्मिक संघांना जोडून असत व त्यांचा उपयोग साधारणतः भिक्षु लोकच करीत. युरोपांत छापण्याच्या कलेचा फैलाव होण्याच्या पूर्वीच या परिस्थितींत पालट होत होता व छापण्याचीं कला अवगत झाल्यानंतर तर एकंदर फारच मोठी वैचारिक क्रांति युरोपांत घडून आली व त्या खंडाने जगाचें धुरीणत्व पटकावलें.

आज आपल्याला अवगत असलेली सुट्या खिळ्यांनी छापण्याची कला जरी पंधराव्या शतकाच्या मध्यास युरोपमध्ये सुरू झाली. तरी जगांतील पहिलें छापलेलें पुस्तक मात्र चीनमध्ये तयार झालें. आणि तें सुद्धा गटेनबर्गच्या आधी सुमारें सहाशें वर्षें. हें लाकडी फळयावर तयार केलेल्या ठशांनी छापलें होतें, व ठसे हलते नसल्याकारणाने ते मोडून दुसरा मजकूर जुळविण्याची सोय नव्हती. मध्य आशियांत

"शंभर बुद्धांच्या" गुंफेमधे १९०७ सालीं हें पुस्तक उजेडांत आलें.*
पुस्तक छापल्याची तारीखहि मुखपृष्ठावर आहे व इंग्रजी कालगणने-
प्रमाणे ती ११ मे ८६८ अशी होते. "पूज्य पितरांच्या स्मृत्यर्थ सर्वांना
विनामूल्य वाटण्याकरिता वाँग चियेः याने हें पुस्तक छापलें" असाही
मजकूर पुस्तकांत आहे. या ग्रंथाचें नांव "हीरकसूत्र" किंवा "वज्रसूत्र"
असें आहे. आज आपण पुस्तक पहातों अशा रूपांत मात्र हें सूत्र नव्हतें,
तर तें एक छापलेलें भेंडोळें होतें. पण याच्या बरोबरच दुसरीं तीन
छापलेलीं पुस्तकें होतीं, त्यांतील एक मात्र आजच्या ग्रंथाप्रमाणे होतें.

मुद्रणकला पोर्तुगीजांनी हिंदुस्थानांत प्रथम सुरू केली ही गोष्ट
पुढे एका लेखांत दिलेली आहेच. हिंदुस्थानांत पहिलें पुस्तक १५५६
मध्ये छापलें गेलें व त्याचें नांव "Conclusoes" असें होतें.
याच्या दुसऱ्याच वर्षी म्हणजे १५५७ सालीं "Doutrina Christao"
हें हिंदुस्तानांत छापलेल्यांपैकी दुसरें पुस्तक तयार झालें.
"Compendio spiritual de vida Christao" हें २ जुलै
१५६१ ला प्रसिद्ध झालें. आजच्या माहितीप्रमाणे याचा
नंबर तिसरा लागतो. "औषधोपचाराबद्दलचें" म्हणून उल्लेखिलेलें
पुस्तक १० एप्रिल १५६३ या दिवशीं छापून संपलें असा त्याच्यावर
उल्लेख आहे. याचें एक इंग्रजी भाषांतरहि ४० वर्षांपूर्वी प्रसिद्ध
झालेलें आहे. या पुस्तकाचा कर्ता "गार्सिया ड ऑर्टा" नांवाचा
पोर्तुगीज डॉक्टर असून मुंबईच्या त्या काळच्या माझगांव बेटावर
त्याची मालकी होती. अहमदनगरचा पहिला बुऱ्हान निझामशहा

---

* या गुहेचें दार इ. स. १०३५ मध्ये भिंत बांधून बंद करण्यांत
आलें होतें. तें इ. स. १९०७ सालीं भिंत पाडून प्रथमच उघडण्यांत आलें.

याच्याशीं गार्सियाची फार मैत्री होती व त्याच्या पुस्तकांत कांही ऐतिहासिक उल्लेखहि सापडतात.

प्राचीन भारतांतील जगद्विख्यात् ग्रंथालय म्हणजे नालंदा विद्यापीठाचें; पण हें असुरबनिपालचें ग्रंथालय किंवा अलेक्झँड्रियाची म्यूझियम यांच्या इतकें पुराणें नाही. या विद्यापीठाच्या विस्तृत परिसराच्या धर्मगंज नांवाच्या भागांत ग्रंथालयाच्या तीन भव्य इमारती होत्या व त्यांना रत्नसागर, रत्नरंजक व रत्नोदधि अशीं नांवें होतीं. रत्नोदधि ही इमारत नऊ मजले उंच होती अशी नोंद आहे. या विद्यापीठाची व त्याच्या ग्रंथालयाची कीर्ति ऐकून देशोदेशींचे विद्यार्थी व पंडित येथे अभ्यासास येत. प्रख्यात चिनी प्रवासी ह्युएन्त्संग व इत्सिंग यांनी येथे अनेक वर्षें विद्याभ्यास केला व शेंकडो संस्कृत व पाली ग्रंथांच्या नकला करून त्यांनी आपल्याबरोबर चीनला नेल्या व त्यांचीं चिनी भाषेंत रूपांतरें केलीं व करविलीं. नालंदा येथील मूळ प्रती व त्यांनी नेलेल्या संस्कृत व पाली नकललेल्या प्रती जरी आज नष्ट झालेल्या आहेत तरी यांपैकी कांही ग्रंथांचीं चिनी भाषांतरें उपलब्ध आहेत व या भाषांतरांवरून भारतीय विद्वान् कांही ग्रंथ परत संस्कृतमध्ये तयार करीत आहेत! वल्लभि, विक्रमशीला, नगई, कांची इत्यादि अनेक प्राचीन भारतीय ग्रंथालयांची थोडी थोडी माहिती देऊं म्हटलें तरी तिचा एक ग्रंथच होईल. म्हणून जी माहिती साधारणतः वाचण्यांत किंवा अभ्यासण्यांत येत नाही तिचाच उल्लेख केला आहे. आणि म्हणूनच मुंबई प्रांतांतील एक मध्ययुगीन संशोधन संस्थेविषयी थोडेसें लिहिण्याचा मोह आवरत नाही.

ही संशोधन संस्था खानदेशांत चाळिसगावच्या दक्षिणेस १० मैल असलेल्या पाटणा या गावीं होती. प्रसिद्ध गणिती भास्कराचार्य

यांचा नातू चंगदेव याने ही स्थापन केली होती व या प्रांतांतले देवगिरीच्या यादवांचे मांडलिक निकुंभ राजे यांनी या संस्थेला अनेक तऱ्हेच्या देणग्या दिल्या होत्या. मूळ संस्थेच्या अवशेषांचा मागमूसही आज लागत नाही. पण चंगदेवाने तिच्याविषयी कोरून ठेवलेला एक शिलालेख मात्र आजपर्यंत काळाशीं टक्कर देऊन शाबूत आहे. चंगदेव सांगतो,

श्रीभास्कराचार्यनिबद्धशास्त्रविस्तारहेतोः कुरुते मठं यः ॥

आणि

भास्कररचितग्रन्थाः सिद्धांतशिरोमणिप्रमुखाः ।
तद्वंश्यकृताश्चान्ये व्याख्येया मन्मठे नियतम् ॥

म्हणजे या संस्थेच्या ग्रंथालयांत भास्कराचार्य व त्याच्या वंशांतील विद्वान् यांनी लिहिलेल्या गणित, ज्योतिष व इतर विषयांवरील व त्यांच्या अभ्यासास जरूर असणारीं तत्सम पुस्तकेंच फक्त असत! "स्पेशल लायब्ररी" म्हणून ज्याला आपण आज म्हणतों ती हीच.

पुढील एका लेखांत तंजावरच्या सरस्वती महाल या ग्रंथालयाचा गौरवपूर्ण उल्लेख आलेला आहे. पण आपणा महाराष्ट्रीयांना सामान्य पणें माहित नसलेला पण मराठवाड्यांतील संस्कृत हस्तलिखितांनीच बहुशः समृद्ध असलेला असा एक मोठा व फारशी अरबी हस्तलिखितां-चा फारच प्रचंड असा दुसरा असे दोन फार महत्त्वाचे ग्रंथसंग्रह आपल्या देशांत आहेत, त्यांच्याकडेहि आपलें लक्ष वेधितों. पहिला संग्रह बिकानेरला आहे व या संग्रहालयाचें नांव "अनूप संस्कृत ग्रंथालय" असें आहे. बिकानेर महाराजा अनूपसिंह हा बादशहा औरंगजेब याचेबरोबर दक्षिणेच्या स्वारीवर असतांना त्याने हा संग्रह क्षणशः कणशः जमविला. दुसऱ्याचें नांव "खुदाबक्ष किताबखाना",

पाटणा शहरचा. फारशी व अरबी हस्तलिखितांचा जगांतील सर्वात मोठा संग्रह हाच असावा अशी माझी समजूत आहे.

ग्रंथालयांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीविषयी कितीतरी लिहितां येईल; पण तिचा मी येथे अत्यंत स्थूल मानानेच विचार केला आहे. ग्रीक व रोमन ग्रंथालयें, मध्ययुगीन युरोपीय ग्रंथसंस्था, मुसलमानी जगतांतील ग्रंथविषयक गोष्टींचा परिपोष, मोगल बादशाहींतील व इतर भारतीय मुसलमान राजवटींतील ग्रंथसंग्रह इत्यादि अनेक गोष्टींचा फक्त उल्लेखच करण्याशिवाय गत्यंतर नाही. कारण प्रस्तावनेलाहि पृष्ठांचें बंधन आहेच. म्हणून आता एक जुन्या पुस्तक-प्रशस्तीने आपली रजा घेतों.

मंगलं भवतु सर्व सज्जने । मंगलं भवतु धर्मकर्मणि ।
मंगलं भवतु पाठके जने । मंगलं भवतु लेखके सदा ॥

मुंबई
१४-४-५१

**पु. म. जोशी**

# दर्शन घडवितांना

आज रामनवमीच्या सुमुहूर्तावर ही 'पूजा प्रकाशना'ची तिसरी भेट वाचकांना सादर करतांना समाधानमय आनंद होत आहे. या अवनीतलावरील मानवाला रानटी अवस्थेंतून सुधारणेच्या ध्येयबिंदू-कडे अव्याहत मार्गदर्शन करीत नेणारे ज्ञान-दीप म्हणजेच पूर्वीचे ऋषिमुनि आणि आजचे ग्रंथराज ! या ग्रंथांचे लहान मोठे सागर भारतवर्षांत जागोजाग विस्कळित स्वरूपांत अल्पस्वल्प कार्य करीत जीवन कंठीत आहेत. त्यांतील एक महत्वाचा भाग म्हणजे मराठी ग्रंथालयें हा होय ! या मराठी ग्रंथालयांना एकत्रित आणून त्यांचा इतिहास (मूळ, कूळ, बूड, फांद्या, पानें, फळ व परिणाम) सांगणारें एकहि पुस्तक मराठींत नव्हतें. आतापर्यंत ग्रंथालय शास्त्रावर या पुस्तकांतील लेखकांनीं लिहिलेलीं कांही पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत; परंतु ग्रंथालयांची व इतिहासाची एकत्र सांगड घालून माहिती देणारें पुस्तक नव्हतें. आणि ही उणीव अंशतः तरी भरून निघावी म्हणून आम्ही हा अल्पसा प्रयत्न केला आहे. अर्थात तो किती प्रमाणांत यशस्वी झाला हे रसिक वाचक, ग्रंथालयतज्ञ व चोखंदळ नि मार्मिक टीकाकार पाहतीलच !

सदर ग्रंथांत महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेरील ८०० ग्रंथा-लयांची, २०० प्रकाशनांची व ३०० ग्रंथविक्रेत्यांची माहिती मागवून तिचा समावेश करण्याचा गेल्या वर्षभर सारखा आटोकाट प्रयत्न केला आहे. वारंवार पत्रकें पाठविलीं गेलीं व विनंत्या करून सहकार्याचा हात पुढे केला; परंतु त्यांतील फारच थोडयांनी (म्हणजे ३०० ग्रंथा-लयांनी, ८६ प्रकाशनांनी व ७५ ग्रंथविक्रेत्यांनी) आमच्या विनंतीनुसार

आम्हास सहकार्य देऊन उपकृत केलें आहे. बहुतेकांनी आमच्या विनंतीची दाखलही घेतली नाही, मग सहकार्य तर दूरच राहिलें. त्या सर्वांचें सहकार्य मिळालें असतें तर या ग्रंथापेक्षा अडीच-तीन पट मोठा ग्रंथ वाचकांना सादर करता आला असता.

'ग्रंथालय' हें **आजच्या जगांत जनजागृतीचें महान केंद्र आहे. ग्रंथालयावरून राष्ट्र, भाषा, संस्कृति व वाङ्मय यांचें मूल्यमापन करतां येतें, कारण तें मापण्याचें हें एक प्रभावी यंत्र आहे. आणि** या दृष्टीने पाहूं जाता आजच्या ग्रंथालयाचें दिसणारें **दारिद्र्यपीडित रूप, कार्यकर्त्यांची उदासीनता, पदाधिकाऱ्यांची बेपर्वाई व ग्रंथांची आबाळ हे ठळक दोष नजरेंत भरल्याशिवाय राहात नाहीत.** (त्यांतल्या त्यांत अगदीच थोडीं ग्रंथालयें आशादायक आहेत हें सुचिन्ह होय). अर्थात राष्ट्राचा, भाषेचा, संस्कृतीचा व वाङ्मयाचा दर्जा कोणता असेल याची सुबुद्ध वाचकांना ताबडतोब कल्पना येईल.

सन १९४७ आगष्टपर्यंत देश पारतंत्र्यांत खिचपत होता. त्या वेळेस वरील परिस्थितीची जाणीव होऊनहि आम्ही कांही करूं शकत नाही, परकें सरकार आहे अशी खोटी किंवा खरी बतावणी तरी करतां येत होती. परंतु आज देश स्वतंत्र होऊन ३ वर्षांच्यावर काळ लोटला तरी आमची तीच वृत्ति कायम आहे हें कशाचें लक्षण ? भारतांतील शे. १५ लोक साक्षर आहेत. त्यांतील शेंकडा पांच तरी ग्रंथालयांचा उपभोग घेतात काय ? नाही. आणि आमच्या सरकारला तर ग्रंथालय चळवळीकडे लक्ष द्यावयाला फुरसद नाही नि महत्त्वहि पटलेलें दिसत नाही. महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें झाल्यास मध्यप्रदेश, मराठवाडा, मध्यभारतांतील फक्त मराठीभाग यावरून सहज कळून येतें. मात्र बडोदें संस्थानाने बरीच प्रगति केली आहे. आणि तिच्या खालोखाल मुंबई सरकारचा नंबर लागेल हें वेगळें ! मग या महत्त्वपूर्ण

विषयाची उन्नति कशी व्हावी ? आणि राष्ट्र सुसंस्कृत, सुदृढ व संपन्न कसें व्हावें ? **ज्या राष्ट्राच्या वाङ्मयांतून नवजीवनाचा रस व नवक्रांतीचें तेज सळसळत असतें तें राष्ट्र जगाच्या पाठीवर मागे राहूंच शकत नाही हें आजचें सूत्र आहे.** हें पाश्चिमात्य राष्ट्रांकडे नजर टाकली तर कळून येतें. पाश्चिमात्य सरकारांनी ग्रंथालयांचें महत्व ओळखून ताबडतोब ग्रंथालयविषयक कायदा केला आणि पाण्यासारखा पैसा खर्चून ग्रंथालयें समृद्ध व अद्ययावत् केलीं. त्यांना **'प्रत्येक पुस्तकास वाचक आहे' व 'प्रत्येक वाचकास पुस्तक आहे'** हें तत्व पटलेलें असून नवीन निघालेलें प्रत्येक पुस्तक ग्रंथालयांत असलेंच पाहिजे असें वाटतें.

परंतु या बाबतींत नुसत्या सरकारच्या पैशानेच कार्यभाग होईल असें नाही, तर जनतेनेहि सक्रिय सहकार्य दिलें पाहिजे. त्याशिवाय सरकारची योजना कितीहि चांगली असली तरी ती यशस्वी होऊं शकणार नाही. तरी पण **ग्रंथालयांचें जाळें राष्ट्रांतील खेडोपाडीं पसरून राष्ट्र सुसंस्कृत, ज्ञानसंपन्न व बलशाली करावयाचें** असेल तर खालील कांही महत्वाच्या गोष्टी जनता व सरकार यांचे सहकार्याने ताबडतोब होणें अत्यंत जरूरीचें आहे

१ सरकारने ग्रंथालयांचें महत्त्व ओळखून अविलंब ग्रंथालयाचा कायदा पास करून दरडोई अल्पसा कर वसूल करावा व त्यांतून मोफत व मुक्तद्वार ग्रंथालयें चालवावीं.

२ ग्रंथालयाचे नियंत्रणासाठी सरकारने ग्रंथपाल निर्मितीचे स्वतंत्र वर्ग ताबडतोब सुरू करावेत. तसेच विद्यापीठांतूनहि चालवावेत.

३ प्रत्येक ग्रंथालयांत ग्रंथपाल हा ट्रेंड किंवा पदवीधर (ग्रंथालयविषयक) असावा, असा नियम करावा.

४ मुलांना वाचनाची आवड लागण्याकरिता त्यांनी त्यांच्या शालेय ग्रंथालयांतून ठरलेल्या दर्जाचीं ठराविक पुस्तकें वाचलींच पाहिजे असा निर्बंध करावा. व त्या अवांतर वाचनासाठी स्वतंत्र गुणहि ठेवावेत (पण वर्गवार व वयवार पुस्तकांच्या याद्या सरकारने अगोदर पुरविल्या पाहिजेत.) कारण लहानपणीं लागलेली वाचनाची सवय पुढे आयुष्यभर त्याला शिदोरी-सारखी उपयोगी पडेल.

५ सरकारने एखाद्या शाळेस अगर कॉलेजला मान्यता देतांना ग्रंथालय-विषयक कांही महत्वाच्या अटी पूर्ण करून घ्याव्या. त्याशिवाय त्यांना मान्यता देऊं नये.

६ राष्ट्रांतील प्रत्येक ग्रंथालयास ग्रंथालयविषयक माहिती मिळावी, त्यांत एकसूत्रीपणा असावा, तीं सुनियंत्रित चालावीं म्हणून सरकारने एक साप्ताहिक किंवा मासिक चालवावें.

७ दरवर्षी मध्यवर्ती, प्रांतीय, जिल्हा व तालुका ग्रंथालय सम्मेलनें व प्रदर्शनें भरवून प्रगतीचें मार्गदर्शन करावें.

८ मध्यवर्ती, प्रांतीय, जिल्हा व तालुका या ठिकाणीं एकेक आदर्श ग्रंथालय सरकारतर्फे चालविण्यांत यावें व त्यांनी इतर ग्रंथालयांना मार्गदर्शन करावें व नियंत्रण ठेवावें.

९ आज ग्रंथालयांकडून निरक्षरांना साक्षर व साक्षरांना सुसंस्कृत करण्याचें कार्य सरकारने शिक्षकांकडून करून घ्यावें.

सदर ग्रंथाच्या साहित्याची जमवाजमव करतांना ग्रंथालयें, प्रकाशनें व विक्रेते यांनी जरी पाहिजे तेवढें सहकार्य दिलें नाही तरी सदर ग्रंथांतील लेखकांनी व कांही मित्रांनी आम्हाला अत्यंत तत्परतेनें व आपुलकीने सक्रिय सहकार्य दिलें आहे. त्यांच्या या अमोलिक सहकार्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे त्यांतल्या त्यांत श्री. र. श. पारखी, श्री. वा. पु. कोल्हटकर, श्री. त्र्यं. दि. वाकनीस श्री.

दि. वि. काळे यांनी ग्रंथ माहितीपूर्ण व संग्राह्य होण्याकरिता वेळोवेळीं आपुलकीने सूचना करून आपल्या अनुभवाची अमोल देणगी दिली याबद्दल त्यांचें उतराई होण्याकरितां आज शब्दहि अपुरे पडत आहेत.

या ग्रंथाकरिता **'आदर्श ग्रंथालय कसें असावें ?'** ही निबंध चढाओढ लावली होती, या चढाओढीचें निबंध तपासून निकाल देण्याचें किचकट, त्रासदायक व जबाबदारीचें कार्य माझे पुण्याचे ग्रंथपाल मित्र श्री. र. श. पारखी, श्री. वा. पु. कोल्हटकर व श्री. ज. बा. बुधकर यांनी तत्परतेने करून तसदी घेतली या बद्दल त्यांचा व या निबंधाचे यशस्वी लेखक श्री. मा. रा. पटवर्धन यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्यावाचून राहवत नाही.

तसेंच माझ्या विनंतीला मान देऊन व वेळांत वेळ काढून डॉ. पु. म. जोशी यांनी मार्मिक व माहितीपूर्ण प्रस्तावना लिहून मला कायमचें ऋणी केलें आहे. डॉ. रंगनाथन्, दिल्ली, ना. बा. गं. खेर, मुंबई, यांनीहि आपले अमोलिक व स्फूर्तिदायक संदेश पाठवून ग्रंथांत मौलिक भर घालून जी आपुलकी दाखविली त्याबद्दल मी त्यांचाहि ऋणी आहे. त्यांचे संदेश ग्रंथपालांनी व चालकांनी मनन करून कृतींत उतरविल्यास आहे या परिस्थितींतहि समाधान झाल्याशिवाय राहणार नाही.

शेवटीं ग्रंथ परिपूर्णतेचें कार्य ज्या लेखकांच्या, ग्रंथपालांच्या, प्रकाशकांच्या व विक्रेत्यांच्या सहकार्याने पुरे होत आहे त्यांचें व ज्यांच्या परिश्रमाने हें अमूर्त स्वप्न मूर्त रूपास आलें आहे त्या नारायण मुद्रणालयाचे चालक श्री. पां. ना. बनहट्टी व त्यांचे कामगार यांचे हार्दिक आभार मानून हे दोन शब्द पुरे करतों.

रामनवमी, शके १८७३ **ल. वा. पडोळे.**

# मराठी ग्रंथालयांचा इतिहास



## १. मुद्रणकलेची उत्पत्ति व विकास

वसंत गणेश देवकुळे

**परिचय**—जन्म–पुणें १९१३, हे बी. एस्‌सी. आहेत. यांचा मुद्रणविषयक अभ्यास बराच दांडगा असून व्यायाम, धंदेशिक्षण वगैरे विषयहि यांच्या आवडीचे आहेत. यांचीं 'योगासनें' व 'मुद्रणविषयक कायदे' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. सध्या हे पुणे येथील 'मुद्रण प्रकाश' ह्या मासिकाचे संपादक आहेत.

### विषयाचें महत्त्व

एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध व विसाव्या शतकाचा पूर्वार्ध मिळून १०० वर्षांच्या काळांत जगातील रचनात्मक घडामोडींत मुद्रण-कलेचा विकास ही गोष्ट विस्तारानें सांगण्यासारखी आहे. जगांत निर्माण होणाऱ्या नवनवीन ज्ञानाची नोंद करणें व कानाकोपऱ्यांतील मानवास विविध नव्याजुन्या गोष्टींचें ज्ञान करून देणें हें मुद्रणकलेच्या साह्यानेच होत आलें आहे. पूर्ण जगाचे साक्षर व निरक्षर असे दोन भाग केल्यास साक्षर घटकांचें अस्तित्व मुद्रणकलेनेच टिकविलें आहे.

अशी ही मुद्रणकला एक शास्त्र असून तिची वाढ बहुतांशीं मानवाच्या सौंदर्यकल्पना व सृष्टीबरोबर चढाओढ करण्याची प्रवृत्ति यांमुळे झालेली आढळते. मुद्रणकलेचीं मुख्य साधनें कागद, शाई, छपाईपृष्ठ, टाईप, लिथो, रोटा इत्यादि व छपाइ यंत्रें हीं होत. यां-मधील शास्त्रशुद्ध सुधारणेमुळे मुद्रणकला वाढली, त्याचप्रमाणे चित्र-कला, सौंदर्यदृष्टि, कारागिरी व व्यवस्थापन यासंबंधींच्या योजनेमुळे मुद्रणकलेची वाढ झालेली आढळते.

मुद्रणकलेच्या विकासामुळे शक्य होणाऱ्या या गोष्टीबद्दल प्रत्येक भारतवासीयाला आनंद वाटूं शकेल. ही गोष्ट डोळ्यासमोर ठेवून आपण मुद्रणकलेच्या उत्पत्तीची माहिती घेऊं व भारतवर्षांतील आजच्या स्थितीचा आढावा घेऊं.

## मुद्रणकलेची सुरुवात

इ. स. १७५ पासून छापण्याची कला चीनमध्ये अस्तित्वांत असल्याचे दाखले आहेत. लाकडी कोरीव चित्रांच्या एका ठशावरून अनेक प्रती छापून काढीत असल्याचे प्रयत्न १४व्या शतकाच्या अगो-दरपासूनचे ज्ञात आहेत. जपानांतील सर्वांत जुना ब्लाकप्रिंटिंगच्या कामाचा नमुना इ. स. ७६४ ते ७७० च्या दरम्यानचा उपलब्ध आहे. दहाव्या शतकापासून छापलेलीं पुस्तकें चीनमध्ये उपलब्ध होऊं शकतात.

मात्र सर्व दृष्टींनी पुढारलेल्या युरोपखंडात इ. स. १४०० पर्यंत पुस्तकें, खाजगी किंवा सार्वजनिक दस्ताऐवज, वगैरे सारखे कागद हस्तलिखितच सापडतात. विविध चित्रे, खेळण्याचे पत्ते, साधूंचीं चित्रें हीं सर्व लेखणीने काढून ब्रशाने रंगविलेल्या शेंकडो प्रती उपलब्ध होऊं शकतात. हाताचें लेखनकौशल्य व चित्रें काढण्याचें कौशल्य यांची भरपूर वाढ झाल्यानंतर युरोपांत ब्लाकप्रिंटिंगची कला उदय

पावली. एका ठशावरून शेंकडो प्रती छापून काढण्याचा हा विचार गटेनबर्ग ह्या जर्मनाने इ. स. १४५० मध्ये मेंझ या गावीं एका लाकडी यंत्राचे साहाय्याने अंमलांत आणला. याच गटेनबर्गला आधुनिक मुद्रणकलेचा शोधक म्हणून मानलें जातें. युरोपखंडभर प्रत्येक देशातील मुद्रक त्याचा उत्सव करतो.

गटेनबर्गने काढलेल्या लाकडी यंत्रामध्ये कोरीव ठशाला कापडी वा कातडी चेंडूने शाई लावली जाई. हें शाई लावण्याचें काम करणाराला 'बॉलर' म्हणत असत. १६ व्या शतकात गटेनबर्गच्या यंत्रांत सुधारणा केली गेली. १५७१ ते १६३८ एवढ्या काळांत आमस्टरडाम (हॉलंड) येथील ब्ल्यू नांवाच्या कारागीराने स्क्रू, दांडा, छापावयाचा ठसा ठेवण्याची जागा इत्यादि लोखंडी सामान तयार केलें. ही मूळ यंत्रांतील सुधारणा सुमारें २०० वर्षांनंतर घडविली गेली. पुढे १७५३ ते १८१६ या काळांत चार्लस स्टॅनट्रोप या गृहस्थाने संपूर्ण लोखंडी यंत्र प्रचारांत आणलें. अलबियन, कोलंबियन हीं सुप्रसिद्ध हातयंत्रें त्यानंतर प्रचारांत आलीं. असलीं यंत्रें २० × ३०च्या आकाराच्या कागदांचीही छपाई करणारीं अशीं तयार झालीं.

छपाईंत वापरला जाणारा आजच्या पद्धतीचा मूळ कागद इ. स. १०२ या वर्षी चीनमधील लेयंग प्रांतांतील हुनान या गावीं त्साई-टून या कामगाराने प्रथम तयार केला. त्याच सुमाराचे चिंध्याचे कागदहि सापडले आहेत. त्यानंतर इ. स. ७५१ मध्ये मध्य आशियांतील समर्कंदच्या लढाईंत अरबांनी चिनी कागद तयार करणाऱ्या कारागिरांना पकडून आपल्या देशांत नेलें. तेथून मूर लोकांनी ११५० सालीं स्पेनमध्ये कागद कारागीरी नेली. इ. स. १२७० सालीं इटलीमध्ये कागद कारखाना नेला गेला. इ. स. १३३६ मध्ये जर्मनींत पहिली कागद गिरणी सुरू झाली. १५८८ मध्ये स्पेलमन

याने कागद जर्मनींतून इंग्लंडांत नेला. १०० वर्षेपर्यंत इंग्लंडांत फक्त तपकिरी रंगाचा कागद होत असे. पांढरा कागद फ्रान्समधून आणला जाई. इ. स. १६७५ त इंग्लंडांत पांढऱ्या कागदाची गिरणी स्थापन झाली. नवीन पद्धतीच्या कागद यंत्राचा शोध लुई रॉबर्ट याने फ्रान्स-मध्ये लावल्यानंतर तो इ. स. १७०० मध्ये इंग्लंडांत गेला. त्यानंतर पुढे १८०३ मध्ये डिकिन्सन यांनी सिलिंडर कागदाचें यंत्र शोधून चालू केलें. इ. स. १८५५ मध्ये अमेरिकेमध्ये नवीन कागदधंद्याची सुरवात ह्यूज बरजेस यांनी रॉयर्सफोर्ड (पेनसिल्वानिया) येथे केली.

मुद्रणमसी म्हणजे छापण्याच्या शाईचा पहिला कारखाना जर्मनींत म्युनिच येथे सुरू झाला. इ.स. १८५० पर्यंत शाईच्या बाबतींत जर्मनीचा हात धरणारा जगांत कोणीच नव्हता.

## मुद्रणकलेचा विकास

लाकडा ठशावरून छापण्याच्या कलेचा उगम होण्याचे आधी सुट्या टाईपाचा शोध लॉरेन्स कॉस्टट याने १४४६ सालीं हॉलंडमध्ये लावला होता. लाकडी टाईप करून त्यावरून छापण्याचें काम सुरू झालें त्यानंतर अनुक्रमें पोलाद, तांबें, पितळ या धातूंचे टाईप तयार केले जाऊं लागले. परंतु त्यानंतर लवकरच ओतून टाईप तयार करण्याची कल्पना काढली जाऊन पोलादी पंच करून त्यावरून तांब्यामध्ये मातृका ठोकून घेऊन पोलादी साच्यांत शिसें, टिन व ॲंटिमनी यांच्या मिश्रणाचा रस ओतून टाईप तयार केला जाण्यासाठी डाव्या हातात साचा धरून त्यावर रस ओतला जाई. अशा तऱ्हेने एकेक टाईप हातात तयार होई. पण सध्या हाताने चालविण्याच्या पद्धतीचें टाईप पाडण्याचें यंत्र प्रथमतः १८३४ मध्ये न्यूयॉर्क येथे डेव्हिड ब्रूस (ज्यूनिअर) यांनी तयार केलें. टाईप तयार करण्यासाठी

शिसें, अँटिमनी व जस्त यांचे मिश्रणाचा रस उपयुक्त ठरविण्यांत आला. टाईपांना पॉईंट सिस्टिम (रेघी पद्धत) जर्मनीमध्ये फोर्निअर या गृहस्थाने पूर्णावस्थेस नेली. कोणत्याही वळणाचा टाईप बनवितांना एकूण सहा स्वतंत्र कामें केलीं जातात. (१) पंच तयार करणें, (२) मातृका अगदी बरोबर ठोकून तयार करणें, (३) विजेच्या साहाय्याने तांबें चढवून मातृका बनविणें, (४) उत्कृष्ट पोलादाचे साचे तयार करून ते तपासून घेणें, (५) यंत्रावर टाईप पाडणें, (७) टाईप सर्व बाजूंनी घासून तयार करणें.

त्यानंतर वर्तमानपत्राच्या प्रगतिमुळे जलद जुळणीच्या मागे लोक लागले—प्रथमतः लिगेचर्स म्हणजे ing, ff, इत्यादि अक्षर-समूह एकदम पाडून घेणें–त्यानंतर यांत्रिक जुळणीसाठी मर्गेथालर याने प्रथम मोनोटाईप यंत्र तयार केलें.

यंत्राबाबत असें की १८१५ मध्ये विल्यम निकोल्सन ह्याने पहिलें सिलिंडर यंत्र तयार केलें. त्याचे अगोदर १८११ मध्ये ब्रिऑन डॉकिंग याने शाई लावूं शकणाऱ्या रुळाचा सरस तयार करून पाहिला. त्याचा उपयोग ह्या सिलिंडर यंत्रात तावडतोब करण्यांत आला. १८३३ त वाफेच्या शक्तीच्या साहाय्याने चालणारें यंत्र तयार करण्यांत फ्रेडरीक कोनिग ह्याला यश मिळाले. यानंतर दोन बाजूंनी एकदम कागद लावून छपाई करण्याची योजना यशस्वी झाली.

वर्तमानपत्रांच्या छपाईसाठी ह्या यंत्रांमध्ये सुधारणा केल्या गेल्या व १८७१ च्या सुमारास लंडनटाईम्सच्या छपाईसाठी सर्वांत सुधारलेलें आठ कागद सोडणारें यंत्र तयार करण्यांत आलें. यानंतर रोटरी यंत्र व त्याच्या छपाईचे स्टिरिओ पद्धतीचे रोलर करण्याच्या योजना झाल्या.

पुस्तकांची छपाई, वर्तमानपत्रांची छपाई, चित्रांच्या छपाईकरितां लिथोग्राफी व ऑफसेट यांमध्ये सुधारणा करण्याची खटपट सतत सुरू

राहिली. इ. स. १७९६ मध्ये सिनेफिल्डर याने म्युनिच येथे सपाट पृष्ठभागापासून छपाई करण्याची अशी लिथोग्राफी उर्फ शिळा छपाईचा शोध लावला. दगडाऐवजी झिंकचे पत्रेहि वापरण्याची शक्यता दिसून आल्यानंतर ऑफसेट छपाई सुरू झाली. त्यामध्ये ब्लॉकमेकिंगच्या साधनांचा उपयोग करण्याची सोय झाल्यानंतर फोटो घेण्याच्या पद्धतीने काचा तयार होऊं लागल्या व फोटो लिथोग्राफी व फोटो ऑफसेट पद्धति प्रचारांत आल्या.

आज पुस्तक छपाईच्या कामाकरितां टाईपाची प्रत्यक्ष जुळणी न करावी लागतां 'व्हेरी टाईपर' नांवाच्या यंत्रावर विविध इंग्रजी वळणांत मजकूर टाइप करून तो फोटो आफसेट पद्धतीने जस्ती पत्र्यावर घेऊन ऑफसेट मशीनवर छापतां येऊं लागला आहे. या प्रमाणे शेंकडो इंग्रजी भाषेंतील पुस्तकें छापलीं जाऊं लागलीं आहेत. 'फोटोग्रॅव्हयूर' पद्धतीमध्ये चित्रें ही टाईपाबरोबर छापलीं जातात.

रंगीत चित्रेंही आर्टिस्टच्या प्रत्यक्ष कामाशिवाय फोटो ऑफसेट पद्धतीने १४–१४ रंगांपर्यंतचीं छापतां येऊं लागलीं आहेत.

जर्मनी, इंग्लंड, अमेरिका या देशातून तसेंच अलीकडे इटली-मध्ये मुद्रणाबाबत विविध शोध व नवीन पद्धती चालू आहेत. देशांतील जीवनांत मुद्रणकलेच्या उपासनेला मोठें स्थान दिलें जात आहे. ग्रंथछपाई, ग्रंथप्रकाशन, ग्रंथविक्री व ग्रंथालयें याबाबत नव-नवीन पद्धति व शीघ्र योजना आखल्या जात आहेत.

## भारतवर्ष

एकोणिसाव्या शतकापर्यंत भारतवर्षात ज्ञानप्रसाराची गुरु-मुखांतून ऐकून तें वाढविण्याची पद्धत चालूच होती. सर्वांगसुंदर संस्कृत भाषा व ती लिहिण्याची सुधारयुक्त देवनागरी लिपी यांचा विकास परमोच्च कोटीला गेला. वेदादि वाङ्मय जसेंच्या तसें देशभर सुवाच्य

हस्ताक्षरांनी लिहिलें जाई. त्यांतून झालेला भारतीय जीवनाचा प्रकर्ष शेंकडो प्रवाशांनी मुक्तकंठाने वर्णन केलेला आहे. त्या परोपकारी व समाजसन्मुख जीवनांत मुद्रणकलेला प्रवेश नव्हता यांत आश्चर्य नाही. भारताला 'सुवर्णभूमि' संबोधून त्याबद्दल कुतूहल निर्माण करण्याचें काम अनेकांनी केलें. १५ व्या शतकांत पोर्तुगीजांचा वास्को-ड-गामा इकडे येऊन गेला त्यानंतर सुमारे ६४ वर्षांनी त्याच्या येथील वसाहती-मधील ख्रिश्चन धर्मप्रसारकांनी एक प्रचारपुस्तक इंग्रजींतून छापलें. **तेंच पुस्तक हिंदुस्थानांतील पहिलें छापलेलें पुस्तक** ('दि स्पिरीच्युअल कॉंपेडीयम ऑफ ख्रिश्चन लाईफ') होय. हें पुस्तक बॉटार डी लिओ या आर्चबिशपने छापलें. १५९३ त दुसरें औषधो-पचाराबद्दलचें पुस्तक प्रकाशित झालें. अशा रितीने १६५५ पर्यंत तेरा पुस्तकें छापण्यांत आलीं. यामध्ये देवनागरी लिपींतील एक व पहिलें पुस्तक 'सेंटपीटरचें चरित्र' हेंही छापलें होतें. १५७७ त एक व १५९८ मध्ये एक याप्रमाणे दोन तामीळ पुस्तकेंही छापलीं गेलीं.

मिशनऱ्यांच्या धर्मप्रसाराच्या उत्कट इच्छेमुळे भारतवर्षांत पुस्तक छपाई सुरू झाली. मात्र प्रथमतः या बाबतींत लिथोग्राफीचाच उपयोग केला जाई.

भारतवर्षांतील देवनागरी भाषेचे टाईप १८०५ मध्ये प्रथमतः एका मिशनऱ्यानेच केले आहेत. १८१२ मध्ये हीं अक्षरें पूर्ण झालीं. दुसऱ्या प्रकारचे टाईप फर्दुनजी मर्झबान नांवाच्या इराणी माणसाने केले. अशा तऱ्हेचे हे प्रयत्न चालू झाले.

## सेठ जीवजी दादाजी (१९ वें शतक)

भारतवर्षांत वाचल्या जाणाऱ्या अशा हस्तलिखित धर्मग्रंथांतील संस्कृत, प्राकृत, हिब्रू, देवनागरी इत्यादि भाषा समृद्ध समजल्या जात.

मात्र या भाषेची मुद्रणालायक स्थिति येणें विशेष प्रयत्नावांचून होणार नव्हतें. इ. स. १८३९ सालीं जन्मलेले जावजी दादाजी चौधरी यांनी वयाच्या १० व्या वर्षी एका अमेरिकन मिशनच्या छापखान्यांत पगारावर नोकरीवर राहिले. तेथील विविध शिक्षण त्यांनी आत्मसात केलें. विशेषतः टाईप पाडण्याच्या टांकसाळींतील सर्व कामें ते शिकले. त्यांनी मोठ्या धाडसाने १८६४ सालीं स्वतःची टांकसाळ सुरू केली. प्रथमतः सर्व कामें त्यांनी केलीं पण लौकरच त्यांना राणू रावजी आरू यांचें सहकार्य मिळालें. जावजी दादाजी यांनी राणूची हुशारी पाहून त्याला सर्व शिकविलें. अशा तऱ्हेने निर्णयसागर टाईप फौंड्रींतील टाईपांचीं सुंदर वळणें तयार होऊं लागलीं. त्या वळणांची आवड अजूनही कायम आहे. या तयार होणाऱ्या टाईपांची विक्रीही सुरू झाली. पण जे विविध संस्कृत ग्रंथ हस्तलिखित होते ते छापून लोकांमध्ये पसरण्यासाठी जावजी दादाजी यांनी १८६९ मध्ये निर्णयसागर हा स्वतःचा छापखाना सुरू केला. विशेषतः हिंदुधर्माचें पंचांग छापण्याचा महत्त्वाचा उद्योग त्यांनी सुरू केला. त्यांनी लोकांच्या धर्मभावना दुखविल्या जाऊं नयेत म्हणून धर्मग्रंथ तुपाच्या शाईत छापत असल्याची जाहिरात केली होती. या छापखान्यांतच देवनागरी लिपींतील धर्मग्रंथ मोठ्या प्रमाणांत छापले जाऊं लागून भारतवर्षांतील महत्त्वाचा कालखंड सुरू झाला. शेठ जावजी दादाजी यांनी ग्रंथछपाईच्या धंद्यास चांगलें प्रतिष्ठेचें स्वरूप आणून दिलें. शेठ जावजी दादाजी १८९२ सालीं निधन पावले.

इ. स. १८५१ ते १८८३ या काळांत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी निबंधमाला, शाळापत्रक यांचें प्रकाशन सुरू केलें. लिथोच्या साहाय्याने ऐतिहासिक स्त्री-पुरुष व देवादिक यांचीं सुंदर चित्रें छापून काढणें सुरू केलें.

१८३३ सालीं मेकाले साहेबांनी घालून दिलेल्या शिक्षण पद्धतीमुळे शालेय पुस्तकांचें प्रकाशन सुरू झालें. त्यांतील इंग्रजी पुस्तकें बाहेरदेशांतून आणलीं जात.

**याच शतकांत १८३२ सालीं पहिलें मराठी वृत्तपत्र बॉम्बे गॅझेट या नांवाचें सुरू झालें होतें.** १८४१ सालीं ज्ञानोदय हें मिशनऱ्यांनी सुरू केलें होतें. त्यानंतर १८४८ मध्ये ज्ञानप्रकाश हें दैनिक सुरू झालें.

राजा रविवर्मा यांची चित्रकला व त्या चित्रांची मनोवेधक छपाई कांही परदेशीयांच्या साहाय्याने सुरू झाली.

अशा तऱ्हेने एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत भारतवर्षांतील मुंबई, मद्रास, कलकत्ता या शहरांतून मुद्रणकलेचीं सर्व अंगें वृद्धिंगत स्थितींत आलीं होतीं.

भारतवर्षांतील हातकागदाचें उत्पादन बरेंच मोठें होतें तरी तें पुरें पडत नव्हतें. या दृष्टीने कलकत्ता येथे कागदाची सुमारें १८९० सालीं. गिरणी सुरू झाली. मात्र छापण्याची शाई (मुद्रणमसी) वा इतर कोणतींही यंत्रें वगैरेबद्दल भारतवर्षांत विचार झाला नव्हता. सर्व मुद्रणालयांना जर्मनी, इंग्लंड यांचेकडून मुद्रणसाहित्य घ्यावें लागे.

जलद जुळणी व इंग्रजी पद्धतीने जुळणी करतां यावी यासाठी १९२६ सालीं जतचे न्यायाधीश श्री. गोखले यांनी देवनागरी लिपी मोनोटाईपावर बसविण्याची कल्पना काढली. त्याची पूर्तता श्री. शं. रा. दाते यांनी केली व आज देवनागरी लिपि सर्वस्वी परदेशीय कारागिरांच्या साह्याने सुमारें तीन चार वळणांत मोनो टाईपावर चालू आहे.

अखंड टाईपाच्या पद्धतीने किर्लोस्कर टाईपफौंड्रीमध्ये श्री. विजापुरे यांनी कमींतकमी टाईपामध्ये जी लिपी बसविली त्याचा प्रचार वर्तमानपत्राकरितां बराच झालेला आहे.

देवनागरी टाईपाच्या फौन्ड्रीमधून इलेक्ट्रिक पद्धतीने तांबें चढविलें जातें यामुळे कोणत्याहि टाईपावरून मातृका तयार करतां येतात. आज ९५ टक्के टाईप याच पद्धतीने पाडला जातो. त्यामुळे नवीन वळणें प्रचारांत येतांना दिसत नाहीत. अगदी नवें म्हणतां येईल असें वळण लोकसंग्रह प्रेसमध्ये श्री. संत यांनी केलेलें आढळतें. हें नवें वळण संत यांनी पेंटोग्राफ मशीनच्या साह्याने तयार केलें होतें, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

चित्रकार, कारागीर व भांडवलवाला यांच्यामध्ये विशेष सहकार्याची वाढ झाल्यावांचून देवनागरी लिपीचीं नवीं वळणें होणार नाहीत हें मुद्दाम नमूद करावेसें वाटतें.

## आजची स्थिति

भारतवर्षांत मुद्रणाचा धंदा उपजीविकेच्या पद्धतीने विशेषें-करून चालत असलेला आहे. पण शि. म. परांजपे यांचा काळ, लोक-मान्य टिळकांचा केसरी असल्या वर्तमानपत्रांनी ध्येयवादी धंदा निर्माण केला होता. मात्र या कलेची वाढ करून ती राष्ट्राच्या उपयोगी पडली पाहिजे या दृष्टीने वागतांना आढळतील असे मुद्रक-क्वचित् ! या वृत्तीमुळे वर्षानुवर्षे अनेक मुद्रणालये निघूनही भारत-वर्षांत हा धंदा मागासल्याप्रमाणें चालतो.

भारतवर्षांतील मुद्रणालयांची वाढ खालीलप्रमाणे आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १९०१ | सालीं | २१९३ | १९०५ | सालीं | २३८० |
| १९१० | ,, | २७५१ | १९१५ | ,, | ३२३७ |
| १९२० | ,, | ३७९५ | १९२२ | ,, | ४०८३ |
| १९३७ | ,, | ८००० | १९५० | ,, | १३००० |

झालेली आढळते मुद्रणकलेच्या विविध अंगांची जोपासना ती पुढील प्रमाणे होतांना आढळतें.

## ब्लॉक मेकिंग

पुस्तकांतील वा नियतकालिकांतील मजकुरांत टाईपाच्या छपाई-बरोबर आकृती, चित्रें, फोटो घालावे लागल्यास, सोयीप्रमाणे त्यांचे लाईनचे वा हाफटोनचे जस्ती वा तांब्याचे ब्लॉक्स करून घेण्याची कला भारतवर्षांत १९०२–३ पासून सुरू झाली. आज बहुतेक प्रमुख शहरीं हीं कामें होतात. ब्लॉकचा उपयोगही मोठ्या प्रमाणांत चालू आहे. दोन, तीन किंवा चार रंगी ब्लॉकचीं कामेंही मुंबई, कलकत्ता, मद्रास अशा अगदी थोड्या ठिकाणीं चालू आहेत. मात्र या कलेकरितां लागणारें सर्व सामान अझून जवळजवळ परदेशीच आहे.

## मुद्रण साहित्य

**कागद**—भारतवर्षांत सध्या १७–१८ कागदगिरण्या असून त्यांपैकी टिटाघरच्या तीन गिरण्यांचा गट अत्यंत कार्यक्षम असून ते काढीत असलेला कागद परदेशीय तोडीचा होत आहे. कागदाचे क्राऊन (१५ × २०) डेमी (१७॥ × २२॥) फुलस्केप (१३॥ × १७॥) रायल (१३॥ × २०) या प्रमुख आकारात काढला जातो. ४८० ते ५०० कागदांचें एक रीम याप्रमाणे बांधून रिमाचें वजन ठरलेल्या पौंडाचें असें मानलें जातें. कागदामध्ये कॅलेंडर्ड, मशीनग्लेझ्ड, सुपर कॅलेंडर्ड अशा कागदाच्या पृष्ठभागाच्या जाती आहेत. १९५० च्या फेब्रुवारीपासून टीटाघर गिरण्यांनी आर्टपेपर काढण्याची सुरवात करून मोठी आशा उत्पन्न केली आहे.

## छापण्याची शाई

आपल्या देशांत सुमारें १९२६ पासून असल्या शाईची बनावट सुरू झाली. मात्र आज काळी शाई व क्वचित रंगीन शाया एवढीच आपल्या कारखानदारांची तयारी झालेली आहे.

**रोलर कांपोझिशन**—रुळांना लागणारा सरस तयार करण्याचे शास्त्रशुद्ध प्रयत्न पुणें मुद्रक संघ पुणें यांचेतर्फे दोन तीन वर्षांपासून सुरू आहेत व त्यांत बरेंच यश मिळविण्यांत आलें आहे. इतर साहित्यही तुरळक होत असतें. १९५१ सालीं भारतवर्षांतील मुद्रणधंद्याबद्दल विचार करतां तो बऱ्याच अंशीं परदेशी पुरवठ्यावर अवलंबून आहे असें म्हणावेसें वाटतें.

## बांधणी व वेष्टनें

पुस्तकें, वह्या इत्यादि बांधणें त्याचप्रमाणे निरनिराळ्या प्रकारच्या मालासाठी डबे, पिशव्या, वेष्टनें, कार्डबोर्ड पेट्या तयार करणें हाही मुद्रणकलेचाच एक भाग समजला गेला असून त्या दृष्टीने भारतवर्षांत सर्वत्र धंदा सुरू आहे. मात्र परदेशी गोष्टींचें अर्धवट अनुकरण करण्यापलीकडे त्याची मजल नाही.

बाधणीकामाला लागणारीं पुस्तक शिलाईयंत्रें, स्टिचिंग, कटिंग, परफोरेटींग, फोल्डिंग, पेस्टिंग, गमिंग, इत्यादि यंत्रांपैकी, कटिंग–परफोरेटींग यांचीं यंत्रे भारतवर्षांत होऊं लागलीं आहेत. बाकीच्या यंत्रांचा उपयोग तुरळक असा चालू आहे. पुस्तकबांधणीपुरता आपल्याकडे कोठें कोठे त्यांचा उपयोग केला जातो.

सौंदर्यसाधनें, खाद्यपदार्थ, औषधें यांना गुंडाळण्याचे कागद, पेट्या, इत्यादि तयार करण्याचें स्वतंत्र शास्त्र अमेरिकेने निर्माण केलेलें आहे. या शास्त्राचा आधार घेऊन भारतवर्षांत मोठमोठ्या शहरीं हे धंदे स्वतंत्र रीतीनेंही चालत आहेत.

## मुद्रणविषयक कायदे

भारतवर्षांत इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर १८३५ पर्यंत पुस्तकें, वर्तमानपत्रें, छापण्याकरितां गव्हर्नर इन कौन्सिलकडून परवाना घ्यावा

लागत असे. त्यानंतर कांही किरकोळ नियम त्यांनी केले. १८६७ त प्रेस अँड रजिस्ट्रेशन ऑफ बुक्स अॅक्ट पास झाला. तो अजून चालू आहे. त्या अन्वयें प्रत्येक प्रेसने जिल्हाधिकारी याजकडे जाऊन नोंद करावयाची असते. तसेंच छापलेल्या पुस्तकाच्या प्रती पाहाणीकरितां पाठविण्याचा नियम सांगितला आहे.

१८७८ त व्हर्नाक्युलर प्रेस अॅक्ट पास झाला, पण तो १८८२ त रद्द झाला.

१९०८ मध्ये न्यूजपेपर अॅक्ट पास झाला, पण तो परिणामकारक न ठरल्याने १९१० मध्ये प्रेस अॅक्ट पास झाला. १९१७ पासून या कायद्याविरुद्ध ओरड सुरू केल्यानंतर १९२१ मधील नेमलेल्या कमिटीच्या शिफारसीनुसार १९२२ त नवा कायदा पास होऊन वृत्तपत्राचे मुद्रक, प्रकाशक व संपादक हे सर्वजण मजकुराला जबाबदार धरले जातात. राजद्रोही लिखाण जप्त करण्याचा अधिकार प्रांतिक सरकारला असावा असें ठरविण्यांत आलें. त्याचप्रमाणे कस्टम व पोस्ट कचेऱ्यांना राजद्रोही वाङ्मय जप्त करण्याचा अधिकार देण्यांत आला. त्याविरुद्ध दाद मागण्याची सोय केली.

कॉपीराइटचा कायदा १९१४ सालीं पास झाला. हे तिन्ही कायदे आज सुरू आहेत.

इ. स. १९४५ ते १९५० च्या २४ जूनपर्यंत पेपरकंट्रोल (इकॉनमी) ऑर्डर चालू होती. त्या ऑर्डरमुळे मुद्रणकलेच्या प्रगतीला फारच अडथळा आला होता.

सध्याच्या सरकारांत मुद्रणधंद्याचा राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीने अजूनही पुरेसा विचार केला गेलेला आढळत नाही.

## मुद्रणसंशोधन, सुधारणा व वाङ्मय

भारतवर्षांतील जनता स्वकर्तव्य व नागरिकत्वाचे हक्क याबद्दल अजून म्हणावी तितकी जागरूक नाही. ती तशी जागरूक व्हावी यासाठी मुद्रणधंद्याचा उपयोग होऊं लागलेला नाही ही वस्तुस्थिति आहे. तसा विचार होणें जरूर आहे.

मात्र मुद्रणकलेच्या प्रगतिसाठी ह्या धंद्यांत असलेल्या मंडळींनी मुद्रणसंशोधन, मुद्रणसुधारणा, व मुद्रणवाङ्मय यासाठी खटपट केली पाहिजे. त्यादृष्टीने महाराष्ट्रांत थोडी चळवळ सुरू झाली आहे.

शाईसंशोधनाचे दृष्टीने कांही खटपट पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजामध्ये चालू झाली आहे.

मुद्रणवाङ्मयाच्पा दृष्टीने पाहतां मराठीमध्ये कांही चारपांच ग्रंथ आहेत. मुद्रणप्रकाश हें मासिकही चालू आहे.

## मुद्रणालयांतील दर व मुद्रकसंघटना

मुद्रणालयांत छापावयाच्या कामाचे दर सारखे असणें हें धंद्याचें अंग समजलें गेलें आहे. त्यासाठी मुद्रकांचें सहकार्य आवश्यक असते. तेव्हा तेवढ्याच कारणावरून भारतवर्षांत ठिकठिकाणीं मुद्रक-संघटना स्थापन झालेल्या आहेत. परंतु परस्परांतील सहकार्याच्या भावना योग्य तऱ्हेच्या दृष्टिकोनाच्या अभावीं वाढीला लागत नाहीत असें आढळून येतें.

तरी पण जवळजवळ १९१८ सालापासून स्थापन झालेला पुणें मुद्रक संघ आपलें काम धीराधीराने वाढवीत आहे. सर्व दृष्टींनी या मुद्रकसंघटनेने कार्याची सुरवात केली असून त्यांच्या नियमित सभा होत असतात.

कलकत्ता येथे बंगाल मास्टर प्रिंटर्स असोसिएशन ही कार्यक्षम संघटनाही चांगलें काम करीत आहे असें दिसतें. मराठी शालेय पुस्तकांच्या प्रकाशकांची एक संघटना पुण्यामध्ये १९४५ पासून सुरू झालेली आहे.

'संघे शक्तिः कलौ युगे' हें विसाव्या शतकांतील सूत्र भारतवर्षांतील मुद्रकप्रकाशकांच्या हळुहळु लक्षांत येऊं लागलें आहे, हीच आनंदाची गोष्ट आहे.

## ग्रंथालयें वा मुद्रणालयें

मुद्रणालयांत ग्रंथछपाई व ग्रंथबांधणी होते व तींच पुस्तकें ग्रंथालयांत ठेवलीं जातात. ग्रंथांचा उपयोग जास्तींतजास्त प्रमाणांत ग्रंथालयांत होतो.

ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले नसल्यास त्या त्या विषयावरील ग्रंथ ग्रंथालयाला मिळूं शकत नाहीत. ग्रंथालयांच्या कार्यासाठी मुद्रणालयांच्या विविध सुधारणा आवश्यक आहेत एवढें लक्षांत येण्यास हरकत नाही. ग्रंथांची उत्कृष्ट बांधणी हाही ग्रंथालयांना जरूरीचा विषय आहे. मुद्रक व प्रकाशक यांनी ग्रंथालयाबाबत विचार करणें कांही प्रमाणांत आवश्यक आहे एवढेंच तूर्त म्हणावेसें वाटतें.

### आधारभूत ग्रंथ

(१) महाराष्ट्रीय ज्ञानकोश (२) व्यावहारिक शब्दकोश
(३) Printing as Practice (४) कागद
(५) फोटोलिथोग्राफी हँडबुक, इत्यादि —

---

# २. मराठी ग्रंथालयांची उत्पत्ति आणि विकास

## रघुनाथ शतानंद पारखी

**परिचय**—जन्म भोर १९०१. यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें असून यांनी कोलंबिया युनिव्हर्सिटीचा तालिकाकरण-शास्त्र या विषयाचा पत्रव्यवहाराने अभ्यासक्रम पुरा केला व प्राविण्यपत्रक मिळविलें. तसेंच ब्रिटिश ग्रंथालय संघाचा वर्गीकरणशास्त्राचा व तालिकाशास्त्राचा जुन्या अभ्यासक्रमा-प्रमाणे पत्रव्यवहाराने शिक्षणक्रम पुरा केला. यांनी १९३० मध्ये मद्रास विद्यापीठांत ग्रंथालय शास्त्राचें शिक्षण घेतलें व प्रमाणपत्रक मिळविलें. हे १९४८ सालीं भारतीय ग्रंथालय संघाचे उपाध्यक्ष होते. याशिवाय ग्रंथालयविषयक निर-निराळ्या चळवळींत व धंद्यांत यांनी आपुलकीने, धडाडीनें व कळकळीने काम केलें आहे. यांचा ग्रंथालयशास्त्राचा सखोल अभ्यास आहे. यांच्यासारख्या कुशल कार्यकर्त्यांच्या श्रमाचें फळ म्हणजे ग्रंथालय चळवळीचें आजचे स्वरूप होय ! यांनी ग्रंथालयशास्त्राचा ओनामा, डेसिमल ॲण्ड कोलन क्लासिफिकेशन, समरी ॲण्ड कांपोझिशन, रेफरेन्स सर्व्हिस इन लायब्ररीज, प्रिंसिपल ऑफ लायब्ररी क्लासिफिकेशन विथ स्पेशीयल रेफरन्स टू कोलन ॲण्ड डेसिमल क्लासिफिके-शन पार्ट १ हीं ग्रंथालयविषयक पुस्तकें आजपर्यंत प्रसिद्ध केलीं आहेत. यांचा वर्गीकरणपद्धतीचा अभ्यास दांडगा आहे. त्या ज्ञानाचा फायदा आजपर्यंत कितीतरी संस्थांनी त्यांना आग्रहपूर्वक बोलावून घेतला आहे. सध्या हे फर्ग्यूसन कॉलेज ग्रंथालय, पुणें, इथे ग्रंथपाल आहेत.

## आद्य ग्रंथ व ग्रंथकार

ग्रंथालयांची उत्पत्ति साधारणपणें ग्रंथांच्या उत्पत्तिबरोबर होते असें मानलें तर मराठी ग्रंथालयांच्या उत्पत्तीचा काल मराठी ग्रंथ लिहिण्यास सुरुवात ज्या कालांत झाली तो काल समजला पाहिजे. कोणत्याही भाषेंतील आरंभीचे ग्रंथ त्या भाषेच्या उत्पत्तिकालापासून शोधले जातात. प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी यांनी आपल्या "मराठीभाषा–उद्गम व विकास" (१९३३) या ग्रंथांत मराठी भाषेची उत्पत्ति पांचव्या शतकांत झाली असें सिद्ध केलें आहे. या पुस्तकांत पृ. १५१ वर ते म्हणतात.—

"नारदस्मृतींत उल्लेखिलेल्या देशभाषांपैकी एक भाषा जर मराठी धरली तर तिची उत्पत्ति इसवी सनाच्या पांचव्या शतकांत होऊन सातव्या शतकापर्यंत हळूहळू उत्क्रांत होत गेली."

ह्या ग्रंथांत प्रा. कुळकर्णी यांनी मराठींतील कांही शिलालेखांचा व ताम्रपटांचा नामनिर्देश केला आहे. हे ताम्रपट व शिलालेख शके ६०२ पासून शके १०४९ पर्यंतचे म्हणजे इ. स. ६८० पासून इ. स. ११२७ पर्यंतचे आहेत. ह्या काळानंतर मुकुंदराजाचा विवेकासिंधु (इ. स. ११८८), चक्रधरादिकांचें महानुभावी पंथाचें वाङ्मय (इ. स. १२६३) व ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी (इ. स. १२९०) ह्या महान ग्रंथांचा उल्लेख प्रा. कुळकर्णी यांनी वरील ग्रंथांत पृष्ठ १४० वर केला आहे. ह्या सर्व माहितीवरून पुरातनकालीन **मराठी ग्रंथालयांचा उगम निदान मुकुंदराजाच्या विवेकसिंधूपासून म्हणजे साधारणतः इ. स. बाराव्या शतकापासून झाला असें म्हणण्यास हरकत नाही.** त्या काळांतील ग्रंथालयें म्हणजे हस्तलिखित ग्रंथांचे संग्रह होत. अलीकडे त्या काळच्या महानुभावी पंथाच्या व इतर पंथांच्या संतकवींचे कित्येक हस्तलिखित ग्रंथ उप-

लब्ध होत आहेत. याचा अर्थ असा होतो की त्या काळापासून हस्तलिखित ग्रंथांच्या प्रती करून संग्रहित करण्याचा व ते तज्ज्ञांना वाचावयास देण्याचा प्रघात चालू होता. या बाबतींत महाराष्ट्रांतील राजेरजवाडे, सरदार व जहागिरदार यांनी पुरातन काळापासून ग्रंथसंग्रह करण्यास बरेंच उत्तेजन दिलें होतें. त्यांच्या ह्या पिढ्यानुपिढ्या प्रयत्नामुळेच आपणास आज त्या काळच्या हस्तलिखित ग्रंथांचा लाभ होत आहे व त्यांतील कांही ग्रंथ प्रसिद्धही झाले आहेत.

## आद्य ग्रंथालय

बाराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, वगैरे संतशिरोमणींनी महाराष्ट्रांत ज्ञानप्रसाराचें बहुमोल कार्य केलें. श्रीसमर्थ रामदासांनी निरनिराळ्या गावीं मठ स्थापन करून त्या मठांत हस्तलिखित ग्रंथांचीं ग्रंथालयें स्थापन केलीं.

**मराठी हस्तलिखित ग्रंथांचा जुन्यांत जुना असा संग्रह आपणांस आज महाराष्ट्राबाहेर असलेल्या तंजावरच्या सरस्वतीमहाल ग्रंथालयांत पहावयास मिळतो. हें ग्रंथालय सोळाव्या शतकांत स्थापन झालें.** त्याची स्थापना नायक राजांनी केली. नायक राजांनंतर १६७५ ते १८५० पर्यंत तंजावरचें राज्य मराठ्यांच्या ताब्यांत होतें. तेथील मराठी राजांनी ह्या ग्रंथालयाचा ग्रंथसंग्रह वाढविण्यांत विशेष लक्ष घातलें व तें हिंदुस्थानांतील एक महत्त्वाचें ग्रंथालय केलें. तंजावर राज्याचा शेवटला मराठा राजा महाराजा सरफोजी याने ह्या ग्रंथालयाच्या प्रगतीकरितां अत्यंत प्रयत्न केले. तेथील ताडपत्रांवरील व कागदावरील हस्तलिखितांचा संग्रह अदमासें २७००० आहे. ह्या ग्रंथांत संस्कृत, मराठी, तामीळ, तेलगू, कानडी वगैरे भाषांतील दुर्मिळ हस्तलिखित ग्रंथ आहेत.

## पेशवाई कालीन ग्रंथसंग्रह

पेशव्यांच्या कारकीर्दीचे सुरुवातीस ग्रंथसंग्रहाची आवश्यकता विशेष भासूं लागली व पेशव्यांनीही त्याला बरेंच प्रोत्साहन दिलें. इ. स. १७०८ मध्ये छत्रपती शाहूमहाराज हे जेव्हा सातारच्या गादीवर आले तेव्हा महाराष्ट्रांत चहूकडे शांतता होती व तीमुळे लोकांना उत्साहानें ग्रंथसंग्रह करतां आला. मराठी राज्याची सर्व जबाबदारी जेव्हा पेशव्यांवर आली तेव्हा त्यांनी "पुस्तक शाळा" हें राज्याच्या कारभाराच्या अठरा खात्यांपैकी एक खातें केलें.

श्री वा. कृ. भावे यांनी आपल्या "पेशवेकालीन महाराष्ट्र" (१९३५) या ग्रंथांत तत्कालीन "ग्रंथसंग्रह व ग्रंथवाचन" या विषयावर एक स्वतंत्र प्रकरण दिलें आहे (पृ. ९९ ते ११०). या प्रकरणांत श्री. भावे म्हणतात.—

" विद्येच्या प्रसारास मुख्य हरकत पुस्तकांची. त्या काळीं मुद्रण-कला माहीत नसल्यामुळे पुस्तक ही चीज फार मौल्यवान व दुर्मिळ होती. पुस्तकें सामान्यतः शास्त्री, पंडित, पुराणिक, वैदिक, वृत्तिवान् जोशी, यांजपाशीं असत. त्यांच्या खालोखाल घरंदाज गृहस्थांपाशीं सापडत सरदार, जहागिरदार व राजेरजवाडे यांचा सामाजिक दर्जा सर्वांत श्रेष्ठ व त्यांचें कार्यहि अत्यंत जिव्हाळ्याचें. या कारणानें त्यांजपाशीं ग्रंथसंग्रह साहजिकच मोठा. पेशवाईच्या प्रारंभीं महाराष्ट्रांत पुस्तकांची वाण फारच भासत होती. खुद्द राजे परागंदा झाल्यामुळे देशांत सर्व बाजूंनी बखेडाच माजला असून महाराष्ट्र इतर प्रांतांच्या मानानेहि मागासलेला होता. शाहू महाराज सातार्‍याच्या गादीवर येऊन बसले व त्यांच्या राज्यकारभाराला स्थैर्य मिळत चाललें, त्याबरोबर ग्रंथसंग्रहाचा उद्योग मोठ्या उत्साहाने सुरू झाला. मराठी राज्याचा भार पेशवे घराण्यावर ज्या प्रमाणांत अधिक

पडत चालला त्या प्रमाणांत त्यांनी ग्रंथसंग्रहाचें कार्य मनावर घेऊन हळूहळू आपल्या अटरा कारखान्यांत पुस्तकशाळेसहि स्थान दिलें."

पहिले बाजीराव पेशवे, नवीन बांधलेल्या शनिवारवाड्यांत जेव्हा रहावयास आले तेव्हा त्यांनी पेशव्यांच्या पुस्तकसंग्रहास सुरवात केली व हें ज्ञानसंग्रहाचें पवित्र कार्य सुमारें एक शतकपर्यंत म्हणजे पेशवाईच्या अखेरपर्यंत म्हणजे इ. स. १८१८ पर्यंत मोठ्या जोमाने व अखंडपणें चालू होतें.

पेशव्यांच्या वेळीं खुद्द पेशव्यांनासुद्धा ग्रंथसंग्रह करणें फार कठीण काम होतें. त्यांना ग्रंथ मिळविण्याकरितां कित्येक वेळीं आपलें वजन निरनिराळया प्रकारें उपयोगांत आणावें लागत असे. एखादें साधें पुस्तक जर दृष्टीस पडलें तर तें मिळविण्यास फार त्रास पडत असे. ह्या कारणास्तव मोठ्या प्रयत्नाने ग्रंथ उसनवार घेतले जात व त्यांच्या नकला करून त्यांच्या मालकांकडे टराविक अवधीनंतर ते परत करावे लागत. पेशव्यांनी महाराष्ट्राच्या निरनिराळया मुख्य केंद्रावर ग्रंथसंग्रह करण्यांत व ग्रंथांच्या नकला करण्यांत जे लोक तरबेज होते त्यांची मुद्दाम ह्या कामावर नेमणूक केली होती; आणि पुस्तकशाळेकरितां पुस्तकें खरेदी करण्यासाठी नियमितपणें पत्रव्यवहार चालू असे.

पहिले बाजीराव पेशवे जसे युद्धकलेंत निष्णात होते तसे ते विद्येचेही मोठे उपासक होते. त्यांची ज्ञानपिपासा नुसते पुराण ग्रंथ वाचून भागत नसे; त्यांना वेदान्त विषयाचीसुद्धा फार आवड होती. ते ब्रह्मेन्द्र स्वामींचे शिष्य होते ही एकच गोष्ट पारमार्थिक ज्ञानाकडे त्यांचा विशेष ओढा होता हें दाखविण्यास पुरी आहे. ते दरवर्षी ब्राह्मणांस हजारों रुपये दक्षणा म्हणून देत; यावरून त्यांना 'वेदविद्येचा' अभिमान होता हें सिद्ध होतें. ते आपला रिकामा वेळ पुस्तकें जमविण्यांत व तीं वाचण्यांत घालवीत असत. ह्या बाबतींत त्यांना

पिलाजी जाधवाची चांगली मदत होत होती. ते स्वारीवर जात तेव्हा आपल्या बरोबर निवडक ग्रंथ घेऊन जात.

बाजीरावानंतर त्यांचा मुलगा नानासाहेब यांनीहि पुस्तकशाळेचें महत्त्वाचें कार्य पुढे चालू ठेवलें व महाराष्ट्राच्या निरनिराळया कान्याकोपऱ्यांतून ग्रंथ मिळविण्याचे अटोकाट प्रयत्न केले व बराच ग्रंथसग्रह वाढवला. उदेपूर दरबारांतून कांही महत्त्वाच्या ग्रंथांच्या प्रती सुद्धा त्याने मिळविल्या. ह्यावरून वडिलांचें पुस्तकांवरील प्रेम मुलामध्ये अगदी तंतोतंत उतरलें होतें हें उघड दिसतें.

पेशव्यांनी पुस्तकसंग्रह जमविण्याकरितां व वाढविण्याकरितां जी कळकळ व आवड दाखविली तीमुळे महाराष्ट्रांत त्याकाळीं ग्रंथसंग्रह जमविण्याचें कार्य व त्यांच्या देवघेवी करण्याचें कार्य मोठ्या जोमाने चालू होतें. हीच त्यावेळची ग्रंथालय चळवळ असें म्हणण्यास हरकत नाही.

## आंग्लशाहींतलें ग्रंथालयांचें स्वरूप

ब्रिटिशांचा अंमल हिंदुस्थानांत सुरू झाल्यापासून मुद्रित वाङ्मय निर्माण होणें सुलभ झालें व त्यामुळे थोडेबहुत मराठी ग्रंथ प्रतिवर्षी प्रसिद्ध होऊं लागले. परंतु शिक्षणाच्या प्रगतीकडे सरकारचें विशेष लक्ष नसल्यामुळे जशी समाजाच्या शिक्षणाची आबाळ झाली तशीच मराठी वाङ्मयनिर्मितीची व पर्यायाने मराठी ग्रंथालयांच्या प्रसाराची आबाळ झाली. इंग्रजी राज्यात इंग्रजी वाङ्मयाचें प्राबल्य फार वाढलें. त्यामुळे सुरवातीला जीं ग्रंथालयें स्थापलीं गेलीं त्यात इंग्रजी ग्रंथांचाच भरणा जास्त होऊं लागला.

मुंबई प्रांतांतलें इंग्रजांच्या राजवटीतलें व इंग्रजी विद्वानांच्या नेतृत्वाने निघालेलें पहिलें ग्रंथालय बॉंबे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटीचें ग्रंथालय हें होय. या ग्रंथालयाची स्थापना

इ. स. १८०५ मध्ये झाली. ह्या ग्रंथालयांत अदमासें २,५०,००० ग्रंथसंग्रह असावा. त्यांत कांही निवडक मराठी पुस्तकांचाही संग्रह असावा असें वाटतें. ह्या ग्रंथालयाचें मुंबई राज्याचें "मध्यवर्ति ग्रंथालय" म्हणून रूपांतर इ. स. १९४७ मध्ये करण्यांत आलें आहे. ह्या ग्रंथालयाच्या स्थापनेनंतर जनतेंतील सुशिक्षित नागरिकांनी जिल्ह्याच्या व तालुक्यांच्या मुख्य शहरांतून वर्गणी ग्रंथालयें स्थापण्यास सुरवात केली. प्रथम प्रथम मराठी छापील ग्रंथ अगदी अल्प प्रमाणांत निघत असल्यामुळे इंग्रजी ग्रंथांचा व नियतकालिकांचा संग्रह ह्या ग्रंथालयांतून होऊं लागला व पुढे मराठी ग्रंथनिर्मिति जशी वाढूं लागली त्या प्रमाणे अधिकाअधिक मराठी ग्रंथ घेण्याकडे ग्रंथालयांच्या चालकांचें लक्ष वेधलें. मुंबई सरकारच्या ग्रंथालय प्रसार योजनेप्रमाणे वरील बहुतेक ग्रंथालयें आता जिल्हा केन्द्र व तालुका केन्द्र ग्रंथालयें झालीं आहेत. व त्यांच्या तोडीचीं इतर गावांतून व शहरांतून असलेलीं ग्रंथालयें सुद्धा त्या सरकारच्या योजनेमध्ये हळूहळू गोवलीं जाण्याचा संभव आहे. आता आपला भारत देश स्वतंत्र राष्ट्र असल्यामुळे आपल्या मातृभाषांतील ग्रंथनिर्मिति मोठ्या जोराने वाढूं लागली आहे व त्यामुळे वरील ग्रंथालयांतून मराठी ग्रंथांची भर चांगली होण्याचा विशेष संभव आहे.

देवनागरी लिपींत मराठी ग्रंथ छापण्याला इ. स. १८०५ मध्ये श्रीरामपूर येथे सुरवात झाली. त्या वर्षी डॉ. वुइल्यम कॅरेकृत Grammar of the Marathi Language हा ग्रंथ श्रीरामपूर येथे देवनागरी लिपींत छापला गेला. तत्पूर्वी रोमी लिपींत ख्रिश्चन मिशनऱ्यांनी ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराच्या निमित्ताने मराठी भाषिकांकरिता रोमी लिपींत बरेच ग्रंथ गोव्यांत व इतरत्र छापून प्रसिद्ध केले. त्यांतील पहिला ग्रंथ पाद्री तोमास इस्तेव्हम् ( फादर थोमस स्टिपन्स )

यांचें ख्रिस्त पुराण हा होय. हा ग्रंथ इ. स. १६१६ मध्ये छापला. त्या ग्रंथानंतर श्रीरामपुरांत कांही ग्रंथ मोडी लिपींत छापले गेले. इ. स. १८१३ मध्ये अमेरिकन मिशन मुंबईमध्ये आलें व १८१७ पासून त्यांनी मराठींत पुस्तकें छापण्यास सुरवात केली. इ. स. १८२३ मध्ये कुरीयर प्रेसमध्ये "विदुर नीति" हें पुस्तक छापलें. यानंतर पुढे हळू हळू मराठी ग्रंथप्रकाशनाचें कार्य वाढूं लागलें व लोकांना मराठी छापील पुस्तकें व नियतकालिकें मिळूं लागलीं. इ. स. १८३२ मध्ये कै. बाळशास्त्री जांभेकर यांनी "दर्पण" नांवाचें मराठी व इंग्रजी भाषांचें सम्मिश्र नियतकालिक सुरू केलें. हेंच मराठीचें पहिलें नियतकालिक असें म्हणण्यास हरकत नाही.

## ग्रंथालय चळवळीचे पुरस्कर्ते

महाराष्ट्रांत इ. स. १८०५ नंतर जीं ग्रंथालयें गांवोंगावीं स्थानिक नागरिकांच्या प्रयत्नाने स्थापिलीं जात होतीं, त्यांच्या स्थापनेस व प्रगतीस तत्कालीन जे महाराष्ट्रीय नेते विशेषत्वाने नावाजलेले होते, त्यांचा थोडाफार हातभार लागला असला पाहिजे. ह्या विषयीची अस्सल माहिती महाराष्ट्रीय प्रमुख नेत्यांच्या चरित्रांतून, महाराष्ट्राच्या इतिहासांतून व त्या पिढींतील सध्या जिवंत असलेल्या व्यक्तींकडून मिळविली पाहिजे. ही माहिती संकलित करून जर प्रसिद्ध केली तर तिची महाराष्ट्राच्या ग्रंथालयांच्या इतिहासांत चांगली भर पडेल.

महाराष्ट्रांत एकोणिसाव्या शतकांतले वाङ्मय निर्मितीचे तीन कालखंड मानले जातात. त्या कालखंडांत जे ग्रंथकार प्रामुख्याने नांवाजले गेले होते त्यांनी ग्रंथालयांच्या प्रसाराचे बाबतींत कांही प्रयत्न केले असणें अगदी साहजिक आहे.

इ. स. १८२० पासून १८६० पर्यंत सदाशिव काशिनाथ उर्फ बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, हरि केशवजी, दादोबा पांडुरंग, परशुराम तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गणेशशास्त्री लेले, कृष्णशास्त्री राजवाडे, महादेवशास्त्री कोल्हटकर, इत्यादि ग्रंथकार व नेते प्रमुख होते.

इ. स. १८६० ते १८७४ पर्यंत विनायक जनार्दन कीर्तने, मोरोबा कान्होबा, रिसबूड, हळबे शास्त्री, बाबा पदमनजी व रा. ब. गोपाळ हरि देशमुख उर्फ लोकहितवादी इत्यादि ग्रंथकार व नेते विशेष नांवाजले गेले.

इ. स. १८७४ पासून आतापर्यंत मुख्यत्वें विष्णुशास्त्री चिपळूणकर, लो. टिळक, श्री. आगरकर, इतिहास संशोधक वि. का. राजवाडे, शिवरामपंत परांजपे, नरसिंह चिंतामण केळकर, चिंतामण-राव वैद्य, वगैरे बरेच नामांकित ग्रंथकार व नेते विशेषत्वाने नांवाजले गेले आहेत.

वरील नेत्यांनी आपापल्या काळांत ग्रंथालयांच्या प्रसाराचें काम केलें होतें असें म्हणण्यास हरकत नाही.

कै. साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांना ग्रंथालयांविषयी विशेष कळकळ वाटत होती हें त्यांच्या "ज्ञानाचीं सदावर्तें" या स्फूर्तिदायक अग्रलेखावरून सिद्ध होतें. त्यांनी इ. स. १९३४ मध्ये केसरी–मराठा ग्रंथालयाला व्यवस्थित स्वरूप दिलें; व त्यांनी महा-राष्ट्रांतील ग्रंथालय चळवळीला प्रामुख्याने पाठिंबा दिला. त्यांच्या वरील लेखाचा बऱ्याच महाराष्ट्रीयांच्या मनावर उत्तम परिणाम होऊन इ. स. १९१२ मध्ये पुणें येथील अनाथ विद्यार्थी–गृहाचे संस्थापक श्री. वि. ग. केतकर यांनी पर्वती मोफत वाचनालयाची

स्थापना केली. त्यानंतर श्री. द. वा. जोशी व त्यांचे स्नेही यांनी महाराष्ट्रांत ग्रंथालय चळवळीचा अटोकाट प्रयत्न केला. श्री. जोशी यांचें या चळवळीचें कार्य अजून चालू आहे. सध्या मुंबई राज्यांत ग्रंथालयांच्या प्रसाराचें कार्य मुंबई राज्याचे मुख्य मंत्री मान्यवर बाळासाहेब खेर यांच्या प्रेरणेने इ. स. १९४७ पासून स्पृहणीयपणें चालू आहे. या कार्याकरितां मुंबई राज्यांतील ग्रंथालयाचे प्रथम प्रमुख (Curator) श्री. कर्वे यांची कामगिरी विशेष नांवाजण्याजोगी झाली आहे. थोडया अवधींत त्यांनी सर्व महाराष्ट्रांत बरींच ग्रंथालयें उघडण्याचें कार्य केलें. आता या सर्व कार्याचें नेतृत्व ग्रंथालयांचे नवीन नेमलेले प्रमुख श्री. वाकनीस यांचेकडे आलें आहे. श्री. वाकनीस यांचा बडोदें राज्यांतील ग्रंथालयांचे प्रमुख म्हणून बऱ्याच वर्षांचा अनुभव या मोठ्या जबाबदारीस चांगला उपयोगी पडेल यांत संदेह नाही.

## ग्रंथालयांची स्थापना

येथपर्यंत आपण महाराष्ट्रांतील ग्रंथालयांच्या प्रसाराच्या कार्याचा त्रोटक विचार केला, आता महाराष्ट्रांत जीं प्रमुख ग्रंथालयें स्थापलीं गेलीं त्यांचा थोडक्यांत आढावा घेऊ.

इ. स. १८४० मध्ये नाशीक येथे सार्वजनिक वाचनालय स्थापन झालें. हेंच महाराष्ट्रांतील पहिलें सार्वजनिक वाचनालय होय. हें ग्रंथालय पेशव्यांच्या जुन्या वाडयांतील भव्य दिवाणखान्यांत आहे. ह्या ग्रंथालयाचें आता मुंबई राज्याच्या ग्रंथालय प्रसार योजनेप्रमाणे जिल्हा ग्रंथालयांत रूपान्तर झालें आहे.

महाराष्ट्रांतील दुसरें महत्वाचें ग्रंथालय म्हणजे पुण्यांतील नगर वाचन मंदिर. याची स्थापना इ. स. १८४८ मध्ये त्यावेळचे लोकाग्रणी

रावबहादुर गोपाळराव हरि देशमुख यांच्या पुढाकाराने झाली. या ग्रंथालयांत इंग्रजी ग्रंथांबरोबर मराठी निवडक ग्रंथ व नियतकालिकें घेतलीं जातात.

इ. स. १८५० मध्ये कोल्हापुरांत करवीर वाचन मंदिर स्थापण्यांत आलें. इ स. १८५२ मध्ये सातार्‍यांत व्हिक्टोरिया ग्रंथालयाची स्थापना झाली.

## ग्रंथ निर्मिती

वरील प्रमाणें ज्यांना प्रथम नेटिव्ह जनरल लायब्रर्‍या असें संबोधण्यांत येत असे, अशीं सार्वजनिक वर्गणीग्रंथालयें व वाचनालयें महाराष्ट्रांत निरनिराळ्या शहरांतून, लहान-मोठया तालुका, पेठा व इतर गावांतून सरकारी अधिकार्‍यांच्या प्रोत्साहनाने हळू हळू स्थापन करण्यांत आलीं. या ग्रंथालयांतून इंग्रजी ग्रंथांचा भरणा मोठया प्रमाणांत करण्यांत आला व मराठी ग्रंथ अगदी थोडया प्रमाणांत संग्रहित करण्यांत आले. याचें मुख्य कारण एकोणिसाव्या शतकांत मराठी ग्रंथनिर्मिती फारच थोडया प्रमाणांत झाली. त्या शतकांत या मराठी ग्रंथनिर्मितीचे टप्पे साधारणपणें पुढील प्रमाणें होत.

| काल | प्रकाशित ग्रंथांची संख्या |
|---|---|
| (१) सन १८१८ ते १८५७ | १४५ |
| (२) १८५७ ते १८६४ | ५५० |
| (३) १८६४ ते १८९४ | ६००० |

वरील माहिती ठाणें येथे प्रसिद्ध होणार्‍या "सन्मित्र" ह्या वर्तमानपत्राच्या ग्रंथालय विशेषांकांच्या (१९ जानेवारी १९५०) पृ. ९ वरून घेतली आहे.

केवळ मराठी ग्रंथांचा संग्रह करणाऱ्या ग्रंथालयांची सुरुवात प्रथम ठाणें येथील "मराठी ग्रंथसंग्रहालया" च्या स्थापनेपासून म्हणजे इ. स. १८९३ पासून झाली. ह्या ग्रंथालयाची स्थापना सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक कै. विनायकराव भावे व त्यांचे इतर सहकारी यांच्या पुढा-काराने झाली. या ग्रंथालयाच्या स्थापनेनंतर मुंबईत "मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय" इ. स. १८९६ मध्ये स्थापन झालें व पुण्यांत इ. स. १९११ मध्ये "पुणें मराठी ग्रंथसंग्रहालय" स्थापन झालें. इ. स. १९४७ मध्ये मुंबई सरकारच्या ग्रंथालय प्रसाराच्या योजनेप्रमाणे पुण्यांत "महाराष्ट्र ग्रंथालया"ची स्थापना झाली. या ग्रंथालयांत मुंबई सरकारच्या दप्तरखान्यांत जे मुद्रणाधिकार कायद्यामुळे मराठी ग्रंथ संग्रहित केलेले होते ते सर्व आणविण्यांत आले आहेत व त्या ग्रंथा-लयाच्या स्थापनेपासून पुढे मराठींत प्रसिद्ध होणारे सर्व ग्रंथ त्या ग्रंथालयांत वरील कायद्याप्रमाणे प्रकाशकांकडून पाठविण्याची व्यवस्था झालेली आहे. या व्यवस्थेमुळे मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांची फार उत्तम सोय झालेली आहे. कांही दुर्मिळ ग्रंथ या ग्रंथालयांत नाहीत. ते मिळवून या ग्रंथालयांतला संग्रह अद्यावत् करणें फार आवश्यक आहे. पुणें येथे मराठी साहित्य परिषदेच्या कार्यालयांत नुकतेंच केवळ मराठी ग्रंथालय स्थापण्यांत आलें आहे. हें ग्रंथालय कांही काळाने मराठी निवडक ग्रंथांचा व कालिकांचा मौल्यवान संग्रह करण्यास समर्थ होईल अशी खात्री वाटते.

## स्वातंत्र्यांतील आशास्थानें

मुंबई राज्याच्या प्रौढशिक्षण योजनेनुसार महाराष्ट्रांतील खेड्यांतून इ. स. १९४८ डिसेंबरपर्यंत पुढील प्रमाणे लहान लहान ग्राम वाचनालयें स्थापण्यांत आलेलीं आहेत.

| जिल्ह्याचें नांव | ग्राम वाचनालयांची संख्या |
|---|---|
| (१) पुणें | १७४ |
| (२) सातारा | ३५७ |
| (३) सोलापूर | १४४ |
| (४) अहमदनगर | १९५ |
| (५) पूर्व खानदेश | २३५ |
| (६) पश्चिम खानदेश | ५७ |
| (७) मुंबई सबर्बन | ३ |
| (८) कुलाबा | ३१ |
| (९) रत्नागिरी | ११३ |
| (१०) ठाणें | २२ |
| (११) नाशिक | ५५ |
| | एकंदर १३८६ वाचनालयें |

वरील माहिती बांबे गव्हर्नमेंट गॅझेट भाग १, दि. २३ डिसेंबर, १९४८ मध्ये छापलेली आहे.

युद्धोत्तर पुनर्रचना योजनेनुसार स्थायी वाचनालयें व फिरतीं वाचनालयें उघडण्यांत आलीं आहेत. तसेंच मुंबई, अहमदनगर, सोलापूर, खानदेश, हुबळी या शहरांतील कामगार उत्कर्ष केन्द्रांतून कामगारांच्या गरजांनुसार वाचनालयें चालविण्यांत आलीं आहेत. हरिजन सेवक संघानें गावोगावीं हरिजनांकरिता वाचनालयें उघडलीं आहेत. हें त्या संघाचें कार्य आज कित्येक वर्षे चालू आहे. या सर्व वाचनालयांतून मराठी पुस्तकांचा व नियतकालिकांचा भरणा विशेष होत आहे.

महाराष्ट्राची व्याप्ति डॉ. वि. पां. दांडेकर यांनी आपल्या 'महाराष्ट्र' या ग्रंथांत (पृ. १) पुढील प्रमाणे निवेदन केली आहे.

"नागपूर चांद्यापासून ते खाली कारवारपर्यंत आणि तेथून वर डहाणू दमणपासून ते परत नागपूर चांद्यापर्यंत जो त्रिकोण होतो व ज्यांत मराठी भाषा बोलणारे शेकडा ८० ते ९० लोक राहतात, तो भाग महाराष्ट्र म्हणून मी नजरेसमोर ठेवला आहे."

सध्याच्या मुंबई राज्याच्या कक्षेंतल्या महाराष्ट्रांत १३ जिल्हे येतात, या प्रत्येक जिल्ह्यांत सरकारी योजनेनुसार जिल्हा ग्रंथालयें स्थापलीं असून बॉंबे गव्हर्नमेंट गॅझेट, दि. २७ एप्रिल १९५० पृष्ठ १२९१ ते १२९३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे पुढील मुलकी व पेटा ग्रंथालयांना मान्यता देण्यांत आली आहे.

| जिल्ह्याचें नांव | ग्रंथालयांची संख्या |
|---|---|
| (१) मुंबई उपनगर | २ |
| (२) ठाणें | ८ |
| (३) कुलाबा | १० |
| (४) रत्नागिरी | १३ |
| (५) नाशीक | ६ |
| (६) पुणें | १० |
| (७) अहमदनगर | ४ |
| (८) उत्तर सातारा | ४ |
| (९) दक्षिण सातारा | ४ |
| (१०) सोलापूर | ८ |
| (११) पूर्व खानदेश | ९ |
| (१२) पश्चिम खानदेश | ७ |
| (१३) कोल्हापूर | ४ |
| एकंदर | ८९ |

## कांही समृद्ध ग्रंथालयें

सध्याच्या महाराष्ट्राच्या बाहेरील प्रदेशांत म्हणजे दक्षिण हैद्राबाद, मध्य प्रदेश, मध्य भारत संघराज्य या प्रदेशांतील हैद्राबाद, नागपूर, इंदूर, वगैरे कित्येक शहरांतून व बडोदें शहरांत मराठी ग्रंथालयें उत्तम प्रकारें चाललेलीं आहेत व तेथे मराठी वाङ्मयाचा संग्रहसुद्धा चांगल्या प्रतीचा पहावयास सापडतो.

वर निवेदन केल्याप्रमाणे सार्वजनिक स्वरूपाचीं वर्गणी ग्रंथालयें सोडून महाराष्ट्रांतल्या शिक्षणसंस्थांतून व पुण्यांतील (१) केसरी मराठी ग्रंथालय, (२) भारत इतिहास संशोधक मंडळ (३) महाराष्ट्र कोश कार्यालय, (४) धुळयांतलें समर्थ वाग्देवता मंदिर अशा संस्थांतून मराठीचा ग्रंथसंग्रह चांगल्या प्रकारें करून ठेवलेला आहे. बडोद्याच्या सेंट्रल लायबरींतला मराठी पुस्तकांचा संग्रह बराच मोठा आहे. मराठी ग्रंथसूचिकर्ते श्री. दाते यांनी तर स्वतः अत्यंत कष्ट सोसून मराठी दुर्मिळ ग्रंथांचा उत्तमोत्तम ग्रंथसंग्रह करून ठेवला आहे. त्यांचें मराठी ग्रंथसूचीचें कार्य बहुमोल झालें आहे व तें कार्य त्यांनी अखंडपणें चालू ठेवलें आहे. त्यांची १९३७ पासून १९५० पर्यंतची ग्रंथसूचि व नियतकालिकांतील लेखांची सूचि प्रकाशित होणें फार आवश्यक आहे. एका व्यक्तीने प्रदीर्घकाल झटून स्वखर्चाने व स्वकष्टाने कांही गाजावाजा न करतां केलेलें हें कार्य महाराष्ट्रास भूषणावह आहे.

## ग्रंथालयांची चळवळ व ग्रंथालय संघ

आतापर्यंत मराठी ग्रंथालयांच्या स्थापनेचे, त्यांच्या वाढीचे व त्यांना लागणाऱ्या वाङ्मयनिर्मितीचे प्रयत्न महाराष्ट्रांत कसे चालले आहेत याचा धावता आढावा या लेखांत घेतला आहे. या

लेखाचा विषय मराठी ग्रंथालयांची उत्पत्ति व विकास हा असल्यामुळे महाराष्ट्रांतील ग्रंथालयांच्या चळवळीचा सविस्तर उहापोह या लेखांत करणें योग्य होणार नाही. तरीपण मराठी ग्रंथालयांची संघटना करण्याकरितां केवळ मराठी ग्रंथालयांची चळवळ करणारा मराठी ग्रंथालय संघ महाराष्ट्रांत असणें फार आवश्यक आहे व असा संघ कांही वर्षांमागे मुंबईतील मुंबई मराठी ग्रंथालयाचा चालक वर्ग व ठाण्यांतील कांही मंडळी यांनी काढला होता. तो संघ सध्या नवीन स्थापन झालेल्या "महाराष्ट्र ग्रंथालय संघां"त विलीन झाला आहे असें समजतें. तरी सुद्धा हें कार्य महाराष्ट्र ग्रंथालय संघाला पुढे चालू ठेवणें शक्य होईल. या संघाने महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेरील निरनिराळया ग्रंथालयांतून जे महत्वाचे ग्रंथ आहेत व कालिकें आहेत त्यांची संकलित सूचि तयार करावी व मराठी ग्रंथांची अभ्यासकांना गावोगावीं देवघेव करण्याची व्यवस्था करावी. मराठी ग्रंथालयाच्या व्यवस्थेचें कार्य शास्त्रोक्त पद्धतीने व्हावें म्हणून पुणें ग्रंथालय संघाने जसा उन्हाळयांत ग्रंथालय शिक्षण वर्ग चालवला आहे तसे वर्ग महाराष्ट्रांतील निरनिराळया केन्द्रांत उघडावयास पाहिजेत. ग्रंथालय शास्त्रावर तज्ज्ञ ग्रंथपालांनी वाङ्मय निर्माण करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. ग्रंथालय चळवळीला वाहिलेलें एखादें मराठी नियतकालिक निघणें फार आवश्यक आहे.

## सरकारी योजनेची दिशा

सरकारी योजनेप्रमाणे महाराष्ट्रांत ग्रंथालयाचीं केन्द्रें उघडण्याकरितां सरकारने नेमलेले ग्रंथालय उपप्रमुख (Asst. Curator) श्री. भागवत यांना गेलें वर्ष-दीड वर्ष महाराष्ट्रांतील निरनिराळया जिल्ह्यांच्या व तालुक्यांच्या केन्द्रांत जाण्याची जी संधी मिळाली तीमुळे त्यांना महाराष्ट्रांत ग्रंथालय प्रसाराचे विविध प्रयत्न कसे चालू

आहेत याचें प्रत्यक्ष ज्ञान मिळालें आहे. त्यांनी ग्रंथालयाच्या प्रगती-करितां आस्थेने झटणारे कार्यकर्ते महाराष्ट्रांतील कित्येक ठिकाणीं पाहिले व त्यांचे या कार्याबद्दलचे प्रयत्न पाहून श्री. भगावत यांना विशेष कुतूहल व आश्चर्य वाटलें. यावरून महाराष्ट्रांतील ग्रंथालयसंघटनेला हा काळ फार सोयीचा असल्यामुळे जनतेकडून व सरकारकडून या कार्याला जितकें प्रोत्साहन मिळेल तितकें हें समाजाची ज्ञानपिपासा भागविण्याचें व वाढविण्याचें महाकार्य जास्त जोराने चालणार आहे.

## कांही महत्त्वाच्या सूचना

या लेखांत विशद केल्याप्रमाणे मराठी ग्रंथालयांचा प्रसार जरी मोठ्या प्रमाणांत होत आहे असें दिसलें तरी त्या ग्रंथालयांना ग्रंथाचा व कालिकांचा भरपूर पुरवठा होण्यास मराठी वाङ्मयनिर्मिती प्रतिवर्षी हजारोंनी वाढत गेली पाहिजे. नवीन नवीन विषयांवर एका मागून एक असे उत्तमोत्तम ग्रंथ प्रसिद्ध झाले पाहिजेत व ते शहरा-पासून खेडयापर्यंत प्रत्येक नागरिकाला सहज सुलभ व्हावयास पाहिजेत. हें साधावयास मोफत मुक्तद्वार ग्रंथालयांचा व वाचनालयांचा प्रसार जोमाने व उत्साहाने झाला पाहिजे. या कार्याला वाहून घेणारे लोक बहुसंख्येने पुढे आले पाहिजेत. मुंबई सरकारने ग्रंथालयांचा कायदा जर लवकर अमलांत आणला तर ग्रंथालयांच्या प्रसाराच्या कार्याला वळण लागेल, अडचण भागविण्याची सोय होईल; कारण त्या कायद्याप्रमाणे जनतेकडून स्थानिक स्वराज्य संस्थांना ग्रंथालय कर घेतां येईल व त्याच्या उत्पन्नांतून मोफत ग्रंथालयें चालविणें अगदी सुलभ होईल. या कायद्यामुळे ग्रंथालयांची संघटना चांगली होईल व ग्रथालयाच्या प्रगतीचें व वाचकांच्या गरजा भागविण्याचें बरेंच कार्य सुसंघटितपणे करता येईल.

---

# ग्रंथालयांची चळवळ व तिची प्रगती

जगन्नाथ बाळकृष्ण बुधकर

**परिचय**—जन्म १९१३ मसूर (सातारा). हे एम्. ए., डिप्. लिब्. असून यांचा ग्रंथालयविषयक अभ्यास बराच दांडगा आहे. हे निरनिराळ्या ग्रंथालयविषयक चळवळीचे कुशल कार्यकर्ते आहेत. हे पुणें ग्रंथालय संघाचे सदस्य व पुणें ग्रंथपालनवर्गाचे अध्यापक असून महाराष्ट्र ग्रंथालय परिषद पुणें हिचे चिटणीस होते. सध्या हे वाडिया कॉलज पुणें येथील ग्रंथालयांत क्यूरेटर आहेत.

## प्रास्ताविक

"न हि ज्ञानेन सदृशम् पवित्रमिह विद्यते" हें सुभाषित सर्वांच्या अगदी जिव्हाग्रावर आहे. ज्ञानाची महती सांगणारीं असंख्य वचनें जगाच्या बोलभाषांतून काढून देतां येतील. ज्ञानार्जन व ज्ञानवर्धन यांचा इतिहास हा मानवाइतकाच जुना आहे. माणूस रानटी अवस्थेंतून जसजसा उत्क्रांत होऊं लागला तसतसें त्याने मिळविलेलें ज्ञान संग्रहित करण्यास सुरुवात केली—मातीच्या विटा, दगड, कातडीं, ताम्रादि धातू, भूर्जपत्रें, ताडपत्रें, गवतापासून तयार केलेला कागद आदि अनेक साधनांनी स्वतःसाठी व भावी पिढीसाठी त्याने ज्ञानसंग्रह केला. या अर्थाने ग्रंथालयांची चळवळ फार पुरातन आहे. अशा रीतीने हें लिखित ज्ञान संग्रहित करण्यासाठी विविध राष्ट्रांनी ग्रंथालयें पण उभारलीं व जिज्ञासूंना त्यांचा उपयोग व्हावा येवढया-

साठी ग्रंथांच्या याद्या आदि साधनें पण उपलब्ध करून दिलीं. बॅबिलोनिया, ॲसिरिया, इजिप्त, नालंद इ. ठिकाणच्या ग्रंथालयांचें वर्णन आपण वाचल्यास ही चळवळ फार जुनी आहे अशी आपली खात्री पटेल.

असें म्हणतात की अलेक्झांड्रिया येथील पुरातन ग्रंथालयाचे प्रवेशद्वारावर 'Hospital of the Soul' 'आत्म्याचें इस्पितळ' असे शब्द कोरलेले होतें. ग्रंथालयाचें, व्यक्तिगत जीवनांत व पर्यायाने राष्ट्रीय दृष्ट्या, केवढें उच्च स्थान त्या वेळीं मानलें गेलें होतें हें आपणांस कळून येतें.

ग्रंथाचें संरक्षण व त्यांची पुत्रवत् निगा घेणाऱ्या किती तरी मोठ्या लोकांचीं उदाहरणं आपणांस माहीत आहेत. आमच्या सुभाषितकारांनी तर एक मार्मिक सुभाषित रचून 'ग्रंथांचें त्याच्या शत्रूंपासून संरक्षण करा' असें मोठ्या खुबीने सुचविलें आहे —

> तैलाद्रक्षेत्, जलात् रक्षेत् रक्षेत् शिथिलबंधनात् ।
> मूर्खहस्ते न दातव्यम् एवं पुस्तकरक्षणम् ।

अशा तऱ्हेने ग्रंथप्रेम, त्यांची संपादणी व ज्ञानार्जन यांचा हव्यास अनादिकालापासून चालूच आहे.

## आधुनिक ग्रंथालयांची चळवळ

पूर्वकालीं विद्येचा मक्ता एका विशिष्ट वर्गाचे हातीं राहिल्याने इतर जनता निरक्षर असे. परंतु अठरावे शतकापासून किंबहुना त्याहून आधीच छापण्याची कला निघाल्यानंतर या तटबंद्या भराभर कोसळूं लागल्या व राष्ट्राचा प्रत्येक घटक सुशिक्षित असला पाहिजे ही गोष्ट निर्विवाद रीत्या सिद्ध झाल्याने व व्यष्टीचे उद्धाराशिवाय समष्टीचें

अस्तित्व असणार नाही हें पटल्याने प्रत्येक घटक सुशिक्षित कसा होईल याकडे सर्व राष्ट्रांचें लक्ष वेधलें. ज्ञानाचीं क्षितिजें अनंतपटींनी वाढलीं; व नेहमी वाढत राहणारीं असल्यामुळे नवें ज्ञान, नवे विचार, नव्या कल्पना इत्यादिकांचें लोण त्या त्या क्षेत्राशीं संबद्ध असलेल्या व्यक्तीपर्यंत पोंचवणें अगत्याचें झालें. प्रत्येक व्यक्ती साक्षर होऊन तिच्या ज्ञानाची खोली वाढवणें व तिच्या अभिरुचीला वळण लावणें इ. गोष्टी क्रमप्राप्त झाल्या व प्रत्येक वाचकाला **त्याचें** पुस्तक मिळालें पाहिजे हा संकेत रूढ झाला. अशा तऱ्हेने शिक्षणप्रसार व ग्रंथालयप्रसार यांची सांगड घालण्यात पाश्चात्यांनी अभूतपूर्व यश संपादन केलें. आणि याच अर्थाने ग्रंथालयांची चळवळ ही अलीकडची आहे असें मानावें लागतें.

## ग्रंथालयांची कार्यक्षमता

एवढें सर्व विवरण करण्याचें कारण असें की ग्रंथालयें जर राष्ट्रीय प्रगतीचें एक प्रमुख चिन्ह ठरतें तर तीं कार्यक्षम होण्यासाठी त्यांत काम करणारीं माणसेंही तशींच वाकबगार पाहिजेत. ज्ञानाचा अफाट सागर–म्हणजेच–ग्रंथसंग्रह–तो तरी एकाद्या दुसऱ्या विषया-वरील नव्हे तर अनंत विषयांवरील; त्यांची निवड; त्यांची रचना; विविध मनोवृत्तींच्या जिज्ञासूंसाठी करावयाची तयारी; नवनव्या ग्रंथांचें आलोडन इत्यादि गोष्टी नीट करूं शकणारीं माणसें अशा कामासाठी हवींत. राज्ययंत्राचे ज्याप्रमाणे अठरा कारखाने म्हणजेच डिपार्टमेंटस् राज्यकारभारासाठी असतात त्याप्रमाणे इथे सुद्धा संदर्भ साह्य, सूचि, नियतकालिकें, वाचनालय, व्याख्यानमाला, नकाशे, फिल्मस् अशीं कितीतरी डिपार्टमेंटस् असतात. कोणत्याही विषयावरील संदर्भ चट्कन् मिळण्याकरता, वाचकाची शंका क्षणार्धांत दूर होण्या-करिता, काम करणारीं लायक माणसें प्रत्येक ग्रंथालयाचे गरजेप्रमाणे

अवश्य हवींत. माझे कित्येक सुशिक्षित स्नेहीही मला नेहमी "तुझी चैन आहे" असें माझ्या पाठीवर थाप मारून सांगतात. मी विचारतों "कारे बुवा?" ते म्हणतात, "तुलारे काय काम? पुस्तकें आणायचीं, द्यायचीं, घ्यायचीं, व तीं सुद्धा कारकुनाकडून." अशा माणसांना मी काय सांगणार ? कपाळ ?

असे प्रश्न पदवीधर मंडळीकडून व ग्रंथालयें चालविणाऱ्या सुशिक्षित म्हटल्या जाणाऱ्या चालकांकडून निघाल्यावर ग्रंथपालाचा दर्जा त्यांचे दृष्टीने कोणता असेल हें कांही सांगणे नलगे. ग्रंथालयांचें एक शास्त्र आहे. डॉक्टरांचें शास्त्र, शिक्षणाचें शास्त्र, व्यापाराचें शास्त्र, तसेंच ग्रंथालयांचेंही शास्त्र आहे. तुम्हांस माहीत नाही अशीं शेंकडों ग्रंथांतील व नियतकालिकांतील तुम्हास पाहिजे त्या विषयावरील माहिती ज्या वेळीं तुम्ही मागतांक्षणीच तुमचे हातीं पडते त्या वेळीं हें काम चुटकीसरसे कसें झालें याचा विचार तुम्हाला निश्चित चाटून जात असतो. पण या मागें कित्येक लोकांचे श्रम कारणीभूत झाले आहेत याबद्दल तुम्हास थोडा सुद्धा विचार करण्याची आवश्यकता वाटू नये काय ?

## आमची अनास्था

आमचेकडे ही अनास्था असण्याचें कारण उघड आहे. आमच्याकडे साक्षरतेचें प्रमाणच मुळी दहा टक्क्यांचे आंत. खरें पाहतां आमचेकडे ग्रंथालयांची चळवळ अशी नाहीच. जी कांही ग्रंथालयें आहेत तीं वर्गणीदारांसाठी, खाजगी शिक्षणसंस्थांचीं, किंवा सार्वजनिक म्हणजे नगरवाचनालयांसारखीं अशा स्वरूपाचींच दिसतात. त्यांपैकी शाळांच्या ग्रंथालयांचा विचार करणेंच नको. महाविद्यालयांचीं ग्रंथालयें हीं त्या त्या संस्थेपुरतीच शिक्षित ग्रंथपालांचे देखरेखीखाली असल्याने सर्व-

साधारणपणें चांगल्या स्थितींत आहेत. पण सार्वजनिक ग्रंथालयें कांही स्पृहणीय अवस्थेंत सापडतील असें दिसत नाही. वृद्धांना शिळोप्याच्या गप्पांसाठी एक ठिकाण, पांढरपेशा सुशिक्षिताला राजकारणाच्या सनसनाटी बातम्यावाचून शुष्क चर्चा करण्याची एक जागा, किंवा लघुकथा, कादंबऱ्या धुंडणारा वाचकवर्ग यांचीच वर्दळ येथे असते. लोकशिक्षणाचें एक अंग हा भाग पुष्कळसा निघून गेलेला दिसतो. तसेंच काम करणारा नोकरवर्गही या विषयांत वाकबगार म्हणावा तर तें बहुतेक आढळणें अशक्यच. एकाद दुसरा कारकून की जो वेळप्रसंगीं झाडणें, कार्यकारी मंडळाचे चहाची अगर सभा संमेलनाची तयारी करणें इ. गोष्टींकरिता उपयोगिला जातो असाच असतो. अशाचे हातून ही चळवळ कशी फोफावणार? चळवळीच्या आरंभकाळामुळे सेवकांना त्यागी वृत्तीने सेवा करणें भाग पडतें. शिवाय नियामक मंडळाचें ग्रंथपालावरील अनावश्यक नियंत्रण व न समजणाऱ्या स्थानिक गोष्टींत हात घालण्याची प्रवृत्ती, ग्रंथालय सेवकांना वाटणारी आपल्या भवितव्याची काळजी इ. सेवेच्या सुलभतेमागील गोष्टी ग्रंथालयाचें उद्दिष्टच समूळ नाहींसें करतात.

## कांही उपाययोजना

मुंबई सरकारने लायब्ररी डेव्हलपमेंट कमिटीचे रिपोर्टाअन्वयें तीन प्रादेशिक ग्रंथालयें निर्माण केलीं आहेत व त्यांचें कार्यही थोड्या बहुत प्रमाणांत चालू झालें आहे. परंतु त्यामुळे मुंबई प्रांतांत ग्रंथालयांची चळवळ मोठ्या जोरदारपणे सुरू आहे, असें मला म्हणावेंसें वाटत नाही.

ग्रंथालयांची खरी वाढ ज्या वेळीं जनता सुशिक्षित होऊन ज्ञानपिपासू बनेल त्याच वेळीं होईल. आपले सर्व प्रयत्न शहरांपुरतेच मर्यादित आहेत. यासाठी प्राथमिक शाळांमधूनच ग्रंथालय शास्त्राची

गरजेपुरती माहिती घेतलेले तज्ञ शिक्षक नेमले जाणें जरूर आहे. तेथलें ग्रंथालय आधी सुव्यवस्थित झालें पाहिजे.

मुलांना वाचनाची आवड लावण्याचें कार्य तें ग्रंथालय व ते तज्ञ शिक्षक निश्चित करूं शकतील.

खेडयांतूनही प्राथमिक शिक्षण सक्तीचें करणें व शाळांना जोडूनच ग्रंथालयांची वाढ करणें हें शीघ्र फलदायी ठरेल.

तसेंच ग्रंथालय शास्त्राचें शिक्षण देण्याचें कार्य ज्या संस्था करतात त्यांस मान्यता देऊन आपल्या योजनेस त्यांचें साह्य घेण्याचेंही सरकारने ठरवलें पाहिजे.

पुण्याचें प्रादेशिक मध्यवर्ति ग्रंथालय स्थापन झालेंच आहे व आता जिल्हे, तालुके व खेडीं या क्रमाने हें काम प्रगत होत चाललें आहे असें दिसतें. पण या योजनेच्या सांगतेला किती काळ लागेल कोणास ठाऊक !

ही चळवळ जास्त प्रगत होण्यासाठी भारतीय ग्रंथालय-संघाच्या आदेशाप्रमाणे म्युनिसिपालिटया व बोर्डांना लायब्ररी कर आकारण्याची परवानगी सरकारने द्यावी. तसेंच त्यांना सरकारी ग्रँटही देऊन त्यांवर सरकारी नियंत्रण ठेवावें. या कामासाठी अधिकारी वर्ग सरकारने नेमलेला आहेच. अशा ग्रंथालयांत शिक्षित ग्रंथपालच नेमावेत अशी सक्ती करावी व असे ग्रंथपाल मिळत नसल्यास त्यांचे शिक्षणाची व्यवस्था सरकारचे सहकार्याने होऊन मग ते नेमले जावेत. कोणाही माणसाला ग्रंथपाल बनविला जाऊं नये.

या ग्रंथालय सेवकांना शाश्वती वाटण्यासाठी त्यांचे नोकरीचे नियम, पगार, रजा, अधिकार व्यक्तिमत्व इ. संबंधी निश्चित निर्णय

व्हावे. त्यांचें काम समाधानकारक चाललें आहे की नाही हे क्यूरेटर किंवा असि. क्यूरेटर यांजकडून ठरविलें जावें. नियंत्रक समितीस फक्त मर्यादित अधिकार असावेत.

इतर सार्वजनिक ग्रंथालयांचें सहकार्य घ्यावें व त्यांची इच्छा असल्यास त्यांचा समावेश कांही अटींवर सरकारी योजनेंत केला जावा.

ग्रंथालयांची खरी उपयुक्तता त्यांत काम करणाऱ्या सेवकांवर पूर्णपणें अवलंबून आहे. तेव्हा ग्रंथालयांची वाढ करतांना तो भार पेलूं शकतील असे ग्रंथपाल निर्माण करणें आवश्यक आहे साक्षरता, ग्रंथालयांची वाढ व तज्ञ ग्रंथालयसेवक हे एकमेकांवर अवलंबून आहेत. मुंबई सरकारचे योजनेप्रमाणे या प्रांतांत सर्वत्र ग्रंथालयांचें जाळें विणलें जावें व सरोवरांतून निघणाऱ्या नद्या व त्यांना काढलेले पाट, कालवे इ० मार्गांनी जमीन सुपीक सुजला सुफला होते त्याप्रमाणे खेडोपाडीं ज्ञानाचीं सदावर्तें उघडलीं जाऊन सारी जनता या ज्ञान-गंगेंत निमज्जन करूं लागो हीच आपणां सर्वांची इच्छा असणें स्वाभाविक आहे.

---

## आजचीं अद्यावत व समृद्ध ग्रंथालयें

**जगांतील सर्वात मोठें ग्रंथालयः—अमेरिकेंतील लायब्ररी ऑफ कांग्रेस हें ग्रंथालय वॉशिंगटन येथे असून त्यांतील ग्रंथसंख्या ५० लक्ष आहे.**

**मास्को येथील लेनिन ग्रंथालयांत ४५ लक्ष ग्रंथ व २ लक्ष हस्त-लिखितें आहेत.**

**इंग्लंडचे राष्ट्रीय ग्रंथालय जे ब्रिटिश म्युझियम त्यांत ४१ लक्ष २० हजार पुस्तकें व ७० हजार हस्तलिखितें आहेत.**

# महाराष्ट्रांतील ग्रंथालयांची संघटना आणि ग्रंथालय प्रसाराची सरकारी योजना

## दत्तात्रय वामन जोशी

**परिचय**—जन्म १८९९, हे बी. ए., बी. टी., एस्. टी. सी. असून ग्रंथालयविषयक चळवळीचे सर्वांत जुने कळकळीचे कार्यकर्ते आहेत. यांनी ग्रंथालय चळवळींत अगदी सुरुवातीपासून सक्रिय सहकार्य दिलें आहे. हे सेनापति बापटांच्या मुळशी सत्याग्रहांत होते. यांनी इंडियन डिफेन्स कोर्सचे युनिव्हर्सिटी कंपनीमध्ये शिक्षण घेतलें आहे. तसेच हे १९२१ पासून महाराष्ट्र लायब्ररी असो. चे कार्यवाह आहेत. यापूर्वी यांनी अनाथ विद्यार्थी गृहाचे मोफत वाचनालयांत व सहकारी मोफत वाचनालय पुणें येथे ग्रंथालयविषयक कार्य केलें आहे. हे कै. श्री. न. चिं. केळकर, संपादक केसरी यांचे लेखक, कै. श्री. गो. कृ. देवधर, प्रेसिडेंट सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटी पुणे यांचे मदतनीस लेखक, व कै. श्री. चिं. वि. वैद्य इतिहासाचार्य ( चीफ जस्टिस, ग्वाल्हेर ) यांचे लेखक असून यांनी प्राथमिक व दुय्यक शाळा, ट्रेनिंग कॉलेज यांमध्ये मुख्याध्यापकाचें कार्य केलें आहे. हे १९४८ ला लायब्ररी वर्कर्स युनि. मुंबईचे कार्यवाह होते. हे इंडियन लायब्ररी असो. (१९३४) चे फौंडेशन मेंबर असून तिचे कलकत्ता येथील प्रथम ग्रंथालय परिषदेपासून सभासदहि आहेत. हल्ली हे १९५१ च्या बाम्बे लायब्ररी असो. चे कार्यवाह म्हणून कार्य करीत आहेत.

"A true university in these days is a collection of books" आधुनिक काळांत ग्रंथसंग्रह म्हणजे खरोखरीचें विद्यापीठच आहे असें कार्लाइलने म्हटलें आहे आणि तें यथार्थच आहे. तरुण पिढीला वाचनाभिरुची लागावी, त्यांनी ज्ञान-संपन्न होऊन सुविचारी बनावें व त्यांच्या हातून समाजोपयोगी अथवा राष्ट्रवर्धनपर कार्य व्हावें या तळमळीने महाराष्ट्रांत वाचनालय व ग्रंथ-प्रसार कार्य करणाऱ्या "महाराष्ट्र लायब्ररी असोसिएशनने" पंचवीस वर्षांपूर्वी त्या वेळचे बॅरि. एम्. आर. जयकर यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्रांतील वाचनालयें व ग्रंथालयें या संस्थांच्या कार्यकर्त्यांची परिषद पुणें येथे भरविली. सदरहू परिषदेला पुणें येथे सुमारें १२५ प्रतिनिधि हजर होते. ठराव मंजूर झाले. भाषणेंही अत्यंत उत्तेजक व उद्बोधक झालीं. महाराष्ट्र वाचनालय संघाला मराठी भाषा चालू असलेल्या हिंदुस्थानांतील प्रत्येक केंद्रामधील वाचनालय संस्थेने संघांत सामील होऊन चळवळीला पाठिंबा दिला. कराची, कलकत्ता, बनारस, अलाहाबाद, नागपूर, बंगलोर, तंजावर येथील संस्थाही संघांत समाविष्ट झाल्या. इतकेंच काय आफ्रिकेंतील डारासॅलेम व झांझीबार येथील हिंदी वसाहतीकडूनही सहकार्य मिळालें होतें. वाचनालय संघाचें कार्य जोराने चालू होतें. पण मॉंटेग्यू सुधारणांच्या राजवटींत शिक्षणमंत्री लोकप्रतिनिधीपैकी असूनही एकंदर सार्वत्रिक शिक्षणप्रसाराचें पाऊल मंदगतीनेंही पुढे टाकण्याची मारामार, तर दुय्यम शिक्षण व तदनुषंगिक वाचनाभिरुची वाढवून ग्रंथालय प्रसाराच्या चळवळीस अगर कार्यास त्यांच्या हातून शाब्दिक सहानुभूतीशिवाय कांहीच प्रत्यक्ष मदत झाली नाही यांत नवल तें काय ! अर्थात लायब्ररी असोसिएशनला सरकारी मान्यता अगर मदत कशी मिळणार ?

## महाराष्ट्र लायब्ररी असोसिएशन

महाराष्ट्र लायब्ररी असोसिएशनने स्थानिक स्वराज्य संस्थांकडून ग्रंथालयांना वार्षिक मदती मिळविल्या. मुंबई, पुणें, नाशिक, सांगली, ठाणें वगैरे ठिकाणच्या म्युनिसिपालटयांमध्ये प्रत्यक्ष ठराव आणवून सार्वजनिक ग्रंथालयांना वार्षिक मदती मिळवून देण्याचें कार्य केलें. प्रमुख वर्तमानपत्रांच्या बाबतींत कन्सेशन मिळविलें. १९३६ सालीं मुंबई कौन्सिलमध्ये " Public Libraries Bill " रावबहादुर, एस्. के. बोले यांच्याकडून मांडून त्याला नामदार गव्हरनर जनरल इन कौन्सिल यांचीही संमति आणून गव्हर्नमेंट गझेट मध्ये प्रसिद्ध झालें. पण कौन्सिलच्या शेवटच्या बैठकींत कामाच्या तक्त्यावर बिल असून-ही बिनसरकारी ठराव व बिलें चर्चेला न येतांच कौन्सिल कायमचें बरखास्त झालें. पुढे लवकरच नवीन निवडणुकी होऊन आपले हल्लीचे पंतप्रधान बा. गं. खेर हेच शिक्षणमंत्रीही झाले. सुरवातीलाच त्यांनी स्वायत्तता प्राप्त झालेल्या आपल्या प्रांतांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें व सार्वत्रिक करण्याचें बिल आणून शिक्षणप्रसाराचें कार्य सुरू केलें. "प्रौढ शिक्षण समिती" नेमून त्या बाबतींतही कार्याची दिशा आखली. त्याचप्रमाणे "लायब्ररी डेव्हलपमेंट कमिटी" नेमून ग्रंथालयप्रसाराची योजना व कार्याची आखणी कशी करावी या विषयाकडे लक्ष दिलें.

## सरकारी ग्रंथालय योजना

" बॉंबे लायब्ररी डेव्हलपमेंट कमिटी " नेमण्यांत आली. कमिटीने मोठा अहवाल तयार करून एक योजना मांडली आणि तिचा पुरस्कार क्रमाक्रमाने व पायरीपायरीने व्हावा असें दिग्दर्शित केलें. योजना सकृद्दर्शनीं फार नवीन वाटली आणि शिरस्त्याप्रमाणे योजनेचा अवास्तव गौरवही झाला. पण सरकारने पुरस्कृत केलेल्या

योजनेंत मूळांतच भरभक्कम पाया नाही. कमिटीला उपयुक्त सूचना ग्रंथालय कार्यकर्त्यांनी केलेल्या होत्या. त्या सूचनांचा योग्य विचार करून त्या अमलांत आणल्या असत्या तर सर्व ग्रंथालय योजनेंत खरा जिवंतपणा आला असता आणि ग्रंथालयांची वाढ झपाट्याने आपोआप क्रमप्राप्त झाली असती. पण सरकारी योजनेंत सुलभतेने आत्मवाढीचीं साधनें नाहीत व वावही नाही, असें खेदाने नमूद करणें जरूर आहे ! प्रचलित योजनेंत मुंबई शहरांत सेंट्रल लायब्ररी स्थापण्याचें महत्त्वाचें कार्य आहे. पण नाममात्र अस्तित्त्वांत असलेल्या प्रांताच्या प्रमुख ग्रंथालयांकडे वरवरही पाहिलें असतां सखेदाश्चर्य वाटतें. "सेंट्रल लायब्ररी" टाउनहालमध्ये असलेल्या बॉंबे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटीमध्ये समाविष्ट झालेली असून आज तीन वर्षे तिचें अस्तित्व आहे. या सेंट्रल लायब्ररीकडे नजर टाकल्यास कोणत्याही आधुनिक आकर्षणाच्या अभावीं ती अद्याप व्हावी तितकी उपयुक्त होऊं शकलेली नाहीं. नवीन पद्धतीचीं ग्रंथांच्या मांडणीचीं साधनें, कॅटलॉग, कार्डें, ओपनशेल्फ-लायब्ररी, ग्रंथपाल, वाचक-वर्गाला आरामशीर बसण्याचीं साधनें, वाचकांना जरूर त्या पुस्तकांचा पुरवठा वगैरे आवश्यक गोष्टींना अद्याप योग्य तऱ्हेने सुरुवातही नाही. अशा परिस्थितींत ह्या सेंट्रल लायब्ररी-संस्थेला प्रांताची "नमुनेदार सार्वजनिक लायब्ररी" असें नामाभिधान कसें देण्यांत येईल ! सरकारने पूर्णपणें पुरस्कृत केलेल्या या सेंट्रल लायब्ररी-कडे बारकाईने लक्ष दिल्यास ह्या मुख्य केंद्रामार्फत प्रादेशिक केंद्रा-तील सरकारी पुरस्कृत ग्रंथालयें आकर्षक, उपयुक्त, वाचनाभिरुचि-संवर्धक व नमुनेदार कशीं होणार तें कळत नाही. पुणें, अहमदाबाद व धारवाड येथे प्रादेशिक केंद्र-ग्रंथालयें असून प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य शहरांत सरकारपुरस्कृत एक ग्रंथालय अशीं पंचवीस जिल्हा

ग्रंथालयें आहेत. त्याचप्रमाणे जिल्ह्यांच्या प्रत्येक तालुक्याच्या मुख्य गावांतील प्रत्येकीं एक अशा सुमारें दोनशें ग्रंथालयांना सरकारी वार्षिक मदत मिळूं लागलेली असून कार्य सुरू झालेलें आहे. या अस्तित्वांत आलेल्या योजनेंतील बहुतेक सर्व ग्रंथालयें आपापल्या मगदुराप्रमाणे सरकारी मदतीच्या अभावीं स्थानिक संस्थेकडून मिळणाऱ्या अत्यंत अपुऱ्या मदतीवर व मुख्यतः वाचकवर्गाच्या व धनिक जनतेच्या आर्थिक मदतीने चालत होतीं. अर्थात सरकारी योजनेमुळे सदरहू ग्रंथालयांना निश्चित वार्षिक मदत मिळूं लागलेली आहे; तथापि ग्रंथालयांच्या वाढत्या उपयुक्ततेमुळे व आधुनिक उपकरणांनी तीं सज्ज करण्याच्या आवश्यकतेमुळे सरकारी चालू योजना अपुरी असल्यामुळे लवकरच ढासळण्याची भीति आहे. ग्रंथालयांना योग्य इमारती, ग्रंथांचा सतत भरणा, उपयुक्तता वाढविण्याचीं साधनें, शिक्षित सुसंस्कृत ग्रंथपाल त्यांना योग्य वेतनश्रेणी वगैरे अत्यंत आवश्यक गोष्टींकडे सरकारची योजना अद्यापि कांहीच लक्ष देत नाही हें नमूद करणें क्रमप्राप्त आहे. या सरकारी ग्रंथालय योजनेच्या कामीं सरकार सुमारें तीन लक्ष रुपये वार्षिक खर्च करीत आहे. पण या योजनेमुळे खरेंखुरें ग्रंथालय-प्रसाराचें कार्य व लोकांची वाचनाभिरुची किती वाढली आहे व त्यांत उत्तरोत्तर प्रगती होण्याचीं चिन्हें किती आहेत तें पाहूं.

## सरकारी ग्रंथालयप्रसारयोजनेंत चैतन्याचा अभाव

एक मध्यवर्ती मुंबईचें केन्द्रीय ग्रंथालय, पुणें, अहमदाबाद, बडोदें, धारवाड येथील प्रादेशिक केंद्रीय ग्रंथालयें हीं पूर्णपणे सरकार-पुरस्कृत असून प्रादेशिक ग्रंथालयांनी निदान अर्धा खर्च स्थानिक मदतीने करावा अशी अट प्रथमतः घालण्यांत आली होती. त्याचप्रमाणे

जिल्हा व तालुका ग्रंथालयांना प्रत्येकीं सुमारें ४००० रु. व ५०० रु. वार्षिक मदत याच अटीवर देण्यांत आलेली आहे. या जिल्हानिहाय व तालुक्याच्या संस्था सरकारी मदत मिळण्यापूर्वी स्थानिक स्वराज्य संस्था, वर्गणीदार वाचक व धनिक उदार लोकांच्या मदतीने पूर्णपणे चालल्या होत्याच. आता त्या सरकार पुरस्कृत झाल्यामुळे त्यांना सार्वजनिक ग्रंथालयांचें स्वरूप आलेलें आहे ही गोष्ट खरी. पण सदरहू संस्था फारशा जास्त उपयुक्त झालेल्या आहेत असें म्हणतां येत नाही. कारण सरकारी योजनेंतील विचारसरणीच एकांगी असून त्यांत ग्रंथालयसंस्थांना आत्मवाढीला अगर जास्त कार्यक्षम होण्यास पुरेसा वावच नाही. जिल्ह्याच्या केंद्र ग्रंथालयाचेंच उदाहरण घेतलें तर रु. ४००० रकमेंत संस्था उत्तरोत्तर जास्त उपयुक्त कशी होऊं शकेल? ग्रंथपाल सुशिक्षित नाही, त्याचें वेतन अत्यंत अपुरें, नवीन ग्रंथ विकत घेण्यास द्रव्याभाव, पुस्तकें आधुनिक साधनांच्या अभावीं व्यवस्थित व आकर्षक तऱ्हेनें मांडणी करणें अशक्य, विषयवारीप्रमाणे ग्रंथांचीं कार्डें, कॅटलॉग वगैरेंचा अभाव, ही परिस्थिती प्रामुख्याने दिसून येते. सरकार पुरस्कृत ग्रंथालयें व वाचनालयें तरी बऱ्याच प्रमाणांत नमुनेदार असणें जरूर असून तीं जलद उपयुक्त होऊन जनतेंत वाचनाभिरुची वाढविण्याचें महत्त्वाचें कार्य त्यांच्याकडून होणें इष्ट आहे. त्याचप्रमाणे स्थानिक दुय्यमशाळा, प्राथमिक शाळा व इतर शैक्षणिक संस्थांशीं सार्वजनिक ग्रंथालयाने सर्वतोपरी सहकार्य करणें अत्यंत जरूर आहे.

## सरकारी योजनेचा डळमळीत पाया

प्रत्येक जिल्ह्याच्या व तालुक्याच्या प्रमुख शहरांत, गावांत प्रत्येकीं एकेक सरकार पुरस्कृत सार्वजनिक ग्रंथालय सुरू झालें; पण

त्याच वेळीं अस्तित्वांत असलेल्या व वाचनप्रसाराचें कार्य करीत असलेल्या त्याच टापूंतील इतर संस्थांना सरकारने आर्थिक मदत न देण्याचें ठरविलें आहे. हें सरकारचें धोरण अनिष्ट असून अदूरदृष्टीचें आहे. सदरहू धोरणानुसार मुंबई व इतर प्रादेशिक केंद्रांमधील व शहरांमधीलही सार्वजनिक ग्रंथालयांना कोणतीही आर्थिक मदत न देण्याच्या धोरणाने आज प्रत्यक्ष भरीव कार्य करणाऱ्या संस्थांची आवश्यक आर्थिक मदतीच्या अभावीं गळचेपी होत आहे. वाचनालय संस्था संघटित करून त्यांना उत्तेजन देण्याचें कार्य करणाऱ्या ग्रंथालय वाचनालय संघांनाही अद्यापि योजना सुरू होऊन तीन वर्षे झालीं तरी मान्यता मिळाली नाही अगर अर्थिक मदतही नाही. कोणत्याही सरकारपुरस्कृत ग्रंथालय योजनेला यश यावयाचें असल्यास ग्रंथालयसंघाचें सहकार्य सरकारने मिळविणें अत्यंत आवश्यक व इष्ट आहे, हें पाश्चिमात्य देशांतील "अमेरिकन लायब्ररी कांग्रेस" "ब्रिटिश लायब्ररी असोसिएशन" सारख्या संस्थांच्या तेथील सरकारच्या मान्यतेवर व सहकार्यावर किती अवलंबून आहे हें सहज लक्षांत येईल. आपल्या देशांत अशा प्रकारची ग्रंथालय योजना आपल्या मुंबई प्रांतांतच प्रथम आखण्यांत आली ही अभिनंदनीय गोष्ट आहे. याचें सर्व श्रेय पंतप्रधान व शिक्षणमंत्री बाळासाहेब खेर यांनाच आहे. पण या योजनेची सांगड सार्वत्रिक शिक्षणप्रसाराबरोबरच सर्व प्रकारच्या शिक्षणसंस्थांतील वाचनालयें व ग्रंथालयें सुसंघटित करून तीं उपयुक्त व खरोखरीचीं कार्यक्षम करण्याचा उपक्रम केल्यानेच होणारी आहे. या परिस्थितीचा मूलभूत व सांगोपांग विचार न करतां फक्त अनेकदा ग्रंथालय-प्रसार-योजनेची तरफदारी व चहा करण्याने जनतेला ज्ञानगंगेचें जल त्यांच्या आटोक्यांत कसें येणार तें कळत नाही !

## योजना सर्वांगीण व प्रसरणशील पाहिजे

वाचनाभिरुची वाढवून ग्रंथालयप्रसाराची योजना खेडेगावांत हरएक साधनांनी नेणें अत्यंत जरूर आहे. अगोदरच प्रौढमतदान दिल्याने 'अश्वापुढे रथ' ठेवण्याचा प्रकार झालेला आहे. अठरा कोटी मतदारांपैकी तीन कोटी मतदार स्त्रीपुरुष फक्त साक्षर आहेत. मुंबई प्रांतांत साक्षरतेचें प्रमाण इतर प्रांतांपेक्षा थोडें जास्त म्हणजे शेंकडा २० आहे. अशा स्थितींत सरकारने सार्वत्रिक शिक्षणप्रसाराचें कार्य झपाट्याने केलें पाहिजे. निदान प्रत्येक अप्पर प्रायमरी शाळेंतील मुलामुलींना व शिक्षकांना ग्रंथालयवाचनालयाची जोड देऊन त्याचा उपयोग नवीन साक्षर झालेल्या प्रौढांना त्यांची साक्षरता टिकविण्याच्या दृष्टीने व त्यांची वाचनाभिरुची वाढेल असा उपक्रम करणें जरूर आहे. अशा मोठाल्या गावांच्या कक्षेंतील सर्व मुलामुलींना वय ६ ते १४ पर्यंत प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्याची योजना आखून वय १५ ते ४० पर्यंतच्या स्त्रीपुरुषांनाही सक्तीने साक्षर करून त्यांच्याकरितां शाळेला जोडलेल्या ग्रंथालयांचाच साक्षरता टिकविण्याच्या कामीं व ज्ञानसंवर्धन होण्यास उपयोग होऊं शकेल.

## शिक्षणसंस्था व सार्वजनिक ग्रंथालयें यांचें सहकार्य

प्रत्येक प्रकारच्या व दर्जाच्या शिक्षणसंस्थांना उत्तेजन देऊन त्यांच्या अडचणी दूर करून त्या संस्थांतील ग्रंथालयें उपयुक्ततेच्या दृष्टीने संघटित करून त्यांना आर्थिक मदतही करणें सरकारचें कर्तव्य आहे. अनेक उपयुक्त व योग्य मार्गांनी वाचनाभिरुची वाढवणें ही महत्त्वाची गोष्ट आहे. शाळा व कॉलेजें यामध्येही विद्यार्थ्यांचा कमी दर्जा दृष्टोत्पत्तीस येतो, त्याचें मुख्य कारण आवश्यक सर्वसाधारण ज्ञानाचा अभाव हें आहे हें निर्विवाद आहे.

वरील परिस्थितीचा विचार केल्यास सरकारी ग्रंथालय योजना भरभक्कम पायावर उभारणें जरूर असून त्याकरितां साक्षरतेचा प्रसार, वाचनाभिरुचि वृद्धिंगत करण्याच्या साधनांचा उपयोग, शिक्षण-संस्था व वाचनालयें व ग्रंथालयें यांची सांगड करून सहकार्य करणें, ग्रंथालयाच्या इमारती स्वतंत्र बांधणें, ग्रंथालयविषयक आधुनिक आकर्षक साधनें व सामुग्री यांचा पुरवठा व अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे योग्य, ज्ञानवान व वाचनप्रसाराची आवड असणारे ग्रंथपाल या सर्व साधनांनी सज्ज अशीं वाचनालयें व ग्रंथालयें अस्तित्वांत येणें जरूर आहे. सुशिक्षित, ज्ञानवान, अध्यापनाचीं तत्त्वें आकलन करून मुलांची आवड असणाऱ्या आणि त्यांच्याशीं समरस होणाऱ्या शिक्षकाप्रमाणेच ग्रंथपालाचें (Librarian) कार्य आहे. पण त्याचा दर्जा ओळखून त्याला योग्य वेतनही मिळणें आवश्यक आहे. या बाबतींत "लायब्ररी स्टाफ यूनियन, मुंबई" या संस्थेने मोठमोठ्या ग्रंथालयांतील नोकरवर्गाच्या वेतनाचा प्रश्न हातीं घेऊन लेबर कमिशनर, ग्रंथालयांचे अधिकारी यांच्याशीं सल्लामसलत करून व जरूर तेथे सरकारी अधिकाऱ्यांशी तडजोड करून सर्वतोपरी नाही तरी बऱ्याच अंशाने समाधानकारक रीतीने सोडविलेला आहे, याबद्दल 'पोपल्स् फ्री लायब्ररीज', 'रॉयल एशियाटिक लायब्ररी', 'सेंट्रल लायब्ररी' व 'म्युझियम' यांमधील अधिकाऱ्यांचें धोरण अभिनंदनीय आहे. पण सरकारला हा प्रश्न दिरंगाईवर टाकणें अनिष्ट आहे. त्यांना हा प्रश्न समाधानकारक रीतीने सोडविलाच पाहिजे. सरकारी ग्रंथालय योजना फलद्रूप होण्याकरितां "ग्रंथालय संघांना" आणि 'लायब्ररी स्टाफ यूनियन' यांना विश्वासांत घेऊन, मान्यता देऊन त्यांच्याशीं सहकार्य केल्यानेच ग्रंथालयप्रसाराचें कार्य सुलभ होईल.

---

# मराठी ग्रंथालय संघ

## वासुदेव विष्णु भट

**परिचय**—जन्म मावळंगे (रत्नागिरी) १९११, यांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण झालें असून हे गेल्या १० वर्षांपासून मुंबई मराठी ग्रंथालय संग्रहालयाचे कार्यवाह आहेत, आणि मुंबई व उपनगर साहित्य संमेलनाचे कार्यवाहहि आहेत. याशिवाय निरनिराळ्या संघांचे व परिषदांचे हे कार्यवाह होते. यांचा ग्रंथालय चळवळींत प्रामुख्याने भाग असतो. यांचें संघटना-चातुर्य वाखाणण्यासारखें आहे. यांचे ग्रंथालय चळवळीवरील लेख निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतात. सध्या हे साहित्य सहकार संघ लि० या संस्थेंत काम करतात. यांची प्रकाशन संस्थाहि आहे.

वाचनालयांच्या संघटनेचा उपक्रम महाराष्ट्रांत १९२१ सालीं प्रथम करण्यांत आला. या वर्षी डॉ. बाबासाहेब जयकर यांच्या अध्यक्षतेखाली पुणें येथे महाराष्ट्रांतील वाचनालयांची पहिली परिषद भरविण्यांत आली. या परिषदेंत सुमारें पाऊणशें वाचनालयानी प्रति-निधी पाठवून भाग घेतला होता. या परिषदेच्या वेळींच महाराष्ट्रीय वाचनालय संघाची स्थापना करण्यांत आली. १९२६ सालीं पुणें येथेंच महाराष्ट्रीय वाचनालय परिषदेचें दुसरें अधिवेशन हैद्राबाद येथील नामदार केशवराव कोरटकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. हें अधिवेशन दोन दिवस चालून त्यांत वाचनालयविषयक चळवळीबाबत महत्त्वाचे दहा ठराव सम्मत करण्यांत आले.

त्यानंतर सुमारें बारा वर्षे महाराष्ट्रात वाचनालयांच्या संघटनेचें दृश्य असें कांही कार्य होऊं शकलें नाही. इ. स. १९३९ सालीं अहमदनगर येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य सम्मेलनाच्या अधिवेशनाचा फायदा घेऊन प्रा. चिं. वि. जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं वाचनालयांच्या कार्यकर्त्यांची परिषद भरविण्यांत आली होती.

कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या कारकिर्दीत Library Development Committee नेमली जाऊन तिने ग्रंथालय प्रसाराची शास्त्रशुद्ध योजना पुढे ठेवल्यापासून ग्रंथालयविषयक चळवळीकडे महाराष्ट्रीय जनतेचें प्रामुख्याने लक्ष वेधलें. १९४२ सालीं मुंबई येथे अखिल भारतीय ग्रंथालय परिषदेचें पाचवें अधिवेशन भरलें होतें. या परिषदेच्या वेळीं महाराष्ट्राबाहेरील वाचनालयांच्या चळवळीची स्थानिक कार्यकर्त्यांस माहिती मिळून आपल्याकडेही अशा तऱ्हेची संघटना असावी अशी इच्छा बळावण्यास प्रेरणा मिळाली.

१९४४ सालीं ठाणें येथे तेथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचा सुवर्ण महोत्सव साजरा करण्यांत आला. या उत्सवाच्या वेळीं मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या विद्यमानें मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेचें १ लें अधिवेशन डॉ त्र्यं. दि. वाकनीस यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ७ मे १९४४ या दिवशीं ठाणे येथे भरविण्यांत आलें.

'वाचनालय संस्थांना संघटित करणें त्यांच्या विकासाला आवश्यक असल्यामुळे मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा यांमधील सर्व मराठी वाचनालयांचा संघ स्थापन करण्यांत यावा' अशा अर्थाचा ठराव या परिषदेतच सम्मत करण्यांत आला व संघाची घटना तयार करण्यासाठी तसेंच वाचनालय परिषदेचें कार्य पुढे चालू ठेवण्यासाठी एक प्राथमिक समिति निवडण्यांत आली.

या प्राथमिक समितीच्या एकूण दोन सभा होऊन त्यांत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या विद्यमानें वाचनालय परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनासाठी आलेलें निमंत्रण स्वीकारण्यांत आलें. तसेंच समितीचे सभासद श्री. वा. वि. भट, श्री. आ. म. सिधये, प्रा. ना. द. नांदुर्डीकर यांच्याकडून आलेली ग्रंथालयांच्या संघाची घटना सम्मत करण्यांत येऊन ती दुसऱ्या अधिवेशनापुढे पसंतीसाठी मांडण्यांत यावी असें ठरलें

अधिवेशन भरविण्याबाबतचे सर्व प्रकारचे अधिकार या समितीकडून मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयास मिळाल्यावर सदर संस्थेनें परिषदेची घटना संमेलनाचे नियम वगैरे निश्चित करून सदर परिषदेचें अधिवेशन १९४५ साली श्री. बाळासाहेब खेर यांच्या अध्यक्षतेखालीं भरविलें.

या अधिवेशनांत पुढील प्रस्ताव एकमताने संमत करण्यांत आला. "मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेच्या प्रथम अधिवेशनांत नेमलेल्या प्राथमिक समितीनें तयार केलेली व अधिवेशनाच्या विषयनियामक समितीनें मान्य केलेली 'मराठी ग्रंथालय संघ' या संस्थेची घटना ही परिषद मान्य करीत आहे व त्याप्रमाणे संस्था स्थापन करण्यांत येत आहे. घटनेप्रमाणे कार्य करण्यासाठी श्री. बाळासाहेब खेर, प्रा. अ. बा. गजेन्द्रगडकर, श्री. ना. ग. गाळवणकर, श्री. प. त्रिं. सहस्रबुद्धे, श्री. आ. म. सिधये, श्री. द. श्री. तेंडूलकर, श्री. अ. स. पेठे, श्री. भा. पां. सबनीस, श्री. द. सी. वैद्य, ॲ. दि. पु. क्षुपकर, श्री. द. रा. वैद्य, श्री. कृ. रा. सासंत, श्री. पां. वा. गाडगीळ व वा. वि. भट (निमंत्रक) या व्यक्तींचें एक तात्पुरतें कार्यकारी मंडळ नेमण्यांत येत आहे. या मंडळास घटनेंतील कार्यकारी मंडळाचे सर्व अधिकार राहातील.

या मंडळाने जून १९४६ अखेरपर्यंत होणाऱ्या सभासदांची पहिली साधारण सभा, निवडणूक, अंदाजपत्रक वगैरे आवश्यक कार्य करण्याकरितां बोलवावी. ”

या समितीने लौकरच आपली सभा भरवून पुढील पदाधिकारी निवडले. श्री. बाळासाहेब खेर अध्यक्ष, श्री. अ. बा. गजेंद्रगडकर—उपाध्यक्ष, श्री. आ. स. भिडये—कोषाध्यक्ष, श्री. वा. वि. भट व श्री. प. त्रिं. सहस्रबुद्धे कार्यवाह.

संघाच्या या तात्पुरत्या कार्यकारी मंडळाने आपल्यापुढे पहिल्या सहामाहीसाठी पुढील कामें आखून घेतलीं होतीं.

(१) मुंबई—उपनगर व ठाणें जिल्हा यांतील (मराठी विभाग असणाऱ्या) ग्रंथालयांचा अधिकृत इतिहास संपादून तो प्रसिद्ध करणें.

(२) सभासदांना नवीन वाङ्मयाची अद्यवत् माहिती पुरविणें.

(३) मराठी पुस्तकें सभासदांना शक्य तितक्या जास्त सवलतीने मिळवून देणें.

(४) मराठींतील अवश्य संग्राह्य अशा निवडक ग्रंथांची यादी संपादून घेऊन ती प्रसिद्ध करणें.

वरील कार्यांपैकीं वाचनालयांच्या इतिहासाबद्दलचीं साधनें गोळा करण्याच्या दृष्टीनें कार्यकारी मंडळाने बरीच खटपट करून जवळजवळ सर्व महत्त्वाच्या ग्रंथालयांचीं टिपणें जमा केलीं.

सभासदांना नवीन वाङ्मयाची अद्यवत् माहिती पुरविण्याच्या दृष्टीने संघाला स्वतःचें असें एक मुखपत्र असावें अशी योजना कार्यकारी मंडळापुढे होती. तथापि सरकारी निर्बंधानुसार नवीन नियतकालिक सुरू करणें अशक्य होऊन बसलें होतें. याच सुमारास मुंबई

मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या विद्यमानें 'मराठी ग्रंथसंग्राहक' म्हणून जें प्रकाशन सुरू करण्यांत आलें होतें तेंच आपणास चालवावयास देण्यास मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयास विनंती करावी असें ठरलें व संग्रहालया-च्या चालकांकडून अवश्य ती परवानगी मिळतांच या प्रकाशनाची चार पुष्पें १९४६ सालीं प्रसिद्ध करण्यांत आलीं. या प्रकाशनाच्या द्वारा नव्या मराठी साहित्यिक प्रश्नांवरील टिपणें, ग्रंथालयें व ग्रंथ यांविषयी विविध माहिती वगैरे सदरें यांतून नियमितपणें येत असल्याकारणानें प्रकाशन सर्वांच्या आवडीचें झालें होतें.

संघ सुरू करण्यांत आला त्या वेळीं त्याचें कार्यक्षेत्र मुंबई, उप-नगर व ठाणें जिल्हा यापुरतेंच मर्यादित राहील असें घोषित करण्यांत आलें होतें. मराठी ग्रंथालय संघाच्या कार्याची उपयुक्तता पटल्यामुळे व अशा तऱ्हेच्या संघटनेची ग्रंथालयांना तीव्र गरज भासल्यामुळे या कक्षेबाहेरच्या अनेक वाचनालयांकडून आपणास संघांत सामील करून घेण्याबद्दल विचारणा करण्यांत येऊं लागली. या कारणामुळें संघाच्या कार्यक्षेत्राचा मूळ निर्बंध अजिबात कमी करण्यांत येऊन कोणत्याही ठिकाणच्या ग्रंथसंग्रहालयांना संघाचा फायदा घेतां यावा अशी दुरुस्ती घटनेंत करण्यांत आली.

## ग्रंथ—प्रकाशनाचा उपक्रम

ग्रंथालय चळवळीला मार्गदर्शक होईल अशा ग्रंथांचें प्रकाशन करणें हा ग्रंथालय संघाचा एक प्रमुख उद्देश होता. या उद्देशानुरूप ' पंचारती ' या पुस्तकाचें संघाकडून प्रकाशन करण्यांत आलें. गेल्या वर्षीच्या मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेंत श्री. अ. का. प्रियोळकर, श्री. वा. गो. खेर, श्री. र. श. पारखी, डॉ. पु. म. जोशी व श्री. शं. ग. दाते यांचीं जीं भाषणें झालीं तीं या

पुस्तकांत संग्रहीत केलीं आहेत. हा संग्रह म्हणजे ग्रंथालयशास्त्राचा ज्ञानकोशच होय असें सर्वांनी एकमुखाने वर्णन केलें आहे.

## मराठी ग्रंथालय परिषद् व इतर कार्यक्रम

संघाच्या वतीने दि. २१-२२ डिसेंबर १९४६ रोजीं आचार्य काकासाहेब कालेलकर यांच्या अध्यक्षतेखालीं पहिली मराठी ग्रंथालय परिषद भरविण्यांत आली होती. १९४५ मध्ये मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा येथील वाचनालयांची दुसरी परिषद मुंबई येथेच भरली होती. या परिषदेंतच मराठी ग्रंथालयांच्या संवर्धनासाठीं स्थायी कार्य करणारा मराठी ग्रंथालय संघ अस्तित्वांत आला. या संघाच्या कार्यांची व्याप्ति प्रथमतः मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा एवढ्यापुरतीच मर्यादित ठेविली होती. परंतु बाहेरच्या अनेक कार्यकर्त्यांच्या व व ग्रंथालयांच्या आग्रहामुळे ही मर्यादा वाढवून सर्व ठिकाणच्या मराठी विभाग असणाऱ्या ग्रंथालयांना या संघटनेंत भाग घेतां यावा अशी घटनेंत सोय करण्यांत आली व त्या योजनेनुसारच अखिल मराठी ग्रंथालयांची ही पहिली मराठी ग्रंथालय–परिषद संघाच्या विद्यमानें मुंबईस झाली.

वरील पहिल्या मराठी ग्रंथालय परिषदेप्रमाणेच ठिकठिकाणच्या वाचनालयांच्या जिल्हा परिषदा भरविण्यासाठीं संघातर्फे प्रमुख ग्रंथा-लयांना विनंतीपत्रें पाठविण्यांत आलीं होतीं. या पत्रानुसार ठाणे व कुलाबा या जिल्ह्यांतील वाचनालय परिषदा यशस्वी रीतीने पार पडल्या.

इ. स. १९४९ सालीं पुणें येथे महाराष्ट्र वाचनालय परिषद भरली होती. या परिषदेंत सर्वांनी एकमताने ठरविलेल्या योजनेनुसार महाराष्ट्रांत ग्रंथालयीन चळवळ करण्यासाठीं एकच संस्था उभारावी

अशी योजना आखण्याचें ठरलें व या ठरावानुसार मराठी ग्रंथालय संघाच्या साधारण सभेने महाराष्ट्र ग्रंथालयसंघाशीं एकत्रित स्वरूपाचें कार्य करण्याचें ठरविलें. मराठी ग्रंथालयसंघाचे कार्यकर्ते 'महाराष्ट्र ग्रंथालय संघ' या नव्या संघटनेंत पूर्वीच्याच आत्मीयतेने कार्य करीत आहेत व ही नवी संघटना मराठी ग्रंथालय संघाचेंच विकसित स्वरूप आहे असा त्यांचा विश्वास आहे.

---

## सोविएत खेड्यांतील वाचनालयांचा प्रचंड प्रसार

शिक्षणाच्या सार्वत्रिक प्रसारामुळे सोविएत शेतकऱ्यांना पुस्तकांचा सर्रास वापर करणें शक्य होत आहे आणि पुस्तकें ही तर त्यांच्या जीवनातली एक महत्त्वाची आवश्यकताच होऊन बसली आहे. म्हणून सोविएत सरकार पद्धतशीरपणे देशभर ग्रंथालयांचा वाढत्या प्रमाणात स्थापना करीत आहे व ग्रंथसंग्रहांत भरपूर भर घालण्यासाठी फंड देत असते.

१०.५० च्या सुमारास सोविएत युनियनमध्ये ३ लक्षांहून अधिक पुस्तकालयें होतीं व त्यांत ६० कोटी पुस्तकांचा संग्रह होता. हीं ग्रंथालयें सरकारी सार्वजनिक संस्थांच्या व्यवस्थेखाली चालू होतीं. या आकड्यामध्ये अर्थात वैयक्तिक पुस्तकसंग्रहांचा मुळीच समावेश करण्यांत आलेला नाही, आणि असे वैयक्तिक ग्रंथ-संग्रह प्रत्येक शहरा-खेड्यांतील बुद्धिजीवि तसेच कामगार व सामुदायिक शेतकऱ्यांच्या घरीं मोठ्या प्रमाणांत आहेत.

या पुस्तकालयांच्या वाचकवर्गामध्ये अतिशय मोठ्या प्रमाणावर सांस्कृतिक प्रसाराचें कार्य चालू असतें. वेळोवेळी पुस्तकांची प्रदर्शनें मांडलीं जातात, वाचकांच्या परिषदा भरविल्या जातात, व्याख्यानमाला गुंफल्या जातात, साहित्यसम्मेलनें भरविलीं जातात, व वाचकांच्या लेखकांशीं प्रत्यक्ष मुलाखती ठेवल्या जातात. सोविएत युनियनमध्ये असें एकहि कुटुंब नाही कीं जें कांही वृत्तपत्रांचे व मासिकांचे वर्गणीदार नाही किंवा पुस्तके विकत घेत नाही किंवा ग्रंथालयांचे सभासद नाही.

# पुण्याचा ग्रंथपालन वर्ग

## वासुदेव पुरुषोत्तम कोल्हटकर

**परिचय**— जन्म १९११ पुणें, हे बी. ए., बी. टी., डिप्लिब्. असून यांची ग्रंथालयविषयक कळकळ व कार्यकुशलता ग्रंथालय चळवळीस बरीच कारणीभूत झाली आहे. निरनिराळ्या ग्रंथालय चळवळींत यांनी आपुलकीने व चिकाटीने कार्ये करून त्या यशस्वी केल्या आहेत. हे पुणें येथील ग्रंथपालन वर्गाचे व्यवस्थापक, महाराष्ट्र ग्रंथालय संघाचे सदस्य व पुणें ग्रंथालय संघाचे चिटणीस असून पहिली महाराष्ट्र ग्रंथालय परिषद पुणें हिचे चिटणीस होते. यांचीं 'ग्रंथालयांची व्यवस्था' 'ग्रंथालयीन वर्गीकरण', 'ग्रंथालयीन सूचिलेखन' व 'मराठी ललित वाङ्मयाचें वर्गीकरण' हीं ग्रंथालयविषयक चार पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. सध्या हे मुंबई सरकारच्या योजनेंतील महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय पुणें येथे ग्रंथपाल आहेत.

### आजचा वाचकवर्ग

आज सर्वत्र दिसणाऱ्या ग्रंथालयांची चालू अवस्था बदलून त्यांत सुधारणा कशी करतां येईल याचा विचार पुणें ग्रंथालय संघाच्या सदस्यांनी प्रथमपासूनच मनांत घेतला. ग्रंथालयें, ग्रंथपाल व ग्रंथपालनाचा व्यवसाय यांस अजूनहि शिष्टमान्यता वाजवी प्रमाणांत लाभलेली नाही. परिस्थिति बहुशः सर्वत्र एकच आढळते. ग्रंथालय गावांत असलेंच तर कोठे तरी तळमजल्यावर किंवा पोटमाळ्यावर

जुनाट घराच्या अंधाऱ्या वा साफ उघड्या पडलेल्या खोलींत असतें. तें तळमजल्यावर असेल तर त्याच्या खिडकीझरोक्यांतून तेथल्या जखव वा पोरसवदा वयाच्या ग्रंथपालाला वात्रट पोरें किंवा ैग्प्रवृत्तीचे प्रौढ वाकुल्या दाखवीत असतात. उलट तें उंचावर असेल तर त्याच्या जिन्याच्या चारचार पांचपांच पायऱ्या ओलांडून धबाधब उड्या टाकीत किंवा बाजूच्या कठड्यावरून घसरगुंडी करीत बाल-वाचक बाहेर पडतात. वयोवृद्ध वाचक खुर्च्या अडवून ( केव्हा वाटहि अडवून ) स्थितप्रज्ञतेने ध्यानमग्न होऊन ग्रंथालयाचा उपभोग घेतात. कोणी महिला कांहीशा संकोचांतच प्रवेश करतात व चांगलं आराम-शीर बसावें याचें भान न ठेवून कशातरी वाकून खुर्चीच्या कोपऱ्यांत मुरकुंडी करून टेकतात, तर कोणी विशिष्टतेच्या म्हणजे फॅशनच्या प्रदर्शनाकरतांच 'हें नको तें, तें नको हें' अशीं सारखीं बदलून पुस्तकें मागवात. कोणीही वाचक–बाल असो, वृद्ध असो; स्त्री असो, पुरुष असो; ग्रंथपालापेक्षा आपणास खरोखरीच जास्त ज्ञान आहे असें खात्रीने समजून सूचना–पुस्तकांत हव्या त्या आणि हव्या तितक्या व वाटेल तेव्हा नि वाटतील तशा सूचना पुनःपुन्हा करतात.

## वाचकांची मनोवृत्ति व ग्रंथपालाची आवश्यकता

वृत्तपत्रें आपल्या मांडीखालीं घालून तीं लपवून ठेवणारे; वाच-कांना हुसकून देऊं पाहणारे; आपण या ग्रंथालयांत आपलें तरुण वय झोपा घेण्यांत व चकाट्या पिटण्यांत संपूर्ण घालविलें आणि म्हणून आता उतार वयांत जणू ती मिरासदारी गाजविणार म्हणणारे; ग्रंथपाल जुना असेल तर त्याच्यावर जणू आपणच मेहरबानी करून त्यास लावून, सांभाळून व टिकवून घेतलें या दृढ समजाने व नवा तरुणच असेल तर तो बच्चा आहे या दृष्टीने त्याला गुरकावून टाकणारे;

असे जेवढे भिन्न स्वभावाचे नि तऱ्हांचे वाचक असतील त्यांस मर्यादेच्या, मोजक्या आणि मधूर शब्दात या सर्व गैरगोष्टींची मनाई करून ग्रंथालयाचा सर्व कारभार सुरळीत ठेवणारा ग्रंथपाल आता हवा आहे. प्रत्येक पुस्तकाला एक विशिष्ट विषय असतो हें नीट जाणणारा ग्रंथपाल हवा आहे. हिशोब तर हिशोबच, देवघेव तर देव-घेवच, दप्तर तर दप्तरच यांपैकी जें पुढे येईल त्यांतच गुरफटून न जाता सर्व गोष्टी कांही ठराविक आखणाने व वाटणीने परंतु एक-समयींच सुरळीत करूं शकणारा ग्रंथपाल हवा आहे. तो येईल तेव्हाच ग्रंथालयें सुधारतील. पण तो कोठून आणावयाचा ?

## आजचे ग्रंथपाल व ते बदलण्याची आवश्यकता !

ग्रंथपालाची म्हणून आज जी जागा ओळखली जाते त्या जागीं गतकाळांत अनेक ठिकाणीं अगदी चुकार आणि लाचार असे अनेक सेवक होऊन गेले असतील. आजहि त्यांपैकी जीवनौघांत जर्जर होऊन गेलेले त्या गादीवरील मांड टिकवून असताल. पण ग्रंथालय प्रसाराची चळवळ म्हणून जी काय अलीकडे सुरू झाली आहे, तिच्याकडे लक्ष देऊन कांही ठिकाणच्या चालकांनी नवे ग्रंथपाल नेमण्यास सुरवात केली आहेसें ऐकूं येतें. हे नवे ग्रंथपाल तरी कोण ? तर नव्या वयाचे, अलीकड जन्मलेले आणि ग्रंथालयांत नेमलेले म्हणून ग्रंथपाल एवढेंच. कारण ग्रंथपाल असा शिक्का मिळण्याची सोय महाराष्ट्रांत अजूनहि कोठेच नव्हती. कोणीही ग्रंथालयांतील गादीवर बादरायणी हक्क सांगत अर्ज टाकावा व त्यांत म्हणावें 'माझ्या कांही खास कल्पना ग्रंथालय चालविण्याबाबत आहेत; मी अखंड वाचक आहे व म्हणून मला नेमावें.' चालकांपुढे कांही चटपटीतपणा केला, त्यांचीच प्रशस्तिपत्रें अर्जाला लावलीं, थोडें पुढे पुढे केलें की ग्रंथपाल ही

पदवी झालीच त्याला बहाल. मग तो कोणत्याही ग्रंथालयांतील ग्रंथपाल असो — तालुका, जिल्हा, प्रादेशिक, मध्यवर्ती, शालेय, कॉलेजीय वा विद्यापीठीय यांपैकी कोठेही कमींत कमी खर्चांत नवा ग्रंथपाल, नवीन खास कल्पनांचा ग्रंथपाल ! खास शिक्षित नसला म्हणून काय झालें ? खास कल्पनांचा व हमखास हुकमतींतला हें काय थोडें झालें ? पण हें किती काळ चालूं द्यावें ? यांत बदल झाल्यास पाहिजे: म्हणजेच अन्ट्रेंड ग्रंथपालाऐवजी ट्रेंड ग्रंथपाल आला पाहिजे. आणि हा बदल व्हावा, ग्रंथालयें खरीं कार्यक्षम व्हावीं, व लोकांना ग्रंथालयांचें महत्त्व पटून तें हवेंसें वाटूं लागावें म्हणूनच ना. खेरांनी मोफत सार्वजनिक ग्रंथालयें सुरू केलीं आहेत.

## वर्ग सुरू करण्याच्या विचाराला चालना —

ग्रंथालयांचे सर्व प्रकार सध्या ठिकठिकाणीं दिसत आहेत. विद्यालयीन, शालेय, वृत्तपत्रीय, सार्वजनिक—जिल्हा, तालुका इ. अनेक प्रकार आहेत. आता आतापर्यंत या प्रकारांपैकी कोठल्याहि ठिकाणीं मुद्दाम माहिती घेतलेले ग्रंथपाल नव्हते. प्रथम ते विद्यालयीन ग्रंथालयांतून दिसूं लागले. तरीहि ते अजूनहि सर्वत्र नाहीतच. शालेय वगैरे प्रकाराबद्दल मूळांतच अभावाची परिस्थिति सर्वत्र होती. सरकारी योजनेमुळे, पंतप्रधान ना. खेर यांच्या ठिकठिकाणच्या वक्तव्यांमुळे व त्या वक्तव्यांतून प्रकट झालेल्या याविषयींच्या आशादायी दूरदर्शी धोरणामुळे, पुणें ग्रंथालयसंघ, मुंबईचा मराठी ग्रंथालयसंघ व भारतीय ग्रंथालयसंघ या सर्व संघांच्या परिषदांमुळे, मुंबई विद्यापीठाचे माजी ग्रंथपाल डॉ. पु. म. जोशी यांच्या संग्राहक व प्रोत्साहक हालचालीमुळे, हल्ली दिल्लीस असणाऱ्या डॉ. शि. रा. रंगनाथन् यांच्या पुणें मुंबईच्या भेटींमुळे, ग्रंथालयविषयक नवीन पुस्तकांमुळें अशा अनेक

कारणांनी वा योगायोगांनी ग्रंथालयें आणि ग्रंथपाल यांचे संबंधींची ती जुन्या काळांतली उपेक्षेची–बेदखलीची भावना हळूहळू निश्चितपणानें स्मृतिशेष होत आहे. आजच्या स्वतंत्र भारतांत सर्व लोकांस चटकन् कांही वैशिष्ट्य दिसेल अशा तऱ्हेने ग्रंथालयांची सजावट करतां यावी, कोणतेंहि अवडंबरी तंत्र न येऊं देतां लोकांना जें सहज समजेल, आकृष्ट करील असें कांही नाविन्य येऊन जें जुन्याहून वेगळें व नव्याकडे निश्चितपणें नेणारें आणि कोणतेंहि नुकसान न करणारें असावें अशा तऱ्हेच्या तंत्राची आवश्यकता ध्यानांत घेऊन पुणें ग्रंथालयसंघाने आपल्या वर्गाचा अभ्यासक्रम आखला व तो चालूहि केला. आणि म्हणूनच या वर्गाचें अत्यंत महत्त्व आहे, हें निराळें सांगावयास नको !

## वर्गाचा अभ्यासक्रम

या दृष्टीनेच ग्रंथालयांची तांत्रिक, शिक्षणविषयक, व आर्थिक व्यवस्था तसेंच पुस्तकांची विषयवार, आकारवार, मागणीवार मांडणी; आणि पुस्तकांच्या विविध विषयांसंबंधीं प्रकाशित मजकुराच्या याद्या व शक्यतर पत्रें (cards) यांचें लेखन; हिंदुस्थान व महाराष्ट्र यांमधील विशेषाने तपशीलवार आणि स्थूलमानाने, इतर देशांमधील सर्व प्रकारांच्या ग्रंथालयांचा उगम व क्रमाने झालेला त्यांचा विकास; कोणतीहि बारीकसारीक माहिती मागण्याकरतां ग्रंथालयाकडे कोणी वळला तर ती माहिती त्यास अवश्य व अचूक मिळावी म्हणून तशी विविध परीची माहिती गोळा करण्याचें व ती सुलभ ठेवण्याचें ग्रंथपालाचें कर्तव्य व कसब; या सर्वांचा विचार करून कमींत कमी वेळांत जास्तींत जास्त ग्रंथालयव्यवहाराचें विवेचन करतां येईल असाच अभ्यासक्रम आखला गेला आणि त्यानुसार दोन महिन्यांतील

नियुक्त वेळांत प्रत्येक विषयाच्या अध्यापकांनी यथाशक्य मराठींतून आपापला नियत अभ्यास पुरा केला. मराठींत हा विषय अगदी प्रथमच आकार धारण करतो आहे. परंतु अध्यापकांना जें शिक्षण मिळालें तें इंग्रजींतूनच आणि पुस्तकेंहि आहेत तींपण इंग्रजीच. त्यामुळें विद्यार्थ्यांना मराठींतून विषय समजाविणें हा विशेष श्रमाचा भाग आहे. या अभ्यासाबरोबरच पुण्यांतील विविध ग्रंथालयें व ग्रंथालयांच्या दैनंदिन कामाशीं संबंध येणारीं इतर स्थळें यांस मुद्दाम भेट देऊन तेथील ग्राह्य व अग्राह्य असे विभाग वर्गाला दाखविणें, विद्यार्थ्यांनी अभ्यासाचे कामीं कळकळीने मग्न राहावें—म्हणून त्याचेकडून टिपणें, निबंध, गृहपाठ, चांचणी प्रश्न इत्यादि वेळोवेळीं लिहून घेणें, शेवटीं परीक्षा घेणें अशा रीतीनें दोन महिन्यांत सामान्य ग्रंथपालांचे प्रत्यक्ष शिक्षण पुरें केलें जातें.

## दोनच महिने

ज्या ग्रंथालयांतून वरील ग्रंथपालास ग्रंथपालाचें काम मिळणार असतें तेथे सामान्य प्रकारचेंच काम असतें. म्हणून विनाकारण जास्त काळ त्या माहितीकरितां खर्चू नये हें उघड आहे अर्थात वर्गाच्या अभ्यासक्रमाची मुदत सर्वसामान्यतः ग्रंथालयांच्या व्यवस्थेची माहिती घेण्याच्या व खर्चाच्या दृष्टीने कमींत कमी असेल तीच ठेवणें व त्या वेळेंत नियुक्त विषयांच्या अध्यापनाची तरतूद करणें या गोष्टींचा प्रामुख्याने विचार करावा लागला. आणि हा विषय मराठींत नवीन असल्यामुळे याकरिता खाजगी ग्रंथसंग्रह नाहीत. म्हणून वर्गाकरितां संघाने एक छोटासा संग्रहहि केला आहे. याशिवाय येथल्या सर्व ग्रंथालयांकडून याविषयाचीं पुस्तकें वर्गाचे वेळीं जमविलीं जातात.

अशा पूर्वयोजनेने १९४७च्या एप्रिल'त त्या वेळचे मुंबई विद्यापीठाचे ग्रंथपाल डॉ. पु. म. जोशी यांच्या शुभ हस्तें जो उपक्रम केला तो आज सारखा वाढत चालला आहे, गेल्या चार वर्षांत जो माहिती. या वर्गात दिली गेली तिचा उपयोग येथले विद्यार्थी जेथे जेथे गेले तेथे तेथे त्यांना जेवढा म्हणून करता आला. त्यावरून अशा माहिती बद्दल संस्था चालकांची भूमिका अनुकूल बनत चालली आहे अशी नंतरच्या पत्रव्यवहाराने कळलेली वार्ता आहे. ती निःसंशय उत्साहकारक आहे. शालेय ग्रंथालयांना तर या माहितीचा लवकर फायदा मिळणें आवश्यक आहे, असें शाळांतून दिसून आलें. परंतु ग्रंथालय या जागेसंबंधी ( म्ह० खुद्द ग्रंथालयाची खोली व तेथील जागा म्हणजे post या दुहेरी अर्थी ) जुन्या जमान्यांतील कल्पना अद्यापहि रेंगाळत आहेत. व त्यामुळे स्वतःच्या खर्चाने या वर्गातून शिकून गेलेल्या शिक्षिताला तेथे अवश्य तेवढा अवसर मिळतोच आहे असें नाही. तरीहि कांही ध्येयाने, कांही हौशीने, व कांही (भाबड्या) आशेने, वाचकांकरवी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षतः मिळणाऱ्या उत्तेजनाने जें करतां येईल तें काम हे वर्गातून बाहेर गेलेले माहितगार साक्षेपाने उरकीत आहेत. आणि त्यामुळेच संस्थाचालकांना ग्रंथालयाच्या पूर्वीच्या चित्रांत व बदल होत चाललेल्या चित्रात फरक दिसून ते वर्गाला, वर्गातून मिळणाऱ्या माहितीला, त्या माहितीमुळे ग्रंथालयांत होणाऱ्या इष्ट पालटाला आणि सर्वांमुळे तें काम करणाऱ्या त्या माहितगार ग्रंथपालाला शनैः शनैः अनुकूल होत चालले आहेत. हा फरक काय कमी महत्त्वाचा आहे? केवळ दोन महिन्यांत दिलेल्या शिक्षणाच्या पुंजीवरच हा फरक आधारलेला आहे हें ध्यानांत असावें. या दोन महिन्यांच्या फरकास कोणी 'झटपट रंगारी' फरक असें नांव म्हणेल, पण त्याचा अर्थ केवळ

परिहासविजल्पित म्हणूनच घेणें जरूर आहे. या दोन महिन्यांत कोणत्याहि महाविद्यालयाकरितां किंवा विश्वविद्यालयाकरितां वगैरे कोणीही तयार होणार नाही, केला जाणार नाही हे खास. परंतु आज सर्वत्र दिसणाऱ्या ग्रंथालयांना ह्या माहितगार ग्रंथालयसेवकांची फार आवश्यकता आहे हे निश्चित!

## शिक्षितांची संख्या इत्यादि--

हा सर्व प्रकारचा अभ्यासक्रम यावच्छक्य मेहनतीने प्राप्त अवसरांत पुरा करून घेतला जातो. याहून अधिक काळ, अधिक अभ्यास, अधिक सावकाशी, प्रत्यक्ष कांही ग्रंथालयीन काम या वर्गाच्या विद्यार्थ्यांना मिळावें याविषयीं पूर्ण व निश्चित जाणीव व्यवस्थापक वर्गाला आहे. परंतु वेळ व पैसा यांचा ताळमेळ बसविण्याच्या दृष्टीने जेवढें व जमजसें करता येईल तसतसें करण्याचें उत्तरोत्तर धोरण आहे आणि या उपक्रमाला सर्वत्र वाढता पाठिंबा मिळत आहे हें पुढील आकड्यावरून सिद्ध होईल.

| | वर्ष | प्रशस्तिपत्रें घेऊन गेले | बी. ए. | उप बी. ए. | मॅट्रिक | उप मॅट्रिक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | १९४७ | १६ | २ | ६ | ६ | २ |
| २ | १९४८ | २४ | ४ | ९ | ९ | ३ |
| ३ | १९४९ | २९ | ५ | ६ | १५ | १२ |
| ४ | १९५० | ४४ | १४ | १२ | १६ | २ |

आतांपर्यंत जबलपूर, नागपूर, नासिक, नगर, मुंबई, वाई, जळगाव, सातारा, पंढरपूर, सोलापूर, जमखंडी, बेळगाव, कुलाबा, या ठिकाणांहून शिक्षणासाठी विद्यार्थी आले. गेल्या दोन वर्षांपासून

वसतिगृहाची पण व्यवस्था केली आहे. यामुळे चार वर्षांत एकूण सतरा स्त्रिया शिक्षण घेऊन उत्तीर्ण झाल्या आहेत. अधिकाधिक शिकलेले लोक कालक्रमाने वर्गांत येत आहेत. वर्षांत आणखी कोणत्या वेळीं वर्ग ठेवतां येईल? अशी विचारणाही होत आहे. यामुळे अभ्यासक्रम अधिक दीर्घ मुदतीचा व भरीव अभ्यासमानाचा लवकरच करणें प्राप्त होईल. मात्र येथून बाहेर पडणाऱ्या शिक्षितांची ठिकठिकाणीं सोय लागून वर्गाला शाळा, कॉलेजें व इतर ग्रंथालयें यांच्याकडून वाढतें साहाय्य मिळणें जरूर आहे. याविषयीं विचार करण्याबद्दल सर्व ग्रंथालय चालकांस प्रार्थना आहे.

## वर्गाला सरकारी मान्यतेची आवश्यकता

पुण्यांतील सर्वच शिक्षित ग्रंथपाल या वर्गाच्या कामांत अध्यापक किंवा परीक्षक म्हणून सहभागी आहेत.

प्राचार्य धनंजयराव गाडगीळ हे संघाचे अध्यक्ष आहेत. त्यांच्या पुरस्कारामुळेच वर्गाच्या अभ्यासक्रमाबद्दल प्रांतीय ग्रंथालय खात्याचे अधिकारी श्री त्र्यं. दि. वाकनीस यांनी सरकारकडे शिफारस केली आहे व त्यांचे शिफारसीमुळे सरकारी मान्यता मिळू घातली आहे. ती सरकारी कामाच्या क्रमानुसार मिळेल अशी खात्री आहे.

## सर्वांचें सहकार्य हवें

या ग्रंथपालन वर्गाला ग्रंथपाल, ग्रंथालय संस्था, जनता व सरकार यांनी सर्व बाजूंनी भरीव उत्तेजन व सक्रिय पाठिंबा देणें अत्यंत आवश्यक आहे. आणि यांच्या सहकार्यावरच आजच्या ग्रंथपालांचें व ग्रंथालयांचें उज्वल भवितव्य अवलंबून आहे. तें निराळें सांगावयास नकोच !

# लोकशाहींतील सार्वजनिक ग्रंथालयें

## त्र्यंबक दिनकर वाकनीस

**परिचय**—जन्म पुणें १९०२. हे मुंबई व लंडन विद्यापीठाचे पदवीधर आहेत [ बी. ए. (ऑनर्स) मुंबई; ] यांची सन १९३३ मध्ये बडोद्याचे महाराज कै. श्रीमंत सयाजीराव यांनी बडोदे संस्थानच्या ग्रंथालय प्रमुखपदावर नेमणूक केली. संस्थानतर्फे सन १९३४ मध्ये हे ग्रंथपालाच्या उच्च शिक्षणाकरितां लंडनला गेले व तेथील विद्यापीठाचें ग्रंथालय शास्त्राचें प्रमाणपत्र यांनी मिळविलें. हे १९४६ पर्यंत बडोदे संस्थानच्या ग्रंथालयाचे प्रमुख (क्यूरेटर ऑफ लायब्ररिज) होते. पुढे सन १९४९ मध्ये मुंबई सरकारने यांची मुंबई राज्याचे ग्रंथालय प्रमुख (क्यूरेटर) म्हणून नेमणूक केली. तेव्हापासून हे त्याच पदावर काम करतात. सन १९४४ मध्ये ठाणें जिल्हा व उपनगर ग्रंथालय परिषदेचे अध्यक्ष, १९४५ मध्ये लाहोर येथील इंडिया बुक लीगच्या बुक फेस्टिव्हलचे उद्घाटक १९४९ च्या महाराष्ट्र ग्रंथालय परिषदेचे अध्यक्ष, सन १९४० ते ४६ पर्यंत इंडियन लायब्ररी असोसिएशनचे उपाध्यक्ष. १९५१ मध्ये इंदोर येथे भरणाऱ्या अखिल भारतीय ग्रंथालय परिषदेचे नियोजित अध्यक्ष. यांचा ‘ आदर्श ग्रंथालय ’ हा लेख ‘ प्रदक्षिणा ’ या पुस्तकांत प्रसिद्ध झाला आहे. तसेच स्फुटलेख मासिकांत व भाषणें रेडियोवर झालीं आहेत. डिसेंबर १९५० त त्यांनी ‘ग्रंथसंस्कार’ नावाची एक पुस्तिका प्रसिद्धिली.

## युगधर्म

विसाव्या शतकाचा अर्धा भाग ३१ डिसेंबर १९५० रोजीं पूर्ण झाला. ह्या अर्ध्या शतकाचीं वैशिष्ट्यें काय झालीं याची नोंद विचारवंत लोक घेऊं लागले आहेत. कोणत्या प्रभावी व्यक्तींनी जागतिक जीवनावर ठसा उमटविला याचें विवरण करणारे लेख प्रसिद्ध होऊं लागले आहेत. व्यक्तींची निवड करतांना निरनिराळया देशांच्या लेखकांमध्ये मतभेद होणें स्वाभाविक आहे. तथापि गेल्या अर्धशतकांत जीं दोन जगद्व्याळ महायुद्धें झालीं त्या युद्धांमुळे प्रत्येक देशांतल्या जीवनांत आमूलाग्र परिवर्तन झालें याबद्दल दुमत होऊं शकणार नाही. युद्धाचे परिणाम प्रत्येक देशाला निरनिराळया प्रकाराने भोगावे लागत आहेत. शेतीच्या जमीनी, रहावयाचीं घरें, उपयोगी वस्तूंची पैदास करणारे कारखाने उध्वस्त झाल्याने सगळया जगाला खायला अन्न नाही, राहण्याला घर नाही व अंग झाकण्यास वस्त्र नाही अशी दैन्यावस्था भोगावयाला लागत आहे. विमानें, रेडियो, पेनिसिलीन वगैरे सारख्या तारक साधनांच्या बरोबरच ॲटमबॉंब वगैरे विध्वंसक साधनांचा युद्धांत जन्म होऊन सर्व विश्वाला तीं भेडसावून राहिलीं आहेत. पण वाईटांतूनहि चांगलें निघतें म्हणतात किंवा अंधाऱ्या रात्रींच तारे अधिक दैदिप्यमान दिसतात, त्याप्रमाणे या युद्धांतूनच एक जीवनतत्त्व अग्निदिव्यांतून तावून सुलाखून सुखरूप बाहेर पडलें आहे. ते म्हणजे लोकशाहीचें तत्त्व. या तत्त्वाच्या उदया-बरोबरच भारताच्या पारतंत्र्याचें नष्टचर्य संपलें; व हिंद देश १५ जून १९४७ रोजीं स्वतंत्र झाला व २६ जानेवारी १९५० ला सार्वभौम संघराज्य स्थापन झालें.

## सार्वत्रिक पुरस्कार

A hero is a hero at all points या न्यायाने राजकारणात विजयी झालेल्या लोकशाही तत्त्वाचा पुरस्कार राजकारणाशिवाय इतर क्षेत्रांतहि आवर्जून केला जात आहे. सारख्या कामगिरीला सारखीं बक्षिसें या समाजवादाच्या घोषवाक्याला लोकशाहीचा पाठिंबा आहे. हिंदु कोड बिलांत मुलामुलींचे वारसा हक्क समसमान असावेत अशी लोकशाहीचीच शिकवणूक आहे. सक्तीचें असो किंवा ऐच्छिक असो शिक्षण हें सर्व आबालप्रौढ नागरिकांना मिळावयास हवें ही शिक्षणक्षेत्रांतील लोकशाही आहे.

## नैतिक अधिष्ठान

लोकशाहीची लाट आता कोणालाही कोणत्याही क्षेत्रांत थोपवून धरतां येणार नाही. समता, ममता व स्वातंत्र्य ह्या सद्‌गुणांचें नैतिक अधिष्टान असलेल्या तत्त्वांचा विरोध तर काय पण अल्पसा अवरोध तरी कोण करूं शकणार ? युगबल न ओळखतां, आपल्याच तोऱ्यांत राहणाऱ्यांची काय स्थिति होते हें दर्शविणारा एक हरदासी चुटका आहे. एक भांडवलदार, एक हुकमशहा व एक मजूर संघ सदस्य एका होडींत बसले होते. कर्मधर्मसंयोगाने ती उपडी झाली व तिघेही पाण्यांत पडून पोहूं लागले. पहिल्यांदा हुकुमशहा बुडाला. कारण त्याने आपला उजवा हात सलाम करण्यासाठी पाण्याच्या वर ताठ धरला होता. त्यानंतर भांडवलदार अदृश्य झाला; कारण त्याच्या भांडवलाच्या ओझ्याने त्याला खाली ओढलें. मजूरसंघ सदस्य हा मात्र तीराला लागणार अशा विश्वासाने दमांत पोहत होता. पण त्यानेहि शेवटीं गटंगळ्या खाल्ल्या; कारण किनाऱ्यावरच्या गिरणीचा इतक्यांत भोंगा वाजल्याने त्याने हातपाय हालविण्याचें बंद केलें.

## ग्रंथालयांचें धोरण

तात्पर्य काय की संस्था किंवा राष्ट्र जगवायची इच्छा असली तर आपलें धोरण लोकशाही युगाला अनुरूप असें ठेवावयास हवें. जवळ जवळ शंभर वर्षांची परंपरा असणाऱ्या हिंदुस्थानांतील सार्वजनिक ग्रंथालयांच्या धोरणांत लोकशाहीच्या दृष्टीने बदल करावयास हवा किंवा कसें हें ह्या लेखांत पहावयाचें आहे.

## एकस्व ( Copyright ) व सार्वजनिक ग्रंथालयें

मुंबई सरकारने मध्यवर्ती ग्रंथालय (Central Library); तीन प्रादेशिक ग्रंथालयें (Regional Libraries); सोळा जिल्हा ग्रंथालयें व एकशें सत्तावीस तालुका ग्रंथालयें इतक्या संस्थांना सरकारी मान्यता व मदत दिलीं आहे. ह्यांतील मध्यवर्ती व प्रादेशिक ग्रंथालयें ग्रंथकर्त्यांच्या मालकी हक्काची जपणूक करणारीं ग्रंथालयें आहेत व इतर सार्वजनिक ग्रंथालयें म्हणून ओळखलीं जातात.

## सार्वजनिक ग्रंथालयांतील विषमता

ह्या सार्वजनिक ग्रंथालयांत आपणाला लोकशाहीचीं तत्वें आढळून येतात कां? समतेचा विचार करूं. ग्रंथालयांत प्रवेश मिळविण्यास सर्वांना समान अधिकार आहे कां? म्हटलें तर आहे, म्हटलें तर नाही, अशी मुग्धावस्था असल्याचें आढळून येईल. सार्वजनिक ग्रंथालयांत सामायिक खंड व ग्रंथ खंड असे किमान दोन विभाग असतात. सरकारी मदत व मान्यता मिळविण्यास या दोन्ही खंडांत सामान्य वाचकांना मज्जाव नसावा असा सरकारी नियम आहे. पण त्या नियमाला पळवाट आहे; व ती म्हणजे एक उपनियम असा आहे की सामान्य जनतेचा मुक्तद्वार प्रवेशाचा हक्क वर्गणी-

दारांच्या अग्रहक्कांचा मान राखूनच संभाळला जाईल. प्रत्यक्ष वहिवाटीकडे पाहिलें तर असें दिसून येतें की अग्रहक्कांच्या जपणुकींत सामान्य वाचकांचे हक्क मारलेच जातात. सार्वजनिक ग्रंथालयांत ह्या दोन्ही विभागांचे प्रत्येकी दोन पोटविभाग केलेले असतात. एवढयासाठी की एकाचा उपयोग सामान्य जनतेने करावा व दुसऱ्याचा वर्गणीदारांनो.* उदाहरणार्थ मुंबईच्या मध्यवर्ती ग्रंथालयांत प्रवेश पायऱ्याजवळच कुंपण घातलेल्या दालनांत सामान्य वाचकांचा नियतकालिक-वाचन-खंड आहे. त्यांत एकहि बसावयाची खूर्ची नाही. डाव्या बाजूस आंतल्या अंगाला चांगल्या आराम खुर्च्यांनी सुसज्ज अशी खोली वर्गणीदारांसाठी आहे. नियतकालिकेंहि दोन्ही ठिकाणच्चीं भिन्न भिन्न आहेत. सामान्य जनांच्या विभागांत एकहि पाश्चात्य देशांतलें साप्ताहिक किंवा मासिक नाही. भारतांतलीं सुद्धा मासिकें नाहीतच. सचित्र साप्ताहिकांची गोष्टच कशाला ? तसेंच ग्रंथवाचन विभागांत सामान्य वाचकांसाठी टाऊन हॉलमध्ये पंसवीस तीस खुर्च्या इतस्ततः ठेविल्या आहेत. उजेड क्वचित असतो; क्वचित नसतो. ग्रंथालयांत बसल्यासारखें वाटण्यास पुस्तकांची एकुलती एक जोड घडवंची आहे. कांही मामुली संदर्भ ग्रंथ मात्र त्यावर असतात. ह्याच्या उलट वर्गणीदारांच्या वाचनखंडांची सोय आहे. त्यांत ग्रंथ आहेत. ग्रंथपाल असतात; अद्यावत् ग्रंथसूच्या असतात व वाचकांना सर्वांत अधिक मौल्यवान हवी असलेली वस्तु तेथे मिळते. ती म्हणजे तेथे नांदत असलेलें नीरव निस्तब्धतेचें वातावरण ही होय. एका तालुका वाचनालयांत वर्गणीदार-वाचकांच्या व इतर वाचकांच्या वेळाच भिन्न ठेविल्या आहेत. मग

---

* हल्ली परिस्थिती सुधारलेली आहे.—त्र्यं. दि. वा.

वर्गणीदार सकाळीं आले असतांना त्यांना दुपारीं येणाऱ्या इतरेजनांचा विटाळ संपर्कोपसर्ग कोठून होणार? ह्या हकीकती चटकन ध्यानांत आल्या म्हणून लिहिल्या. वास्तविकपणें सर्व ग्रंथालयांतूनच आपापल्या परीने वर्गणीदार व इतर वाचक यांचेमध्ये कांहीना कांही पंक्तिप्रपंच केला जातो. वर्गणीदारांशिवाय इतरांना पुस्तकें घरीं घेऊन जावयाची सवलत एकाहि ग्रंथालयांत नाही. म्हणजे काय, समता फक्त नांवांत राहते, कृतींत उतरत नाही. लोकशाहींत विषमता असूंच शकत नाही अगर असतच नाही असें नाही. पण विषमता समान संधि दिल्यानंतर उत्पन्न झालेली असेल तर ती लोकशाहींत खपूं शकते. ग्रंथालयांत एकाद्या विद्वान वाचकाला अगर लेखकाला कांही विशेष सवलती देण्यात आल्या तर त्या चालतील. कारण आपल्या विद्वत्तेने त्याने त्या मिळविलेल्या असतात. पण सरस्वतिमंदिरांत लक्ष्मीपुत्रांना मिळणाऱ्या सवलतीसुद्धा विद्वानांना मिळाल्या नाहीत म्हणजे नाथाघरचा उलटा न्यायच म्हणावेंसें वाटतें.

## सार्वजनिक ग्रंथालयांची अर्थव्यवस्था

चालकांच्या वतीने असें म्हणण्यांत येईल की वर्गणी ठेवली नाही तर ग्रंथालयांना पैसा कोण देणार? त्याचें उत्तर असें की ज्याना ग्रंथालयांचा उपयोग करावयाचा आहे ते देतील. पण वर्गणीच्या रूपाने नव्हे तर कराच्या किंवा पट्टीच्या रूपाने. वर्गणी ऐच्छिक असते म्हणूनच त्यांत भरती ओहोटी असते. एखाद्या वर्षी कार्यकर्त्यांच्या उत्साहामुळे किंवा त्यांच्या समाजांतल्या दर्जाच्या दडपणामुळे वर्गणी भरपूर गोळा होते. तर दुसऱ्या वर्षी कार्यकर्त्यांच्या मंदोत्साहामुळे म्हणा किंवा त्यांच्या उत्साहाला सामाजिक वजन नसल्यामुळे म्हणा वर्गणी तुटपुंजी जमा होते. वर्गणी भारी ठेविल्यास वर्गणीदारांची संख्या घटते व ग्रंथालयाच्या सार्वजनिकतेस कमीपणा येतो. वर्गणी अल्प

ठेविल्यास आमदानी पुरेशी होत नाही. त्यामुळे ग्रंथादि साहित्य योग्य प्रमाणांत संग्रहतां येत नाही व जें थोडें संग्रहिलें जातें त्याचा जास्तींत जास्त उपयोग करणारे कार्यक्षम सेवक नेमतां येत नाहीत. उलट कर किंवा पट्टी हे व्यक्तिनिरपेक्ष, सक्तीचे व सार्वजनिक असल्याने एका कुटुंबापाठीमागे वार्षिक एक रुपया यासारख्या स्वल्पसुद्धा कराच्या उत्पन्नाचें प्रमाण वर्षानुवर्षे सतत सारखें उंचीचें राहतें. कर किंवा पट्टी ही एखादी शासनसंस्थाच लागू करूं शकते. ही संस्था स्थानिक स्वराज्याची असूं शकेल किंवा मध्यवर्ती असूं शकेल. दुर्दैवाने आपल्याकडील स्थानिक स्वराज्य संस्थांना स्वतःच्या शैक्षणिक जबाबदारीची ओळख अजून पटली नाही. म्हणून त्या जबाबदाऱ्या मध्यवर्ती सरकारला स्वीकाराव्या लागतात. लोकशाहींत बहुजन-समाजापैकी प्रत्येक व्यक्ति ही सुशिक्षित व सुसंस्कृत असावी लागते. लहानपणीं प्रत्येक व्यक्तीस अक्षरओळख करून घेण्याचें उत्तरदायित्व सरकार आपण होऊन स्वीकारतें व प्राथमिक शाळा चालवितें. प्रौढांना सुसंस्कृत ठेवण्याचें उत्तरदायित्व सरकारवर ओघानेच येतें. यावज्जीव शिक्षण देणारीं ग्रंथालयें; किंवा सांस्कृतिक संग्रहालयें चालविण्याचें उत्तरदायित्व सरकारला टाळतां येत नाही. निदान पक्षीं welfare state ला म्हणजे लोककल्याण हेंच जिचें ध्येय आहे अशा शासन-संस्थेला स्वतःच्या ब्रीदाशीं लपंडाव खेळल्याखेरीज अशी टाळाटाळ करतां येत नाही. वर्गणीदाराची संख्या केव्हाहि मर्यादित राहते; त्याच्यासाठी त्यांनी चालविलेल्या ग्रंथालयास सार्वजनिक म्हणावयाचें म्हणजे एक प्रकारची शाब्दिक ताणाताणच होय ! बेडकाने पोट कितीहि फुगविलें तरी त्याचा बैल कसा होणार ?

## अनाठायीं भीति

नाममात्र वर्गणीच्या समर्थनार्थ असें जर म्हटलें गेलें की

वर्गणीची अट न ठेविल्यास कोणीहि सोम्या गोम्या येऊन पुस्तकें घेऊन जाईल, परत करणार नाही व ग्रंथालय ओसाड ओढयाप्रमाणे दिसू लागेल. तर त्याला उत्तर असें की ही भीति अनाठायीं आहे. महिनाभर फुकट सिगारेट ओढावयास मिळालेल्या माणसास सिगारेटचें व्यसन लागतें व स्वतःच्या पैशाने तो धूम्रपान करूं लागतो, हा व्यवहारांतला अनुभव आहे. तसेंच ग्रंथालयांतून कांही महिने पुस्तकें फुकट वाचावयास नेणाऱ्या वाचकाला वाचनाची चटक लागते. व ग्रंथालयाचीं पुस्तकें तो नियमितपणें परत करतो. एवढेंच नव्हे तर पदरचे दोन पैसे खर्च करून घरांत एक ग्रंथालयाच उघडतो असा पाश्चात्य देशांचा अनुभव आहे. कांही झालें तरी स्वार्थासाठी तरी वाचकाला सचोटी आचरणांत आणावी लागते. ग्रंथालयाचें एकाददुसरें पुस्तक लांबविलें तर त्यांतील हजारों पुस्तकांच्या वाचनाला त्याला मुकावें लागेल, हें जाणून ग्रंथालयाची पुस्तकें परत न करण्याचा आंतबट्ट्याचा व्यापार कोण करील? आणि समजा एखाद्या गावीं असे गणंग भेटलेच तर गणंगांचें गाव म्हणून समंजस माणसांनी त्यांचा नाद सोडला पाहिजे. एका गावीं एका खिस्ती पाद्र्याची जी स्थिती झाली त्यापेक्षा वाईट ग्रंथालयचालकाची होणार नाही खास. पाद्र्याने प्रार्थना प्रवचन केल्यावर चर्चच्या पुनरुद्धारासाठी मदत मागितली व शिरस्त्याप्रमाणे आपली टोपी श्रोत्यांत फिरविली. त्यांत एक कपर्दिकहि पडली नाही. तेव्हा त्यांत कांही मिळालें नाही असें दर्शविण्यासाठी त्याने ती टोपी टेबलावर पालथी केली, व आकाशाकडे डोळे करून तो परमेश्वरास म्हणाला; 'देवा तुझी दया अगाध आहे. ह्या लोकांनी माझी टोपी तरी मला परत दिली. धन्य असो तुझ्या प्रेरणेची!'

## कामोपभोग व काव्योपभोग

कधी कधी प्रकाशक व ग्रंथकर्ते हे विनामूल्य वाचनालया-विरुद्ध अशी तक्रार करतात की मोफत वाचनालयांतून वाचक पुस्तकें वाचतात व मग ते तीं विकत घेत नाहीत, त्यामुळे ग्रंथकर्ते व प्रकाशक ह्या दोहोंचीहि आर्थिक हानि होते. ह्या आक्षेपाला उत्तर असें की अनुभवापेक्षा अनुमानाचाच ह्या प्रस्तावाला जास्त टेका आहे. अनुमान देखील शास्त्रसंमत नाही. कारण पुस्तक एकदा वाचलें की कार्यभाग झाला असें जें प्रमेय त्यांत गृहित धरलें आहे तें चुकीचें आहे. पुस्तकाचा कोणताही व्यासंगी हें कबूल करणार नाही. हरिभाऊ आपटे स्कॉट व डिकन्सच्या कादंबऱ्यांचें, शेक्सपियर ह्यांच्या नाटकांचें अखंड पारायण करीत असत. संस्कृतमध्ये कामोपभोगासंबंधी एक सुभाषित आहे की, 'न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मा इव भूय भूयोऽभिवर्धते।' हें वचन काव्योपभोगाला लागू आहे. कामोपभोगाप्रमाणेच काव्योपभोगाला पुनरावर्तनाची अपेक्षा असते. एकदा वाचून कार्यभाग होत नाही. वाचनाची चटक लागलेला वाचक वाचनमंदिरांत पुनःपुनः पुस्तकांशीं घसट करावयास आल्याशिवाय राहणार नाही.

## वर्गणीदारांची कंपूशाही

ह्याचे उलट असें म्हणतां येतें की वर्गणी घेण्याने केवळ लोकशाहीच्या पायारूप समतेचाच भंग होतो असें नाही तर त्यामुळे ग्रंथालयाच्या वाढीलाहि दुहेरी उपसर्ग पोहचतो. एक तर वर्गणीदार वर्गणी देऊन देऊन काय देतात ? सरड्याची धाव कुंपणापर्यंत म्हणतात त्याप्रमाणें ग्रंथालयाच्या खर्चाच्या मानाने ही रकम 'दर्यामें खसखस' असते. वर्गणी घेऊन वर्गणीदारांना कांही सवलती द्याव्या लागतात. उदाहरणार्थ कांही दैनिकें किंवा मासिकें त्यांना घरीं

ऱ्यावयास मिळतात. पण दैनिकें, मासिकें विकत घेण्याच्या शक्तीला मर्यादा असते. पांच प्रती घेतल्या तर दहा वर्गणीदारांची सोय होते असें मानलें तरी दहाच्या वर ज्या वाचकांना वर्गणी भरण्याची इच्छा व कुवत असेल त्यांचें काय होणार? त्यांना उंबरठ्यावरच ताटकळत उभें रहावें लागतें ना? परिणाम असा होतो की त्यांचें ग्रथालयाविषयीं मन विटतें. औदासिन्यापर्यंतच जर त्या विटण्याची मजल गेली असती तरी फार हरकत नव्हती. पण पुष्कळ वेळा औदासिन्य हें आत्यंतिक विरोधाचें रूप धारण करतें. ज्यांना अधिकार व सवलती प्राप्त झाल्या असतात त्यांचें ग्रंथालय हें खाजगी चरावयाचें कुरण होऊन बसतें. आपल्या मनाशीं आपण ह्याचा पडताळा घेतलात तर आपणाला अशा कित्येक ग्रंथालयांचीं उदाहरणें ध्यानांत येतील की तेथे कंपूशाहीने सार्वजनिक संस्थेच्या वाढीला खो दिला आहे.

तेव्हा लोकशाहींत सार्थतेने सार्वजनिक म्हणवून घेण्यासाठी ग्रंथालयें हीं सर्व लोकांनी; सर्व लोकांसाठी आर्थिक साह्याने चालविलीं पाहिजेत असा निष्कर्ष वरील विवेचनांतून निघाल्यावाचून राहत नाही.

## वाङ्मयाचें तांबोलीकरण

सार्वजनिक ग्रंथालयांमध्ये सर्व जनांना सारखाच शिरकाव नसतो; ही जशी एक उणीव आहे, तशी दुसरी उणीव ही आहे की सार्वजनिक ग्रंथालयांमध्ये सार्वजनिक स्वरूपाच्या ग्रंथांचा अभाव असतो. हा दोष चालकांचा नव्हे तर सर्व समाजाचा आहे. आपल्याकडे ग्रंथ म्हणजे ललित वाङ्मय असें समीकरण होऊन बसलें आहे. Literature of Knowledge and Literature of power असे साहित्याचे जे दोन भाग कल्पिले जातात त्यांपैकी Literature

of knowledge की ज्या साहित्यापासून स्फूर्तीपेक्षा माहिती अधिक मिळते असें साहित्य आपल्याकडे नसल्यासारखेंच असतें. शिवणकाम; भरतकाम; सुतारीलोहारी; ग्रंथबंधन; टंकलेखन वगैरे वगैरे शहरांतून लागणाऱ्या उपयुक्त कलांवर ग्रंथांचा तुटवडा आहे. तेंच दुर्भिक्ष निरनिराळ्या तऱ्हेचीं पिकें काढणाऱ्या किंवा बगीच्यांची मशागत करावयास शिकविणाऱ्या पुस्तकांचें आहे. पाश्चात्य ग्रंथालयांतून अशीं दैनंदिन जीवनाशीं संबंध आणणारीं पुस्तकें साठविलेलीं असल्यानेच जनता ग्रंथालयांत जाण्यास आकर्षिली जाते. राजकारण तेलीतांबोळ्यापर्यंत नेऊन भिडवावयाचें असा लोकमान्यांनी संकल्प बांधला व महात्माजींनी तो सफल केला. तसें वाङ्मयाचें तांबोलीकरण अजून झालें नाही. ललित वाङ्मयसुद्धा समाजांतल्या कांही वर्गाच्या जीवनाशीं समान झालेलें असतें. " Cab Sir " किंवा " Yes Sir " अशा सारखीं मोटरड्रायव्हर किंवा हाटेलबॉयचीं आत्मचरित्रें मराठींत व्हावयाचीं आहेत. त्यामुळे त्या वर्गाच्या वाचकांखेरीज इतरेजनांना ग्रंथालयाविषयी आपुलकी वाटत नाही. शेतकरी, कामकरी वर्गाचीच बहुसंख्य प्रजा असते असें असून त्यांच्या दैनंदिन जीवनाशीं संबंध आलेलें वाङ्मय आधीच थोडें असतें; व आर्जवून बसवलें जातें असें होत नाही. अशा वर्गाच्या उन्नतीसाठी सरकार आपल्या खात्यामार्फत विपुल वाङ्मय निर्माण करतें; पण तें अभ्यासून त्याचें लोण त्या वर्गापर्यंत पोचविण्यासाठी दखल कोणत्या सार्वजनिक ग्रंथालयांत घेतली जाते ? सरकारने हल्ली जिल्हानिहाय Publicity Officers म्हणजे प्रसिद्धि अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या आहेत. त्यांचें सहकार्य ग्रंथालय चालकांनी साधलें पाहिजे. हायस्कूल किंवा कॉलेजमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना तरी सार्वजनिक ग्रंथालयांचा कितपत उपयोग होतो ? शाळेंतले शिक्षक किंवा कॉलेज युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर्स ह्यांच्या

सहकार्याने ग्रंथालयांची ह्या दिशेने सहज समृद्धि होण्यासारखी आहे. मॅट्रिक किंवा बी. ए., बी. एस्‌सी. होणाऱ्या विद्यार्थ्यांना कोणकोणत्या व्यवसायांत शिरतां येईल ह्याचें दिग्दर्शन करणारी संदर्भसामुग्री किती ग्रंथालयांतून आढळेल ? नोकरींत शिरण्यासाठी निरनिराळया Public Service Commission कडून स्पर्धा परीक्षा घेण्यांत येतात. त्यांचें Byllabuse किंवा पूर्वी झालेल्या परीक्षांचीं प्रश्नपत्रें संकलित केलीं तर ग्रंथालयांची आकर्षकता निश्चित नाही का वाढणार ?

## आधुनिक साहित्य सामुग्री

सध्याचें जग हें कांही छापील पुस्तकांचें नाही. छापण्याच्या कलेचा शोध लागल्यापासून परवापरवापर्यंत विचारांचें संक्रमण ग्रंथद्वारा मोठ्या प्रमाणावर होत असे. पण आता ग्रंथांइतकीच किंबहुना अधिक कार्यक्षम साधनें मनुष्याला उपलब्ध झालीं आहेत. फिल्म किंवा फिल्मस्ट्रिप्स, रेडीओ किंवा रेकार्डस हीं साधनें अशीं आहेत की, लिहितां वाचतां न येणाऱ्यालाहि तीं बोधपाठ किंवा माहिती देऊं शकतील. चित्रें किंवा गाणींहि कांही एका भाषेचीं लेणीं नाहीत. त्यांचें आकर्षण जगभर असतें. ‘मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्‌।’ मुके, लुळे, पांगळे व आंधळे ह्यांना सुद्धा विरंगुळा देतील आणि त्यांच्याहि अपंग जीवनांत राम निर्माण करतील असें सामर्थ्य असलेलीं अशीं साधनें आधुनिक ग्रंथालयांत अवश्य बसविलीं पाहिजेत.

## ग्रंथालयांचे द्वारा शांति, तुष्टी, पुष्टी !

आज जगांत शांतता परिषदा भरत आहेत. युद्धाला तोंड फुटूं नये म्हणून जगांतील सर्व नेत्यांचे प्रयत्न चालू आहेत. भांडण तंटे हे

नेहमी अज्ञानमूलक असतात. 'ज्ञातं इति क्षांतं' 'To know all is to forgive all.' 'Tout comprendre c'est tout pardonner.' अशीं दरेक भाषेंत सुभाषितें आहेत. एक पुस्तक दोघांनी वाचल्यास त्यांच्यामध्ये सहानुभूतीचा प्रेमभाव असतो.

अनेक पुस्तकें अनेकांच्या वाचनांत आणून त्यांचेमध्ये प्रेम आणि बंधुभाव उत्पन्न करण्याचें सामर्थ्य ग्रंथालयांत आहे. ज्ञान हें देश व भाषा ह्यांच्या बंधनापलीकडे असल्याने विश्वबंधुत्वाचें एकमेव प्रतिक फक्त ज्ञानभांडार हेंच आहे. मतामतांच्या कोलाहलांत सर्वांना सारख्या प्रेमाने आसरा देणारें ग्रंथालय हें एकच स्थान आहे. Unesco ला त्या साधनांचें महत्त्व पटल्यामुळेच सर्व जगाचें लक्ष बनलेल्या हिंद देशांत त्या संस्थेने एक आदर्श सार्वजनिक ग्रंथालय दोन वर्षेंपर्यंत चालविण्याचें योजलें आहे. ग्रंथालय प्रेमी रसिकांनाच नव्हे तर सर्व शांतता-वाद्यांना हा उपक्रम स्वागतार्ह, कौतुकास्पद व अनुकरणीय वाटेल काय?

---

## महाराष्ट्रांतील वृत्तपत्रें व ग्रंथसंभार

| | | |
|---|---|---|
| आजचीं वृत्तपत्रें | सुमारें | ७०० |
| ,, मासिकें इ० | ,, | ५०० |
| आजवरचीं सर्व वृत्तपत्रें | ,, | १००० |
| ,, ,, मासिकें इ० | ,, | १००० |
| आढळलेलीं आद्य मुद्रितें | ,, | १००० |
| आजवरचे सर्व मुद्रित ग्रंथ | ,, | २५००० |

---

# भावी काळांतील ग्रंथालयें

## दिनकर विनायक काळे

**परिचय:**—जन्म रत्नागिरी १८९८. हे एम्. ए. असून यांनी ग्रंथालय चळवळीला बराच हातभार लावला आहे. हे महाराष्ट्र ग्रंथालय परिषदेच्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष होते. यांनी ग्रंथालयांसंबंधी बरेच लेख वर्तमानपत्रांतून लिहिले आहेत. हे सध्या केसरी–मराठा ग्रंथालय, पुणें याचे क्यूरेटर असून 'सह्याद्रि' ह्या भारदस्त मासिकाचे कुशल संपादक आहेत. तसेच हे महाराष्ट्र ग्रंथालयाचे चिटणीस आणि पुणें विद्यापीठ बोर्डाचे सभासदहि आहेत. याशिवाय इतर बऱ्याच संस्थांशीं यांचा निरनिराळया नात्याने संबंध आहे. हे ग्रंथालय चळवळींतील अत्यंत कार्यकुशल, तत्पर व चिकाटीने कार्य करणारे असे प्रमुख कार्यकर्ते आहेत. यांच्या अविरत श्रमानें पुणें ग्रंथालय संघाची स्थापना होऊन स्पृहणीय अशी प्रगतीही झाली आहे. यांचे इतिहास, राजकारण, समाजशास्त्र आदि विषय आवडीचे आहेत.

### ग्रंथ व ग्रंथालयाचें महत्व

'पुस्तकस्थ विद्या' ही 'परहस्तगत धना'इतकीच निरुपयोगी होय हा इशारा व्यक्तीच्या दृष्टीने आणि आणीबाणीच्या वेळीं खराच आहे. प्रसंग उभा राहिला असतां दुसऱ्याच्या हातचें धन जसें आपली अडचण भागवीत नाही तसेंच पुस्तकांतील उपाय स्वतःला अवगत

नसला तर त्याचा आपल्याला काडीचाहि उपयोग नाही. परंतु ग्रंथनिविष्ट विद्या ही फक्त डोक्यांतील विद्येपेक्षा अधिक समाजोपयोगी आहे. लेखनसरणी अवलंबितांच आपोआप तिचें समाजीकरण होतें. ग्रंथ हा माणसासारखा लहरी गुरु नाही. म्हणूनच ग्रंथ आणि ग्रंथालयें यांचा गौरव हजारो वर्षांपासून करण्यांत आलेला आहे. आपल्याकडील सरस्वतीपूजनामध्ये जी ज्ञानदेवतेची कल्पना आहे, तिच्यासारखीच ग्रंथालयासंबधी पवित्र ज्ञानमंदिराची कल्पना ठेवून एका ग्रीक ग्रंथालयावर 'येथे कोणी अश्रद्धाने प्रवेश करू नये' अशी पाटी कोरली होती. ग्रंथालयाला 'आत्म्याचें रुग्णालय' असें दुसरें सूचक नांव प्राचीन इतिहासांत सापडतें. याचें तात्पर्य असें की ग्रंथालयाचें महत्त्व हें त्याच्या संघटनेपासूनच जगमान्य आहे. गेल्या २२ जुलैलाच ओटावा येथे भरलेल्या शिक्षकांच्या जागतिक मेळाव्याने तर 'परस्परासंबंधी ज्ञान आणि जागतिक शांतता' यांचा अपरिहार्य संबंध प्रतिपादून ज्ञानभांडारें या नात्याने ग्रंथालयांवर जगांत शांतता प्रस्थापित करण्याची ही नवीनच जबाबदारी टाकली आहे. आणि भावी काळांतील जीवन अधिकच गुंतागुंतीचें होणार असल्याने मनुष्यापुढे जे नवे नवे प्रश्न दत्त म्हणून उभे राहणार आहेत—सुखी जीवनाचे, आत्मरक्षणाचे, शत्रुनिर्दालनाचे, शिक्षणाचे, ज्ञानसंवर्धनाचे—ते सर्व प्रश्न सोडविण्याचीं साधनें ग्रंथालयें पुरविणार आहेत. जिज्ञासेने भारलेल्या मानवाने जगांतल्या अनेक स्थळीं असंख्य प्रयोग व अनंत प्रकारच्या अनुभवांचें सार संकलित करून आणि नाना-विध माध्यमांनी चित्रित करून तें आपल्या पाठीमागून येणाऱ्यांच्या साठी शिल्लक टेवलेलें आहे केवळ ग्रंथपुस्तकांचेंच नव्हे तर चित्रादि कलाकृतिसंग्रहांचें, गायनादि ध्वनिमुद्रिकांचें, पुस्तिकांचें, नकाशांचें, आलेखांचें, छायाचित्रांचें, मुद्रितांचें, शिलालेखताम्रपटांचें,

हस्तलिखितांचें आणि मनुष्याच्या कर्तृत्वाचा ठसा उमटलेल्या आणि त्याची साक्ष देणाऱ्या प्रत्येक कृतीचें स्वागत आणि संरक्षण आधुनिक आणि भावी कालांतील ग्रंथालयें करणार आहेत—आजच करूं लागलीं आहेत. कारण ह्या सर्व कृति म्हणजे मनुष्याने आपल्याला सुचलेल्या अनेक प्रश्नांचीं दिलेलीं उत्तरें आहेत आणि म्हणूनच भावी पिढ्यांना तीं सदैव मार्गदर्शक होणारीं आहेत. भावी कालांतील ग्रंथालयांचें स्वरूप असें सर्वसंग्राहक होणार आहे. मानव या पृथ्वीतलावर अवतरल्यापासून आजच्या सुसंस्कृत अवस्थेला येईपर्यंतचा त्याचा इतिहास, परंपरा, ज्ञान-विज्ञान, शिल्पकला, यांत्रिक वगैरे शोध आणि उद्योग या सर्वांचें संकलित चित्र पुढे उभें करणारें **ग्रंथालय**, हें केव्हाहि **अत्यंत महत्त्वाचें ठरणार आहे**, याबद्दल कोणालाच शंका वाटण्याचें कारण नाही.

## ग्रंथालयांचीं दोन चित्रें

पण हें भावी काळचें ग्रंथालय आज सिद्ध आहे का? नाही. आपल्या ग्रंथालयांच्या बाबतींतील परिस्थितीचें स्वरूप दोन्ही दृष्टींनी शोचनीय आहे. आपल्याकडील लोकांचें आपल्या ग्रंथालयांबद्दल आज पराकाष्ठेचें औदासिन्य आहे. आणि आपलीं बहुतेक ग्रंथालयें तर इतक्या दुरावस्थेंत आहेत की त्यांना ग्रंथालयें म्हणणें देखील शोभण्यासारखें नाही. ह्या दोन्ही विधानांबद्दल विशेष पुरावा दिला पाहिजे असें नाही. आपलीं वृत्तपत्रें, सभा, चर्चा यांमध्ये ग्रंथालयविषयक किती कमी लिहिलें व बोललें जातें हें पाहिलें म्हणजे पहिल्या विधानाची खात्री पटेल आणि वर आधुनिक ग्रंथालयाचें जें शब्दचित्र दिलें आहे त्यावरून आपल्या इकडील ग्रंथालयांच्या हलाखीच्या स्थितीबद्दल शंका राहणार नाही. वरील

शब्दचित्राचें वास्तविक स्वरूप आज अमेरिकेंतील वॉशिंग्टन शहरांतील सुप्रसिद्ध 'लायब्ररी ऑफ कॉंग्रेस' यासारख्या दीडशें वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या महाग्रंथालयांत पाहावयास मिळतें. यांतील केवळ ज्यांना आपण पुस्तकें म्हणूं अशांची संख्या ९० लक्ष असून बाकीच्या वर वर्णन केलेल्या सर्व वस्तु जमेला धरल्या तर त्या एकूण ३ कोटी होतात. या ग्रंथालयासाठी इमारतीच्या आंतील ३६ एकर क्षेत्र वापरांत आहे, पुस्तकांच्या कप्प्यांची लांबी ४१४ मैल आहे. वाचनाचीं दालनें २० आहेत. सामान्य लोकांना तेथे सहज संदर्भ मिळतो. आणि प्रत्यहीं देशांतील अनेक प्रवासी आणि अभ्यासक त्या संग्रहाचा फायदा घेतात. हें जगांतील सर्वांत मोठें वाचनालय आहे. तेथील सर्वसंग्रहाची, फक्त जाग्यावर संदर्भ पाहावयास मिळण्याची आणि देशाच्या इतिहासाचीं सर्वश्रेष्ठ आणि अस्सल पत्रें, सनदा, तह आदि-करून सर्व साधनें जनतेला पाहण्यासाठी सुरक्षित ठेवण्याची व्यवस्था ध्यानांत घेतली म्हणजे आपल्याला भारतवर्षांत अजून केवढी मजल मारावयाची आहे याची बरोबर कल्पना येईल.

## मंदगतीचीं पावलें

आपल्याकडील ग्रंथालयविश्वाची परिस्थिति काय आहे? मला मुंबई राज्याच्या बाहेरची परिस्थिति फारशी माहीत नाही. परंतु अमेरिकेंत वगैरे ग्रंथालय संघ असतात आणि ते ग्रंथालय चळवळ चालवितात तसे कार्यक्षम संघ आपल्याकडे नाहीत. अनुकरणाने तशा नांवाच्या संस्था पांचपंचवीस वर्षांत स्थापिल्या गेल्या आहेत. परंतु त्यांचें कार्य सतत चाललेलें नाही. अधून मधून परिषदा भरवून विशेष कांही प्रगति वा लोकजागृति झालेली दिसली नाही. आपल्या सरकारचें अगदी अलीकडे इकडे लक्ष वेधलें आहे. मुंबई राज्यांत ग्रंथालय

संवर्धन समिति नेमली गेली (१९३७) तशी इतरत्र नेमली गेल्याचें ऐकिवांत नाही. आणि तेथे झालें तें एवढेंच की अजूनपर्यंत ब्रिटिश सरकारने राजद्रोहाचें संशोधन करण्यासाठी प्रत्येक प्रकाशित पुस्तकाचा जो संग्रह केला होता तो भाषावार विभागून प्रादेशिक मध्यवर्ति अशा चार ग्रंथालयांत विभागून वाचकांना संदर्भार्थ मोकळा करण्यांत आला, आणि जिल्हा–तालुका ग्रंथालयांना अल्प प्रमाणांत सरकार-कडून वार्षिक कांही मदत (ग्रँट) देण्यांत येऊं लागली. सरकारकडून मराठी मुलखाच्या महाराष्ट्र ग्रंथालयाकडे आलेलीं पुस्तकें मूळ संख्येच्या फक्त तीनचतुर्थांश असून बाकीचीं–आणि तींच महत्त्वाचीं होतीं–गहाळ झालेलीं आढळलीं. त्यांतील बरींच आता दुर्मिळ आहेत. तात्पर्य, केवळ मराठी भाषेंतील प्रसिद्ध झालेलें पुस्तक न् पुस्तक, वृत्तपत्र, पुस्तिका, प्रत्येक चिटोरें कोठे मिळेल असें एखादें देखील ठिकाण या भूतलावर नाही. ही स्थिति भारतांतील अन्य कोणत्याहि भाषेबद्दल तशीच आहे. भावी काळातील ग्रंथालयविश्वाबद्दल भव्य स्वप्नच रंगवावयाचें म्हटलें तर अभ्यासकाला प्रत्येक सार्वजनिक उपयोगासाठी छापलेलें पत्रक–पुस्तक, ओळ न् ओळ उपलब्ध झाली पाहिजे. ही गोष्ट कधीकाळीं शक्य होईल काय ?

## सुधारणा कशी व कोणी करावी ?

मुंबई, कलकत्ता, दिल्ली अशीं मोठीं शहरें सोडा. अन्यत्र काय दृष्टीस पडतें ? चैतन्यरहित इमारती, अगदीच विस्कळित कार्यपद्धति, अपुऱ्या वेतनामुळे असंतुष्ट सेवकवर्ग, उदासीन अधिकारी मंडळें, आणि या सर्वांची स्वाभाविक प्रतिक्रिया म्हणून तितकाच निष्काळजी, बेजबाबदार आणि सहानुभूतिशून्य वाचकवर्ग ! कांही थोडया ग्रंथाल-यांना बरीच प्रसिद्धि मिळते; पण ती ‘ वासरांत लंगडी गाय शहाणी ’

या न्यायाने प्रमाणाच्या बाहेर मिळते. एरवीं ग्रंथालयजगतांत फारच सुधारणा व्हावयास पाहिजे आहे. ती हळूहळू लोकमतांत व चालू व्यवस्थेंत परिवर्तन होऊन व्हावी कीं एकदम क्रांति होऊन व्हावी ? हा तसा वाद करण्यासारखा प्रश्न असूंच शकत नाही. माझ्या मतें चांगली गोष्ट शक्य असेल तर एकदम घडवून आणली पाहिजे. आणि त्यांत केवळ सरकारचाच प्रश्न असता तर एका लेखणीच्या फटका-ऱ्यासरशीं इष्ट ती सुधारणा व्हावी असा आग्रह धरणें योग्य झालें असतें; परंतु ग्रंथालयांची वाढ ही लोकांसाठी करावयाची असल्यामुळे त्यांच्यामध्ये आवश्यकतेची जाणीव उत्पन्न होऊन त्यांच्याकडून त्या-संबंधी मागणी येईल अशी परिस्थिति उत्पन्न होण्यापूर्वी ग्रंथालयांची आघाडी उघडली तर अनावश्यक भासणारी गोष्ट प्राप्त झाली म्हणून लोकांच्या हातून ग्रंथालयांची आबाळच व्हावयाची !

या दृष्टीने विचार करतां लोकांमध्ये ग्रंथालयांविषयी लोकमत जागृत करणें ही एक फार मोठी समाजसेवा आहे. जवळ जवळ नव्वद टक्के निरक्षर जनता असलेल्या आपल्या देशांत साक्षरताप्रसाराच्या शेंडी-पासूनच आपल्या या संन्याशाच्या वाचनलग्नाची तयारी केली पाहिजे. शहरें आणि पुढारलेलीं गावें वाचनाची शक्यता व आवड असलेल्यां-च्या सहकारी प्रयत्नांनी स्वतःसाठी ग्रंथालय–वाचनालयें उघडतील; परंतु मागासलेल्या भागासाठी सरकार आणि सरकारपुरस्कृत स्थानिक संस्था किंवा लोकोपकारक धनिक अशांवरच सारी भिस्त ठेवावी लागेल. सर्व पुढारलेल्या देशांमध्ये लोकशाही शिक्षणाच्या दृष्टीने आवश्यक गोष्ट म्हणून ग्रंथालयांचा सार्वत्रिक योगक्षेम खास ग्रंथालय कायद्याने चाल-विण्यांत येतो. इंग्लंडमध्ये इ. स. १८९२, १९१९, १९३३ वगैरे सालीं अनेक कायदे झाले आहेत. सधन अमेरिकेमध्ये प्रत्येक संस्थानांतील ग्रंथालयांवर खूप पैसा खर्च करण्यांत येतो. सर्व समाजांत एकरूप

प्रगति निर्माण करण्याचें कार्य स्वयंप्रेरणेने लोकांकडून आणि ग्रंथालयांकडून व्हावें अशी आपली अपेक्षा असल्यामुळे आपल्याकडे **सर्वांत प्रथम प्रत्येक राज्यामध्ये सार्वजनिक ग्रंथालयांचा कायदा झालाच पाहिजे,** असा आपण आग्रहच धरणें अवश्य आहे.

## सर्वांगीण प्रगतिसाठीं सरकारचें सहकार्य हवें !

ग्रंथालयांचा शिक्षणप्रसाराशीं निकट संबंध असल्यामुळे शाळा-कॉलेजांतील ग्रंथालयांप्रमाणेच सार्वजनिक ग्रंथालयांची देखील शिक्षण खात्याशीं किंवा स्वतंत्र एखाद्या सरकारच्या ग्रंथालय खात्याशीं सांगड घालणें व सरकारी देखरेखीची व्यवस्था करणें अत्यंत आवश्यक आहे. सरकारची देखरेखच केवळ नव्हे तर सरकारच्या अन्य तऱ्हेच्या नियंत्रणाचाहि पुरस्कार करण्याला स्वराज्य सरकारच्या अमदानींत आम्हास हरकत दिसत नाही. सरकारच्या नियंत्रणाबद्दल अविश्वास दर्शविण्यांचें यापुढे कोणत्याहि प्रकारचें कारण राहिलेलें नाही. ग्रंथालय चळवळीची सर्वांगीण प्रगति होऊन ती आपल्या पायावर उभी राहूं शकेल तेव्हा सरकारी नियंत्रणाची दिशा साहजिकच बदलतां यावी असे लोकशाहींतील कायदे लवचित ठेवतां येतील असा विश्वास वाटतो. ग्रंथालयांचा चांगला कायदा कसा असावा याबद्दल तपशील येथे देण्यास जागा नाही. त्याचीं कलमें डॉ. रंगनाथन् यांच्यासारख्या तज्ज्ञांनी यापूर्वी प्रकाशून चर्चिलेलीं आहेत. तेव्हा ग्रंथालयांसंबंधी सुव्यवस्था झाली म्हणजे आपल्याला कोणत्या प्रकारची सुस्थिति ग्रंथालयक्षेत्रांत लाभेल तिचें अल्पप्रमाण शब्दचित्र येथे रेखाटण्याचा प्रयत्न करूं या.

## ग्रंथालयाच्या सुस्थितीचें शब्दचित्र !

नाटकें सिनेमाप्रमाणे करमणुकीसाठी घरीं कादंबऱ्या नेऊन वाचूं पाहणाऱ्यांची गोष्ट एक वेळ सोडून दिली तरी सर्वसाधारण ज्ञाना-

र्जनासाठी पुस्तकें वाचून आपला मनोविकास करूं पाहणाऱ्या कोणाहि सज्जनाला, आपल्याजवळ महिन्याकाठीं द्यावी लागणारी रुपया दीड रुपया वर्गणी नाही म्हणून, मनसोक्त वाचण्याची बंदी नसावी. ग्रंथालयांत बसून तास न् तास विनामूल्य वाचनाची तहान त्यास भागवितां यावी. यासाठी ग्रंथालयें जितकीं अधिकांत अधिक—बारा तास, चौदा तास—उघडीं ठेवतां येतील तेवढीं राहावीं. ग्रंथालयांमध्ये ग्रंथ आणि इतर ज्ञानार्जनाच्या साधनांची इतकी समृद्धि असावी की बसल्या जागीं सर्व विश्वाची दखल घेतां यावी. आणि हें प्रथम प्रथम कोणत्याहि एका ग्रंथालयाला एकट्याच्या बळावर साधतां येत नसेल तर विवक्षित भौगोलिक प्रदेशांतील सर्व ग्रंथालयें एका सूत्रांत व एका बंधनांत अशा पद्धतीने आणावीं कीं त्या सर्वांचा एक गट बनवून त्या सर्व गटांत मिळून नाना तऱ्हेची ग्रंथसंपत्ति विखरून राखावी आणि जरूरीप्रमाणे एका ग्रंथालयांतून दुसऱ्या ग्रंथालयांतील वाचकाला वाटेल तें पुस्तक मिळावें. अशा सर्व गटांतील ग्रंथालयांत निष्कारण द्विरुक्ति न करून आणि गटांतील सर्व ग्रंथालयांतील ग्रंथांची एकच संकलित यादी (युनिअन कॅटॅलॉग) उपलब्ध करून द्विरुक्तीचा वगैरे अपव्यय वाचावावा. हें सहज साध्य होण्यासाठी हल्लीप्रमाणे प्रत्येक ग्रंथालयाचें स्वतंत्र अधिकारी मंडळ न ठेवतां एका भूप्रदेशांतील बहुसंख्य ग्रंथालयें एकाच अधिकारी मंडळाने जबाबदारीने चालविणें अवश्य आहे. असें झालें म्हणजे कोणाहि एका ग्रंथालयांतील वाचकत्वाची प्रवेशपत्रिका तेवढ्या भूप्रदेशांतील अन्य कोणत्याहि ग्रंथालयांत चालूं शकेल. आणि सर्व देशाचीच एकरूप संघटना झाली तर ती प्रवेशपत्रिका सर्व देशभर देखील चालूं शकेल. यासाठी सर्व देशांतील ग्रंथालयव्यवस्था एका कायद्याच्या अनुरोधाने चालली तर केवढा फायदा होईल ? सरकार

**इतर कर वसूल करतें तसाच ग्रंथालय कायदा करून त्याने दरडोई अल्पसा कर वसूल करून ग्रंथालयांची सर्वच व्यवस्था ग्रंथालयांसाठी स्वतंत्र खातें काढून चालविली तर आजची द्विरुक्ति, दुबार व्यवस्था, अल्प साधनांनी होणारी कुचंबणा अशा किती तरी आपत्तींतून आपला बचाव होईल ?**

## साकार होणारें गोड स्वप्न

असें झालें तर मग गैरसोयीच्या कोंदट इमारती औषधाला देखील राहणार नाहीत. ग्रंथसंग्रह, वृत्तपत्रवाचनालय, ग्रंथवाचनालय अशीं सोईचीं दालनें सुसज्ज आसनांनी सुशोभित असल्यामुळे वाच-काचा तेथील काल प्रसन्न आणि आरोग्यप्रद वातावरणांत जाईल. प्रत्येक ग्रंथालयांतील व्यवस्थापक मंडळें सहानुभूतीची आणि सेवकवर्ग शास्त्रशिक्षित असेल आणि दोन्ही मिळून सुवृत्त वाचकाला सर्व प्रकारचें साह्य देण्यांत धन्यता मानतील. अशा सुव्यवस्थेखालील ग्रंथालयांतील कुलपांचें साम्राज्य कमी होईल आणि नव्याजुन्या सर्व पुस्तकांना वाटेल तेव्हा जवळ जाऊन कुरवाळण्याचें आणि ग्रंथसंग्र-हांतून आवडीचें पुस्तक प्रत्यक्ष पाहून निवडण्याचें सुख प्रत्येक सुबुद्ध अभ्यासकाला अनुभवतां येईल. सर्वत्र दृग्गोचर होणाऱ्या या निर्भय आणि विश्वासाच्या वागणुकीमुळे आज संशयित म्हणून ठरलेले वाचक देखील आत्मविश्वासाने प्रामाणिक बनतील आणि स्वतंत्र राष्ट्राचे स्वाभिमानी घटक म्हणून छाती वर काढून चालतील. हळू हळू फाटकीं तुटकीं पुस्तकें कमी होऊन मोठ्या प्रमाणावरच्या कारभारामुळे आपो-आप घडून येणाऱ्या काटकसरीच्या योजनांनी सुंदर पुस्तकांच्या सुबक रचनेमुळे ग्रंथालयें अधिक आकर्षक ठरतील. जुनीं टाकाऊ पुस्तकें

काढून टाकून त्यांच्या नव्या आणि अद्यावत आवृत्त्या जागरुकपणें खरीदल्या जातील. वाचकांसाठी करण्यांत आलेले प्राचीन आणि पुरातन पोलिसी वाटणारे नियम मागे पडून आधुनिक वळणाचे आणि मनुष्याची उत्सुकता आणि स्वयंप्रेरणा फुलविणारे सहानुभूति-पूर्ण आणि वाचनाकडे आकर्षित करणारे चैतन्ययुक्त पोटनियम झळकूं लागतील. वाचनालयें हीं ज्ञानमंदिरेंच होत ही जाणीव देशांतील या टोकापासून त्या टोकापर्यंत फैलावेल आणि समान सांस्कृतिक काम करणाऱ्या स्थानिक वाङ्मयीन आणि सामाजिक संस्थांशीं सहकार्य केल्याने ग्रंथालयें हीं त्या भूप्रदेशांतील संस्कृतिकेंद्रें होतील आणि समाजविकासाच्या सर्व चळवळी, सोज्वळ करमणुकीची व्याख्यानमालादि साधनें, ज्ञानचित्रपट, कलाप्रदर्शनें इत्यादींचें तीं आगर ठरतील. सभोवतालच्या भूप्रदेशांतील नागरिक, आर्थिक, औद्योगिक जीवनाचें मार्गदर्शन तेथून होईल. सहकारी जीवन तेथून उगम पावेल. समाजांतील बुद्धिमान आणि कार्यकर्ती माणसें तेथे जमा होतील. आणि अगदी बालवयांतील शिशु, बाल, तरुण, व्यवसायी, वृद्ध आणि भगिनीवर्ग या सर्वांच्या भिन्न भिन्न गरजा भागविण्याचें ग्रंथालय हें एक परमधाम मानलें जाईल.

भावी काळचें ग्रंथालय हें असें झालें पाहिजे. हें केवळ दिवास्वप्न नाही. पाश्चात्य देशांत अनेक ठिकाणीं हें ध्येय मूर्त स्वरूपांत अवतरलेलें पाहावयास मिळतें. तिकडे शताब्दि होत आहेत त्या चळवळी आपल्याकडे अगदी नुकत्याच जन्म घेत आहेत. आपण पद्धतशीर प्रयत्न केल्यास आपल्यालाहि आपलें ध्येय साध्य होईल.

---

# खेड्यांतील वाचनालयें

## कृ. के. राहाळकर

**परिचय**—जन्म १९०८ अलिबाग, येथील इंडस्ट्रियल हायस्कूलमध्ये अध्यापक आहेत. हे ग्रंथालय चळवळीचे कार्य-कर्ते असून यांचा ग्रंथालय चळवळींत बराच हात असतो. हे वृत्तपत्रांतून लघुकथा व लेखहि लिहितात. यांचा 'कोंकण-कथा' नांवाचा कथासंग्रह नुकताच 'नव-कोंकण' ह्या त्यांच्याच प्रकाश-नातर्फे प्रसिद्ध झाला आहे. सध्या हे अलिबाग सार्वजनिक वाचनालयाचे कार्याध्यक्ष, कुलाबा जिल्हा संघाचे कार्यवाह व महाराष्ट्र ग्रंथालय संघ पुणें यांचे कार्यकारी सभासद आहेत. याशिवाय निरनिराळ्या सार्वजनिक चळवळींत व कार्यांत हे आस्थेने काम करीत असतात.

स्वतंत्र भारतांत खेडयांना फार महत्त्व प्राप्त होणार आहे. हा देश खेडयाखेडयांनी भरलेला आहे. खेडीं हीं राष्ट्राची घटक मानलीं जातात. आज ८० टक्के लोक भारताच्या सात लाख खेडयांत आहेत. भारतीय लोकसत्ताकांतील मतदारांची संख्या अठरा एकोणीस कोटी-पर्यंत गेली आहे. यांतील बहुसंख्य मतदार खेडयांतील आहेत. हीं खेडीं शक्य तितकीं लवकर सुधारावीं, स्वयंपूर्ण व्हावीं, खेडयांत राहणाऱ्या भारतीय नागरिकांना साक्षर व सुशिक्षित करावें असे प्रयत्न सरकारकडून अनेकविध होत आहेत. कारण नागरिक साक्षर व सुशिक्षित असल्याशिवाय, लोकशाही कारभार सुरळित व सुव्यवस्थित

होणें अशक्य आहे. खेड्यांतील जनतेचें आरोग्य सुधारावें, त्यांना पाणीपुरवठा योग्य प्रकारें व्हावा, औषधोपचाराची मदत व्हावी, धान्यकोठ्या निघाव्या, शाळा काढाव्या, सहकारी संस्था काढाव्या अशा प्रकारचे सरकार प्रयत्न करीत आहे. हे प्रयत्न सरकार खेड्यांत त्या त्या ठिकाणच्या खेडुतांच्या मदतीने व सहकार्याने करूं पहात आहे. पण त्या बाबतींत आपलीं खेडीं अत्यंत मागासलेलीं दिसून येतात. जनतेचें संघटित व समंजस सहकार्य मिळाल्याशिवाय या साऱ्या सरकारी योजना यशस्वी होणें कठीण.

## खेडीं सुधारण्याचे प्रयत्न

खेडुतांच्या शारीरिक गरजा भागवितांना त्यांच्या मानसिक गरजांकडेही सरकार लक्ष पुरवीत आहे. त्यांचें जीवन सुखमय होण्याकडे लक्ष पुरवितांना त्यांच्या बौद्धिक जीवनाकडेही सरकार लक्ष पुरवितें. हे सारेच प्रयत्न मंदगतीने चाललेले दिसतात, पण ते होत आहेत हें निश्चित. लहान लहान खेड्यांतून व्हालंटरी शाळा काढण्यास सरकार सक्रिय सहाय्य व उत्तेजन देत आहे. शिक्षणाचें एक महत्त्वाचें, उपयुक्त व प्रभावी साधन म्हणून खेड्यांतून वाचनालयें निघावींत यासाठी मुंबई संस्थानांसारखीं संस्थानें सरकारी योजना आखून ती अमलांत आणीत आहेत. मुंबई संस्थानांत आज खेड्यांतील वाचनालयांना आरंभीं ५० रुपये व पुढे दरसाल १८ रुपयांपर्यंत वार्षिक मदत देण्यांत येत असते. पुढे योग्य वेळीं ती वाढण्याची शक्यता आहे. सरकारी ग्रंथालय विस्तारयोजना, जी आज मोठमोठ्या शहरांतून सुरू आहे, तिची परिपूर्णता ती योजना खेड्यांतून पोचण्यानेच होणार आहे. मुंबई सरकारची ही योजना इतर प्रांतीय सरकारें लवकरच सुरू करण्याची शक्यता वाटत आहे.

## खेड्यांतील वाचनालयांचें स्वरूप

आज खेड्यांत जीं वाचनालयें चालू आहेत त्यांची आवश्यकता व उपयुक्तता खेड्यांतील जनतेला अद्याप समजलेली नाही असें म्हणणें भाग आहे! वाचनालयें निघतात, पण तीं व्यवस्थितपणें चालविलीं जात नाहीत! इतकेंच नव्हे तर कांही दिवसांनी तीं बंदही पडतात! पण या परिस्थितीमुळे निराश होण्याचें कारण नाही. ही उदासीनता व उपेक्षा नाहीशी करण्यासाठी जोराचे प्रयत्न व्हावयास पाहिजेत. जिल्हा वाचनालयसंघ व तालुका वाचनालयसंघ स्थापन होऊन त्यांनी सरकारच्या व जनतेच्या सहकार्यानें हें कार्य केलें पाहिजे.

## वाचनालयांचीं जीवनकार्यें

खेड्यांतील वाचनालयांचें कार्य शहरांतील वाचनालयांपेक्षा थोडें निराळें राहील. खेड्यांतील वाचनालयांची व्यवस्था व रचना करणारांनी ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. वाचनालयांना साधारण तीन प्रकारचें कार्य करावयाचें असतें : (१) **निरक्षर जनतेला साक्षर बनविणें (२) साक्षर जनतेला सुशिक्षित व माहितगार बनविणें (३) सुशिक्षित समाजाला संस्कारी व कार्यक्षम बनविणें.** यांपैकी खेडयांतील वाचनालयांना पहिलीं दोन कार्यें प्रामुख्याने करावयास हवींत.

आज लहान लहान खेड्यांतून सुद्धा व्हॉलंटरी शाळा निघत आहेत, प्रौढांचे शिक्षणवर्ग निघत आहेत. त्यांत शिक्षण घेणारे लहान व प्रौढ विद्यार्थी शिक्षण पुरें झाल्यावर आपल्या नित्याच्या व्यवसायांत मग्न होतात व त्यांनी मिळवलेली साक्षरता हळूहळू ते विसरूं लागतात. इतक्या खर्चानें व श्रमाने साक्षर केलेले लोक जर पुन्हा निरक्षर झाले तर तें केवढें नुकसान आहे! अशांचें शिक्षण निदान कायम ठेवणें व शक्य तर वाढविणें हें कार्य खेड्यांतील वाचनालयेंच

करूं शकतील. **पूर्वी प्रत्येक खेडेगावांत देऊळ असे, तसें आज व्यवस्थित चाललेलें वाचनालय असलें पाहिजे.**

आपणास ज्ञान प्राप्त व्हावें, जगांत काय चाललें आहे तें कळावें अशी खेडेगावांतील रहिवाशांना देखील इच्छा असते. ती आपण पद्धतशीरपणें तृप्त केली पाहिजे. नवीन माहिती मिळविण्याची ग्रामीण जनतेला किती उत्सुकता असते याचें ताजें उदाहरण नमूद करण्यासारखें आहे. परवा एका खेडेगावांत नुकतेंच एक छोटेसें वाचनालय उघडण्यांत आलें. उद्घाटनाच्या दिवशीं तेथील लोक बहुसंख्येने उपस्थित होते. वाचनालयासाठी आपणहि पैसा खर्च करावा असें त्यांस वाटत होतें. महाराष्ट्राचे प्रतिथयश राजकवि यशवंत यांचें स्वागत वाचनालयांत झालें. एक समारंभ झाला. साऱ्यांनीच कांही यशवंतांचें काव्य वाचलें होतें असे नाही. पण ग्रामीण जोवनावर काव्य लिहिणारा कवि त्यांना ऐकून माहीत होता. त्या कवीच्या दर्शनाला सारे लोक आपलें काम सोडून गोळा झाले. त्यांनी सांगितलेली वाचनालयाच्या उपयुक्ततेची महती त्यांना पटली. त्यांचे चार शब्द खेडुतांनी मोठ्या आनंदाने व आदराने ऐकले. मोठमोठे लोक आपल्या गावीं यावे अशी ग्रामीण जनतेची नेहमी इच्छा असते. वाचनालयें हेंहि काम करूं शकतील. आज सरकार-कडून या वाचनालयाच्या इमारतीसाठी लाकडें मोफत मिळालीं असून गावकरी लोकरच लहानशी इमारत बांधण्याच्या प्रयत्नांत आहेत. गावकऱ्यांनी या कामीं दाखविलेला उत्साह कौतुकास्पद आहे.

जुन्या काळांत हरदास, प्रवचनकार वगैरे मंडळी खेड्यांतून ज्ञानप्रसाराचें कार्य करीत असत. पण तें ज्ञान दुसऱ्याने भरवावें तसें होत असे. शिक्षण मिळवून मग आपण स्वतः ज्ञान मिळवावें, वाढवावें अशी इच्छा तेथील जनतेंत उत्पन्न होण्याचें कार्य आज

वाचनालयांना करावयाचें आहे. खेड्यांतील वाचनालयांतील पुस्तकांची निवड करतांना या गोष्टीकडे लक्ष द्यावयास पाहिजे. अक्षर-ओळख होणें व ती झाल्यावर ज्ञान हळू हळू वाढवितां येईल असा विश्वास खेडुतांमध्ये निर्माण करतील अशीं पुस्तकें त्या वाचनालयांत ठेवणें आवश्यक आहे. हें काम योग्य मार्गदर्शकावाचून होणार नाही. एकादें दैनिक, जिल्हापत्रें, निरनिराळया धंद्यांवरील उपयुक्त अशीं पुस्तकें यांचा भरणा सुरुवातीला खेड्यांतील वाचनालयांत असला पाहिजे. हल्ली बालवाङ्मय मराठींत बरेंच निर्माण होत आहे. खेड्यांतील वाचनालयांनाहि तें आज उपयुक्त होणार आहे. वाचनाभिरुची वाढत जाईल तसतशी इतर पुस्तकें तेथे आणतां येतील. आज सरकार दारूबंदी, अन्नपरिस्थिति सुधारणें, अधिक धान्य पिकविणें, वृक्षारोपणाची महती, सहकारी चळवळीची उपयुक्तता, कंपोस्ट खत, ग्रामोद्योग असल्या खेडुतांच्या जीवनास उपयुक्त विषयांवर लहान लहान पुस्तिका, पत्रकें, पोस्टर्स प्रसिद्ध करीत आहे. हें सारें खेड्यांतील वाचनालयांत गेल्याने तेथील लोकांपर्यंत पोचेल व त्याचा खरा उपयोग ज्यांना व्हावा असें सरकारला वाटतें त्यांना तो होईल. खेड्यांतील वाचनालयांचा हा एक मोठा फायदा होणार आहे.

खेड्यांतील वाचनालयांत ठेवतां येतील व ग्रामीण जनतेला उपयोगी होतील अशीं धंदेविषयक पुस्तकें सरकारने मुद्दाम तयार करविलीं पाहिजेत. खेड्यांतील बहुसंख्य जनता आज निरक्षर आहे, तेव्हा सुरुवातीला जनतेला वृत्तपत्रें वा पुस्तकें वाचून दाखविण्याची सोय केली पाहिजे. जेथे प्रौढशिक्षण वर्ग वा व्हॉलंटरी शाळा असतील तेथील शिक्षकास थोडासा आर्थिक मोबदला दिल्यास तो तें काम हौसेने करील. असल्या श्रावकवर्गाचें महत्त्व माननीय काकासाहेब कालेलकर यांनी उत्तम प्रकारें पटवून दिलें आहे. प्रत्येक खेड्यांत

वाचनालय स्थापन करणें कदाचित् आज जमणार नाही. त्यासाठी जिल्हा व तालुका ग्रंथालयांकडून फिरत्या वाचनालयाची योजना पेट्या ठेऊन करावयास हरकत नाही.

## वाचनालयाकडून संस्कृतिविकासाकडे

वाचनालयें जिवंत सांकृतिक केंद्रे बनलीं पाहिजेत, असें नामदार खेरसाहेब एकदा एका भाषणांत म्हणाले. नागरी संस्कृतीप्रमाणेच खेड्याचीहि एक संकृति आहे. नागरी संस्कृतीचीं केंद्रे स्थापन करतांनाच खेडुत संस्कृतीचीं केंद्रेंहि स्थापन व्हावयास पाहिजेत. या दोन्ही संस्कृति एकाच श्रेष्ठ भारतीय संकृतीचीं अंगें आहेत. तीं एकमेकांना पूरक व परस्परावलंबी आहेत. आज खेडुत संकृति खालावल्यासारखी वाटत आहे. ती पूर्वपदावर आणण्यास खेड्यांतील वाचनालयांची फार मोठी मदत होणार आहे. मात्र तसे प्रयत्न तातडीने व धडाडीने झाले पाहिजेत.

## ग्रामवाचनालयाकरितां खास पुस्तकें हवीं

आरंभीं खेड्यांतील वाचनालयांना बालवाङ्मयाचा उपयोग झाला तरी पुढे खेड्यांतील रहिवाशांना आवश्यक अशीं पुस्तकें तयार व्हावयास पाहिजेत. तशीं तीं हळू हळू होत आहेत व आणखी होतीलहि. गरज लागली की आवश्यक गोष्टी निर्माण होतातच.

खेड्यांतील वाचनालयांना योग्य मार्गदर्शन व्हावयास हवें. आज त्या दृष्टीने बऱ्याच अडचणी येतात. दुर्दैवाने असा अनुभव येतो की निदान कांही ठिकाणीं तरी खेड्यांतील वाचनालयांचा प्रसार करतांना तो करणारांना सरकारी शिक्षण खात्यांतील वा इतर खात्यांतील अधिकाऱ्यांचें लाभावें तसें सहकार्य लाभत नाही. पण ही अनास्था कालप्रवाहाबरोबर टिकणार नाही. सरकारी लोण खेड्यापाड्यापर्यंत

पोचल्यावर सारें सुरळीत होईल. कार्य करणाराला कटकटी केव्हाच दूर करतां येतील !

## वाचनालयांची जबाबदारी व भवितव्य

भारताला स्वातंत्र्य मिळालें आहे. देश आज क्रांतिकाळांत आहे. जगांतील इतर देशांप्रमाणेच नव्हे, तर त्याहून श्रेष्ठ असें आपलें राष्ट्र सर्व दृष्टीने व्हावें असे आपले प्रयत्न चालले आहेत. सर्वोदयासारखी सुंदर योजना यशस्वी होण्यास खेडयांतील वाचनालयांची फार मोठी मदत होणार आहे. साऱ्या देशाला स्वोन्नतीची जाणीव करून देणारें समाजशिक्षणाचें खेडयांतील वाचनालयासारखें उपयुक्त, प्रभावशाली व सर्वव्यापी साधन दुसरें मिळणार नाही. यापुढे देवालयांची जागा ग्रंथालयें—वाचनालयें घेणार आहेत. ग्रंथालय हें फिरतें मंदिर बनूं शकतें. ग्रंथालयांतील "देव" झोपडींत नेता येतो, पण त्यासाठी जनतेंत वाचण्याची गोडी निर्माण करणें हें महत्त्वाचें कार्य आहे. ग्रंथवाचनाची गोडी लागल्यावर तें ठेवण्याचीं साधनें —मंदिरें, इमारती—आपोआप तयार होतील. त्यांचा आताच फारसा विचार करण्याचें कारण नाही. एकाद्या गोष्टीची उपयुक्तता व महती पटली की ती जपून ठेवण्याचा प्रयत्न मानव नेहमीच करतो. खेडयांतील जनता त्याला अपवाद नाही ! देवाचें सामर्थ्य कळणें हा महत्त्वाचा भाग आहे. ज्ञानाचे झरेझिरपे खेडयापर्यंत पोचवून त्याची गोडी लावण्याचें कार्य आज व्हावयास पाहिजे आहे. सरकार, वाचनालय संघ, निरनिराळया शिक्षण संस्था, थोरांची दातृत्त्वशक्ति आणि समाजसेवक यांच्या साहाय्याने आणि संघटनेने तें कार्य सहज साध्य होणार आहे. सर्वांनी मनावर घेतल्यावर अशक्य काय आहे ! तो सुदिन लवकरच उगवो ही इच्छा !

---

# महाविद्यालयीन ग्रंथालयांचें आजचें स्वरूप

एक विद्यार्थिनी

## जुन्या ग्रंथालयांचें निराशाजनक चित्र

मी शाळेंत असतांना ग्रंथालय हा शिक्षणसंस्थेतील एक प्रमुख भाग असतो हें आम्हाला कधीच समजलें नाही. आमच्या शाळेचें ग्रंथालय पांचवीच्या एका वर्गांत आडोसा घालून केलें होतें. साहजिकच ग्रंथालयाची जागा अतिशय लहान होती. त्यांत ओबडधोबड आणि पणजोबांच्या कारकीर्दीतलीं तीनचार लहान कपाटें पुस्तकांकरिता होतीं. पुस्तकें बहुतेक जुनीं झालेलीं व कांही फाटलेलीं दिसत. वेताळपंचविशीसारख्या हरदासी कथा, गुलबकावलीसारख्या सुरस गोष्टी, 'पण लक्षांत कोण घेतो', 'दौलत' इत्यादि प्रसिद्ध कांदबऱ्या व त्याचप्रमाणे लो. टिळक, महात्मा गांधी, थॉमस एडिसन यांसारख्या थोरामोठ्या व्यक्तींचीं चरित्रें इत्यादि जीर्ण पुस्तकांचा एकूण संग्रहात समावेश असे.

शाळेंतील चालकांनी ग्रंथालयाला विशेष महत्त्वाचें स्थान दिलेलें नव्हतें. ह्याचें कारण असेंही असू शकेल की त्यांच्या बालपणीं ग्रंथालय हा स्वतंत्र भाग नसेल. आमच्या शाळेंत कवायतीच्या बाईच ग्रंथालयाची व्यवस्था पहात असत. आपल्या सांगण्याच्या बाहेर जाणार नाहीत अशा दोन मुली आपलें कौतुक करण्याकरिता त्यांनी आपल्या हाताखाली कामास घेतल्या होत्या. ग्रंथालयाची कांही तरी विशेष व्यवस्था असते याची त्यांना कल्पनाही नसावी.

ग्रंथालय लहान असल्याने तेथल्या तेथे बसून वाचण्याची सोय नव्हती. आणि त्या नमुनेदार (!) संग्रहांतून मुद्दाम घरीं घेऊन जाऊन वाचन करावें अशीं पुस्तकें निवडून काढणेंही अशक्य होतें.

## मांडणीचा व व्यवस्थेचा विचित्र नमुना

आम्हाला कवि यशवंतांची पुस्तकें उचलावीशीं वाटायचीं तर त्याऐवजी यशवंतराव खऱ्यांच्या दोन फाटक्या प्रतीच दिसावयाच्या. आम्हाला 'शिंपले आणि मोती' देणारीं 'गुजगोष्टी' सांगणारी सुटसुटीत पुस्तकें हवीशीं वाटायचीं. तर तेथे निबंधमालेसारखीं दणदणीत पुस्तकेंच आढळायची. आम्ही रामतनयांची 'मोहित्यांची मंजुळा' शोधायला जावें तर 'पण लक्षांत कोण घेतो,' 'माझें' रामायणांसारखे लठ्ठ ग्रंथराज हातांत यावयाचे. अलिकडच्या काळांत प्रसिद्ध झालेलीं ज्योत्स्ना, कौमिदी हीं पुस्तकें शोधावयास जावें तर तीं कधीच मिळावयाची नाहीत. किंवा मिळालींच तर ती 'सिद्धांत कौमुदिच.' एकूण कोठून तरी उचलून आणून भरती केलेले ग्रंथ ते. त्यांची मुद्दाम निवड झालेली नव्हती. कपाटें भरून ग्रंथालय लागलेलें दिसावें हाच महत्त्वाचा हेतु होता.

मॅट्रीकच्या वर्गांत गेल्यावर आम्हीं स्वतःला जरा मोठ्या झालों असें समजून कॉलेजमधील मुलींशीं गप्पा मारूं लागलों. कधी कधी त्यांचेबरोबर संध्याकाळच्या वेळेला कॉलेजवर फिरावयालाही जात असूं. असेच एके दिवशीं आम्ही गेलों असतां माझ्या मैत्रिणीने तिच्या कॉलेजचें ग्रंथालय असें म्हणून तिने एका स्वतंत्र व मोठ्या इमारतीकडे बोट करून सांगितलें. शाळेंतील ग्रंथालयाविषयीं नेहमीच उदासीन असणाऱ्या मला ग्रंथालय हा शिक्षणांतील इतका महत्त्वाचा भाग असूं शकतो ह्याचें पहिल्यांदा आश्चर्य वाटलें. आणि

ग्रंथालयाचा कॉलेजीय मैत्रीणी बराच उपयोग करून घेतात हें ऐक-ल्यावर तर त्याविषयीं मला अधिक कुतूहल उत्पन्न झालें.

## ग्रंथालयाचें महत्त्व पटलें

घर, शाळा व समाज हीं ज्याप्रमाणे ज्ञानसंवर्धनाचीं स्थानें आहेत, त्याचप्रमाणे ग्रंथालय हेंही एक ज्ञान मिळविण्याचें उत्कृष्ट स्थान आहे हें मला नव्यानेच समजलें. ग्रंथालयाची इमारत ज्या-प्रमाणे मोठी त्याचप्रमाणे तेथील व्यवस्था सुद्धा नमुनेदार व आदर्श असावी अशी माझी कल्पना होती. पण मनुष्य नेहमीच कल्पना करीत असतो. आणि सत्य सृष्टीचें ज्ञान झालें कीं त्या हवेंत विरून जातात. अगदी ह्याचप्रमाणे माझें झालें.

## महाविद्यालयीन ग्रंथालयाचें दर्शन

मी मॅट्रीक झालें व कॉलेजमध्ये जाऊं लागलें. ग्रंथालयांतील व्यवस्था काय आहे हें पाहण्याची मला अतिशय उत्कंठा लागली होती. मध्यंतरीच्या सुट्टींत मी ग्रंथालयावर कांही वाचनही केलें होतें. ग्रंथालयांतील कामकाज सुरू झाल्यावर मी ग्रंथालयांत जाऊं लागलें. (अर्थात विद्यार्थ्यांचे पाय आपोआप वळतील अशाच रोजच्या जाण्यायेण्याच्या वाटेवर ग्रंथालय होतें.)

ग्रंथालयांतील वाचन-विभाग दुसऱ्या मजल्यावर होता. बसण्याची सोय चांगली होती. खिडक्या फार मोठ्या नसल्या तरी उजेड ठीक होता. परंतु वारा फार त्रास देत असे व धूळ येत असे. रस्त्यावरील गडबडीपासून कॉलेजचें ग्रंथालय जितकें दूर असावयास पाहिजे तितकें तें नव्हतें. रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्या मोटार-गाड्यांचे कर्णे सारखे वाजलेले ऐकूं येत. फटफट्यांच्या वेगवर्धकांचा

रों रों ध्वनीही कानांत घुसे. व त्यांतच भर म्हणजे जवळच्या रेस्टॉरन्टमध्ये लावलेलीं रेडिओवरील गाणीं वाचकांना गुंगवून टाकीत. बाहेरील गोंगाटाचा त्रास होऊं नये म्हणून हल्ली ध्वनिरोधक साधनें वापरतात. परंतु तीं येथे मुळीच वापरलेलीं नव्हतीं. त्यामुळे जितक्या आवडीने विद्यार्थी आंत प्रवेश करी, तितकीच घाई तो बाहेर पडण्याकरिताही करी.

आपली वाङ्मयीन भूक शमविण्याकरिता विद्यार्थी ग्रंथालयाकडे वळतो. खरी ज्ञानलालसा असलेले विद्यार्थी वरील परिस्थितीवर मात करून आपलें मन आपल्या अभ्यासाच्या विषयावर एकाग्र करूं शकतात. परंतु केव्हा? त्यांना हवें असलेलें पुस्तक मिळालें तरच! ग्रंथपाल अथवा इतर सेवक हे तितक्याच तत्परतेने व आपुलकीने विद्यार्थ्यांना हवीं असलेलीं पुस्तकें काढून देतील तेव्हा! परंतु येथील स्थिति त्याच्या उलटच दिसली.

## याला जबाबदार कोण?

विद्यार्थी ग्रंथालयांत जातात त्यावेळेस ग्रंथपाल कोणत्यातरी प्राध्यापकांनी दिलेल्या कामांत गुंतलेले असतात. चालू काम हातावेगळें होई तों विद्यार्थ्यांकडे ते लक्ष देऊं शकत नाहीत. तोंपर्यंत विद्यार्थ्यांना ताटकळून रहावें लागतें. एखाद्या विद्यार्थ्याने तशीच गर्दी केली तर त्याला तिरसटपणें उत्तर मिळते. खरें म्हणजे ग्रंथपालाने आपल्या गोड वाणीने व सौजन्यपूर्ण वागणुकीने वाचकांवर छाप पाडली पाहिजे. परंतु वरील उलट्या प्रकाराने कांही विद्यार्थी कंटाळून ग्रंथालयांत येईनासेच होतात.

विद्यार्थ्यांची ज्ञानतृषा त्यांना हवीं असलेलीं पुस्तकें देऊन भागविणें हें आपलें कर्तव्य आहे हें ग्रंथपाल विसरून जातात. व त्यांनी मागितलेलें पुस्तक कमींतकमी वेळांत झटकन् कधीच

शोधून देत नाहीत. पुस्तकांचें वर्गीकरण नीट केलेलें नसल्याने पुस्तकें चटकन् सापडत नाहीत, व त्यामुळे तीं शोधण्याचा सेवक आळस करतात. अशा स्थितींत ठराविक विद्यार्थी ठराविक विषयावरील पुस्तकें वर्षांतील ठराविक वेळीं मागतात हें मुद्दाम हौसेने लक्षांत ठेवून त्या विषयांवरचीं नवीन पुस्तकें मुद्दाम खरेदी करून त्या त्या विद्यार्थ्यांसमोर लगोलग ठेवणें किंवा त्यांना सुचविणें हें दूरच राहिलें.

आता ग्रंथालयाची इमारत, तेथील बाहेरील व आंतील वातावरण, त्याचप्रमाणे ग्रंथापालाची वागणूक, वाचक ज्या पुस्तकाकरिता येतात, त्यांची काय स्थिति असते हें पाहूं.

जरूर तेवढ्या सर्व पुस्तकांचा संग्रह ग्रंथालयांत नसतो. योग्य व नेमका ग्रंथसंग्रह करणें हें फार अवघड काम असतें. ग्रंथालयाची आर्थिक परिस्थिति व पुस्तकांची दुर्मिळता ह्यांमुळे ग्रंथालय सर्वसंग्रही होतेंच असें नाही. परंतु असतील त्या पुस्तकांची तरी नीट व्यवस्था ठेवून, सर्वांना पुस्तकें मिळतील अशी सोय करणें हें महत्त्वाचें काम असतें.

## पुस्तकांचे विशिष्ट हक्कदार व अनास्था !

कांही पुस्तकें संदर्भाकरिता वाचा म्हणून सांगतात, तींच कांही प्राध्यापकांच्या घरीं ग्रंथालयांतून नेलेलीं असतात. ते वेळेवर आणून देत नाहीत. ग्रंथपालांना वारंवार त्यांचेजवळ 'पुस्तकें परत करा' असें सांगण्यास संकोच वाटतो. त्यामुळे बरींच पुस्तकें अनेक दिवस कांही प्राध्यापकांच्या घरीं पडून राहतात. आधीच पुस्तकांची दुर्मिळता व त्यांत असलेल्या पुस्तकांचा हा परदार वास ! त्यामुळे कांही गरीब विद्यार्थ्याला अशा पुस्तकांचें दर्शन सहा सहा महिन्यांतसुद्धा घडत नाही.

कांही पुस्तकें वेळेवर परत येत नाहीत. कांही पुस्तकें अजिबात हरवून जातात. अनेक खरीदलींच जात नाहीत. कॉलेजमधील पुस्तकें

स्वतःची मालमत्ता नसून सर्व विद्यार्थ्यांची आहे हें विसरून जाणारे विद्यार्थी पुस्तकांतील पानें फाडून घेतात. ग्रंथपालांच्या आळशीपणामुळे अथवा दुसऱ्या कांही कारणामुळे कांही पुस्तकांवर कायमची धूळ साचत असते.

ग्रंथालयांतील पुस्तकें, त्यांची अद्ययावत व्यवस्था व ती व्यवस्था ठेवणारा तत्पर व चतुरस्त्र ग्रंथपाल ह्यांचा त्रिवेणी संगम जर उत्तम झाला असेल तर आवड नसलेल्या वाचकांना सुद्धा गोडी उत्पन्न होते. परंतु वर उल्लेखिलेल्या सारख्या ग्रंथालयांत झालेल्या त्रिवेणी संग्रमामुळे मात्र आम्हां वाचकांना असलेली जिज्ञासाहि नाहीशी होणार नाहींना याबद्द सतत भीतीच वाटते.

## कांही आशादायक व आदर्श ग्रंथालयें

परंतु कांही कॉलेजीय ग्रंथालयें सुधारण्याच्या मार्गावर आहेत असें दिसतें. त्यांतच पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमधील ग्रंथालय हें एक होय. तें मी उन्हाळ्याच्या सुट्टींत तेथे गेलें असतांना प्रत्यक्ष पाहिलें. कॉलेजला सुट्टी असल्यामुळे तेथील ग्रंथालयीन सर्वच व्यवहार मला पाहतां आला नाही. परंतु तेथे ठेवलेल्या व्यवस्थेवरून ग्रंथालय नमुनेदार असावें असें वाटतें. ग्रंथालयांत शिरतांना सामान बाहेर ठेवण्याची व त्याचप्रमाणे आंत बाहेर जाण्याचे मार्ग वेगळे अशी सोय होती. 'संकोच न करितां तुम्हास असलेली शंका ग्रंथापालांस विचारा', 'शांतता राखा', 'हळू बोला', ह्या व अशा अनेक अर्थांच्या सूचक पाट्या तेथे लावल्या होत्या. पुस्तकांचें वर्गीकरण अद्ययावत पद्धतीने केलेलें होतें. पुस्तकांचा संग्रह बराच मोठा असल्याने एक प्रकारचें समाधान वाटलें. नवीन आलेल्या पुस्तकांची यादी नोटीस बोर्डावर लावलेली होती. एका मोठ्या टेबलावर अनेक विषयांवरचीं व अनेक देशांतील मासिकें आकर्षक रीतीने मांडलेलीं होतीं. त्यामुळे वाचकांना

सहजच तेथे डोकावून पाहण्याची जिज्ञासा उत्पन्न व्हावी. असें हें आकर्षक वातावरण व रचना पाहून मनास समाधान वाटलें.

तसेंच वरील मजल्यावर मुलांस वाचनाकरिता सोय केलेली आहे. पुस्तकांच्या याद्या, बसण्यास सुखावह खुर्च्या, पुस्तकें ठेवण्यास जागा, दिव्याची सोय, पिण्याचें पाणी मिळण्याची व्यवस्था, इत्यादि सर्व आवश्यक गोष्टींचा विचार करून त्यांची उत्तम सोय केली आहे. अशींच सुसज्ज आणखी कांही कॉलेजांतील ग्रंथालयें आहेत असें कळतें. परंतु आधी वर्णन केलेल्या आमच्या ग्रंथालयाची व्यवस्था मात्र निराशाजनक आहे. प्रसिद्ध ग्रंथपाल रंगनाथन् यांनी ग्रंथालयाचीं कांही सूत्रें बसविलीं आहेत. उदा. 'पुस्तकें उपयोगासाठी आहेत' 'प्रत्येक पुस्तकास वाचक आहे', 'प्रत्येक वाचकांस पुस्तक आहे' इत्यादि. कॉलेजमधील ग्रंथालयांत सर्व सुशिक्षितांचा कारभार असून सुद्धा इतकी अनास्था आहे की, ह्यापैकी कोणत्याच सूत्राचें अवलंबन कसोशीने झालेलें दिसत नाही. आणि त्या सूत्रांकडे ज्या दिवशीं लक्ष जाईल तो सुदिन !

## सरकारला एक सूचना

आजच्या महाविद्यालयीन ग्रंथालयांचें जुनाट स्वरूप आणि नवीन स्वरूप कसें आहे हें वरील विवेचनावरून समजलें असेलच ! निदान कॉलेजपुरतें तरी देशाच्या राष्ट्रीय सरकारने असे कायदेच केले पाहिजेत की, '**ग्रंथालय हें सर्व सुखसोयींनी, पुस्तकांनी व ट्रेंड ग्रंथपालांनी समृद्ध असलेंच पाहिजे व तें नसेल तर त्या कॉलेजला सरकारी मान्यता देऊं नये.** आणि हें असें झाल्याशिवाय महाविद्यालयांतील ग्रंथालय '**आदर्श व पवित्र ग्रंथालय होणार नाही.**'

# शालेय ग्रंथालयांची आजची स्थिति

नारायण बाळकृष्ण मराठे व पुरुषोत्तम गणेश ब्रह्मे

१ परिचय—जन्म १९२५ साखळी (गोवा). हे बी. ए. चे विद्यार्थी असून काव्यतीर्थ व साहित्य विशारद आहेत. यांनी पुणे ग्रंथपालनवर्गाचें प्रशस्तिपत्र मिळविलें आहे. सध्या हे पुण्याच्या डेक्कन जिमखाना विद्यालय ग्रंथालयांत ग्रंथपाल आहेत.

२ परिचय—जन्म १९२५ कामशेत (पुणे). हे बी. ए., बी. टी. असून राष्ट्रभाषारत्न, विशारद, व पुण्याच्या सरस्वति मंदिर संस्थेच्या रात्रीच्या शाळेचे आजीव सदस्य व उपप्रमुख असून पुणे ग्रंथपालनवर्गाचे अध्यापक आहेत.

पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयांत मुक्तद्वार प्रादेशिक ग्रंथालयांत मुक्त हस्ताने मिळालेलीं वाचनसाधनें हातीं घेऊन एका रांगेने वाचनांत रंगून गेलेले बालवाचक अनेकांनी पाहिले आहेत. ज्ञानशोधाची आणि संग्रहाची आवड व जिज्ञासा या मुलांमध्ये ज्या प्रमाणांत उत्पन्न झालेली आहे तितक्याच प्रमाणांत प्रत्येक शाळेंतील मुलांमध्ये उत्पन्न होणें अतिशय आवश्यक आहे. शाळेच्या विविध अंगोपांगांपैकी ग्रंथालय हें विशेष महत्वाचें अंग आहे.

## शाळेंतील उपेक्षित विभाग

असें असूनही आज त्याची उपेक्षा होत आहे. या उपेक्षित अंगाकडे शिक्षणतज्ज्ञांचें अथवा शाळाचालकांचें लक्ष अद्याप वेधलें

गेलें नाही. विद्यार्थ्यांच्या जीवनाच्या सर्वांगीण विकासासाठी ग्रंथालय किती उपयुक्त आहे याची नीटशी कल्पना आजच्या बहुसंख्य शाळाचालकांना नाही, ही दुखाची गोष्ट होय !

## निराशाजनक परिस्थिति व वातावरण

आज कोणत्याही सामान्य शाळेच्या ग्रंथालयास एकाद्या ग्रंथप्रेमी मनुष्याने भेट दिल्यास तेथील एकंदर संग्रह व व्यवस्था पाहून त्याची निराशा झाल्याशिवाय राहणार नाही. ग्रंथालय–शास्त्राच्या आजच्या विकासावस्थेंत शालेय ग्रंथालय तत्संबंधी शास्त्रापासून इतकें दूर असावें हें केवढें आश्चर्य ! सामान्यपणें शाळेंतील ग्रंथालयांत उपयुक्त पुस्तकांपेक्षा निरुपयोगी अशा लठ्ठ पुस्तकांचीच गर्दी जास्त. बहुधा हीं पुस्तकें देणगीने आलेलीं असायचीं ! जीं कांही पुस्तकें असतील तीं उपयोगाच्या वेळीं बरोबर सापडावींत या दृष्टीने योजनापूर्वक ठेवण्याच्या प्रयत्नाचा साधारणपणें अभाव दिसतो. ग्रंथ हे वाचकांसाठी व उपयोगासाठी आहेत या प्राथमिक सूत्राचेंही ज्ञान तथाकथित शालेय ग्रंथपालाला नसतें. पुस्तकें ग्रंथालयांत येतील तशीं नोंदवून कपाटांत ठेवून दिलीं की, ग्रंथपालाचें काम संपलें अशी एकूण आज परिस्थिति आहे.

अशा परिस्थितींत पुस्तकांचें विषयवार वर्गीकरण, त्यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या याद्या व विद्यार्थी वाचकाला पाहिजे तें तत्परतेने पुरविण्यासाठी लागणारी साधन-सामुग्री शाळेच्या ग्रंथालयांत कशी शक्य आहे? शाळेच्या वार्षिक तपासणीच्या अहवालांत पुस्तकखातीं खर्च करण्यांत येणारी रक्कम नोंदवावयाची असते, केवळ यासाठी कांही पुस्तकें खरीदण्यांत येतात. विद्यार्थ्यांसाठी ग्रंथालय आहे व त्यांना उपयुक्त अशींच पुस्तकें बहुसंख्येने खरीदलीं पाहिजेत,

नुसतें खरेदून चालायचें नाही तर तीं पुस्तकें अखंडपणें विद्यार्थ्यांना वाचनासाठी देण्याची व्यवस्था केली पाहिजे हा विचारही फारसा कोणाच्या मनांत येत नाही. यामुळे बोटावर मोजण्याइतक्या शिक्षकांच्या उपयोगाचीं पुस्तकें घेण्यांत येतात. व त्यांचाही कितपत उपयोग त्यांच्याकडून केला जातो याबाबत शंकाच आहे.

ग्रंथालयासाठी स्वतंत्र अशी ऐसपैस जागा नेहमीच दुर्लभ असते. अगदी संकुचित जागेंत थाटण्यांत आलेल्या व वरील प्रकारच्या पुस्तकांनी सज्ज असलेल्या ग्रंथालयाबाबत विद्यार्थ्यांना कितपत आकर्षण वाटावें ? जुनीं-पुराणीं जाडजूड पुस्तकें घेऊन वाचीत बसण्याइतकी ग्रंथांची आवड शालेय विद्यार्थ्यांत एकदम कोठून येणार ? वाचनाची आवड विद्यार्थ्यांत हळूहळू निर्माण करण्याचें काम शालेय ग्रंथालयाने करावयाचें असतें. पण या उलट एकंदरींत सर्वत्रच उपेक्षेमुळे शाळेचीं ग्रंथालयें आज असून नसल्यासारखीं आहेत.

## जाणीव नसलेले शिक्षक

वस्तुतः शाळा म्हणजे भावी जीवनांत लागणाऱ्या हरतऱ्हेच्या प्राथमिक व्यवहार-ज्ञानाची बालांना माहिती करून देण्याची जागा आहे. जीवनांतील धकाधकींत शिरल्यावर कुठेही न फसतां चातुर्याने आणि शहाणपणाने मार्ग कसा काढावयाचा याचा अभ्यास शाळेंत अनेक उदाहरणें वाचून व ऐकून करावयाचा असतो. शाळेंतील कांही शिक्षकांच्या तोंडून अभावितपणें असे बहुविध अतिउपयुक्त अनुभव विद्यार्थ्यांना ऐकावयास मिळतात. पण असे शिक्षक फारच थोडे. बहुतेक शिक्षक नेमलेल्या अभ्यासाच्या ठराविक टोपल्या टाकण्यापलीकडे कांहीच करीत नाहीत असा फार बोभाटा झालेला आहे व तो सत्यहि आहे. जीवनामध्ये लागणाऱ्या ज्ञानाची पूर्वतयारी

आपण या शाळेच्या चार भिंतींच्यामध्ये करीत असतो याची जाणीव करून देण्याचें काम वास्तविक पाहिलें असतां शिक्षकांचें आहे. परंतु तिकडे सरसहा दुर्लक्ष करण्यापलीकडे आजचा शिक्षक काय करतो ?

## ग्रंथालय हें शील व संस्कृतीचे गुरु असावे

शालेय ग्रंथालय हें या दृष्टीने पाहिल्यास प्रत्येक विद्यार्थ्याला सर्वांगीण सामान्यज्ञान उपलब्ध करून देणारें ग्रंथघर झालें पाहिजे. त्याची बौद्धिक भूक वाढविणें आणि ती पुरी करणें हीं कामें सर्वतः शालेय ग्रंथालयांनीच केलीं पाहिजेत. शालेय ग्रंथालय हें विद्यार्थ्यांच्या ज्ञानांत बहुमोल भर टाकण्यास समर्थ असें झालें पाहिजे. विद्यार्थ्यांना नसलेली बहुमोल माहिती पुरवून त्यांना वाचनप्रवण करण्याचें आद्यकर्तव्य शालेय ग्रंथालयानेच करायला पाहिजे. ग्रंथालयांत कोणतीं पुस्तकें यावींत अगर येऊं नयेत, याचा विचार तीं येण्याआधी झाला पाहिजे. प्रकाशक अगर मुख्याध्यापकाची तथाकथित मर्जी हीं पुस्तकें विकत घेत असतां आड येतां कामा नये.

## अपेक्षा पूर्ण कशा होतील

शाळेच्या वार्षिक अंदाजपत्रकांत ग्रंथालयाकरतां दर विद्यार्थ्यामागे एक रुपया आणि दर शिक्षकामागे किमान दहा रुपये या प्रमाणांत पैसे मंजूर करून घेतले पाहिजेत. **अर्थात तें काम शिक्षणखात्याच्या सम्मतीने चालकांनी करावयास पाहिजे** आणि या रकमेंतून बाल विद्यार्थी, मध्यम विद्यार्थी, प्रौढ विद्यार्थी आणि शिक्षक यांच्याकरितां व्यवहार व तारतम्याने पुस्तकें खरेदी करून तीं विद्यार्थी आणि शिक्षक वाचतात किंवा नाही इकडे ग्रंथपालाने लक्ष पुरविलें पाहिजे. वाचत नसतील तर त्या दृष्टीने त्यांना आकृष्ट करण्याचें कामहि

ग्रंथपालाचेंच आहे. त्याने त्या भावी वाचकांपुढे जाऊन ती माहिती दिली पाहिजे. महीधर महंमदाकडे जात नसेल तर महंमदाने त्याचेकडे जाणें क्रमप्राप्त आहे, इतकेंच नव्हे तर विद्यार्थ्यांसाठी खास वर्गवार असे पुस्तकांचे गट पाडून तीं पुस्तकें विद्यार्थ्यांनी सक्तीने वाचलींच पाहिजेत असे नियमहि असावेत व त्यावर परीक्षेंत स्वतंत्र गुणहि देण्यांत यावेत. त्याशिवाय प्रत्येक विद्यार्थ्यांस वाचनाची गोडी सहजासहजी लागणार नाही.

या सर्व अपेक्षा पुऱ्या करावयाच्या म्हणजे शालेय ग्रंथालयांतील ग्रंथपाल हा या दृष्टीने अपेक्षा पुऱ्या करील असाच, म्हणजेच तो ट्रेंड ग्रंथपाल पाहिजे. आणि तो जितका कार्यक्षम असेल त्यावर व चालकांची ग्रंथालयावर असणारी मोहबत यावरच शालेय ग्रंथालयांची उन्नति आणि प्रगति अवलंबून आहे.

---

## बोलके आकडे

### निरनिराळ्या देशांत एक हजार लोकसंख्येंत दैनिकें किती खपतात ?

| | | | |
|---|---|---|---|
| स्विझर्लंड | ६५५ | अमेरिका | ३५४ |
| ब्रिटन | ६०० | भारत | ६ |
| लक्झेंबर्ग | ४५५ | आयर्लंड | ४ |
| नार्वे | ४२१ | पाकिस्तान | २ |
| स्वीडन | ४१६ | अफगाणिस्थान | १ |

---

# शिशु-ग्रंथालय

शंकर नारायण बर्वे

**परिचय**—यांना ग्रंथालय विषयक कार्याची फारच आवड आहे. यांचें नुकतेंच 'शारदा-मंदिर' नांवाचें एक नाटक प्रसिद्ध झालें आहे. हे केसरी-मराठा ग्रंथालय पुणें इथे उपग्रंथपाल आहेत.

## थोरा इतकीच पोरांची महती

आजच्या ग्रंथालय चळवळीच्या जगांत प्रौढ ग्रंथालयें, महिला ग्रंथालयें, शालेय ग्रंथालयें, विद्यालयीन ग्रंथालयें व खेडयांतील ग्रंथालयें या बरोबरच शिशु ग्रंथालयांचीहि वाढ होणें अत्यंत आवश्यक आहे. परंतु प्रश्न असा पुढे येतो की आज भारतांत प्रौढांसाठी तरी अशीं किती ग्रंथालयें आहेत ? जिथे थोरांची ही स्थिति तेथे पोरांची काय अवस्था, याची कल्पनाच केलेली बरी आणि अशा वेळीं पाश्चिमात्य राष्ट्रांकडे दृष्टिक्षेप केल्यास 'वैभवशाली ताजमहालापुढे चिमकुली चंद्रमौळी' असें विसंवादी दृश्य दिसूं लागतें.

## पाश्चात्यांचें अनुकरणीय कार्य

पाश्चात्यांनी ग्रंथालयाचे बाबतींत केवढी आघाडी मारली आहे ! ग्रंथालय हें राष्ट्रोन्नतीचें एक अमोघ साधन आहे हें ओळखून बारीक गोष्टींचाहि सूक्ष्म विचार करून प्रत्येक बाब तंत्राचे कसोटीवर व शास्त्राचे साच्यांत घालून ही भूषणभूत संस्था त्यांनी चालविली आहे; व देशोत्कर्षाचें हें प्रमुखांग कसोशीने जोपासलें जात आहे. त्याप्रीत्यर्थ शासनसंस्था, नगरपालिका, धनिकवर्ग मुबलक द्रव्यसाह्य पुरवितात. त्यासाठी स्वतंत्र कायदे करून त्यांचें संवर्धन व संरक्षण केलें जातें. ग्रंथालय हें बलशाली राष्ट्राचें शक्तिकेंद्र, सामर्थ्यसंपन्न

**समाजाचें स्फूर्तिस्थान आहे.** याची जाणीव त्यांना असल्याने विविध शास्त्रीय ग्रंथालयें स्थापून तीं यशस्वितेने चालविलीं जात आहेत. त्यांतच शिशुग्रंथालयांची गणना होते. वयोमानानुसार शिशुग्रंथालयांची स्थापना करून तीं भरभराटींत अंगीकृत कार्य करीत आहेत. त्यांना आवश्यक अशा सर्व बाजूंचा विचार करून त्याची रचना होत असते. प्रेक्षणीय चित्रें, नकाशे ठोकळ्यांचे व यांत्रिक पद्धतीचे विविध खेळ, लोकोत्तर व्यक्तींचीं छायाचित्रें, रमणीय स्थळांचे देखावे, रेडिओ, मॅजिक लँटर्न, सिनेमा इ. आधुनिक साधनांनी तीं सुसज्ज ठेवलीं जातात. सभोंवार बागबगीचे, मोहक रंग, हवाप्रकाशांनी युक्त इमारत, सुलभतेने हातीं वस्तु येतील अशीं बेताचीं कपाटें, टेबलें, खुर्च्या, इ. सुखसोयींनी समृद्ध, व आकर्षक सजावटपूर्ण असतात. अद्भुत, ऐतिहासिक, काल्पनिक, धाडशी, विनोदी गोष्टींचीं, सचित्र रंगबेरंगी हावभावयुक्त गाण्याचीं, प्रवासवर्णनाचीं, सुबोध माहितीचीं, उद्बोधक विचारांचीं, मुलांच्या आवडीनिवडी, भावना, कागद, छपाई, बांधणी व माफक किंमती इ. चा साकल्याने विचार करून छापलेल्या पुस्तकांनी हीं कपाटें भरगच्च भरलेलीं असतात. सुविद्य, सहृदय, सदानंदी, मधुभाषी, मनमिळाऊ, खेळकरवृत्तीने व प्रेमाने वागणाऱ्या निष्णात ग्रंथपालाचे नेतृत्वाखाली चालणाऱ्या, गोष्टी, व्याख्यान, प्रदर्शनें इ. कार्यक्रमांची जोड देऊन चित्तरंजन व ज्ञानदान करणाऱ्या वर्गीकरण, विषयसूचि, सूचिपत्र, नोंदपत्रिका इ. शास्त्रीय उपकरणांनी सुसज्ज अशीं असंख्य बालग्रंथालयें सर्वत्र चालविलेलीं असून लक्षावधि बालवाचक त्यांचा सतत लाभ घेत आहेत.

## आणि हें आमच्याकडील दृश्य !

आणि आपल्याकडे केवळ मराठी भागापुरतेंच बोलावयाचें तर कांही शहरीं शिक्षणसंस्थांची थोडीफार कामगिरी क्वचित् खाजगी

अल्प प्रयत्न आणि गुर्जराधिपतींचा गेल्या २५ वर्षांतील विक्रम हीं वगळल्यास बाकी शून्य उरेल अशी माझी समजूत आहे. सामान्य अभिरुची, आर्थिक विपन्नता, असूया, अवहेलना, अज्ञान, अनास्था, आळस, औदासीन्य, राजाश्रयाचा अभाव आणि इतरहि कित्येक बाबतींत सर्वस्वी प्रतिकूल परिस्थिति ! अशा हीनदीन अवस्थेंत ग्रंथालयाची वाढ कशी होणार ? आपलेकडील शिशुग्रंथालयें अद्यापि बाल्यावस्थेंतच आहेत, असें म्हणणें क्रमप्राप्तच ठरतें. तथापि या निराशामय वातावरणाने हताश न होण्यासारखा परिस्थितींत उत्साहवर्धक पालट होत आहे. जनतेंत जागृति, ग्रंथालयचळवळ व तिला चालकांचें पाठबळ, सरकारचें सक्रिय सहानुभूतीचें धोरण, शाळा, शिशुसदनें, बालकमंदिरें इत्यादींचे उपक्रम, बडोद्याचें अनुकरणीय उदाहरण, नवनवीन शिक्षणसुधारणांनी व सामाजिक घडामोडींनी बालवाचकांत वाढीस लागलेला बहुश्रुतपणा, साक्षरताप्रसार व सक्तीचें सार्वत्रिक शिक्षण इ० उपायांनी अज्ञान, निरक्षरता नष्ट होण्याचीं सुचिन्हें वगैरेमुळे बालग्रंथालयांचे जोपासनेला अनुकूल काल येत आहे. त्यांचा फायदा घेण्याने त्यांचें पाऊल पुढे पडून प्रगति पथावर जाईल यांत काय शंका ? कारण गतकालांत स्थापन झालेल्या ग्रंथालयांपैकी कित्येकांचे रजत, कांहीचे सुवर्ण, हीरक तर क्वचित् कोणाचे शतसांवत्सरिक महोत्सव साजरे झालेले आहेत, होत आहेत. आणि आता तर काळ बराच पालटलेला आहे. मग ग्रंथालयांचा उत्कर्ष कां होऊं नये ? मात्र प्रथम नवीन मांड मांडतांना बाह्यांगाकडेच विशेष लक्ष दिलें जाऊं नये. प्रारंभीं सामान्य अंतरंगाने कां होईना आस्था, आवड, आवश्यकता वाढविणें युक्त आहे. उत्तरोत्तर विकास होईलच. शुभारंभच करावयाचा तर वृक्षाच्या शीतल छायेंतहि करणें शक्य आहे. सुमूहूर्तावर टाकलेलें पाहिलें पाऊल हजारो

मैलांचा प्रवास करतें, हें ध्यानीं घेऊन याहि अडचणींतून मार्ग निघेल. सर्वानुकूलता लाभल्यावर रेखीव रचना करणें फारसें कठीण नाही. शब्दचित्राला चैतन्यमय करतांना कल्पनांची वाण मुळीच पडणार नाही. कारण विविध, विपुल, साधनें उपलब्ध असतां एखादी सामान्य स्त्री देखील आरासनिर्मिती करूं शकते. अर्थात् परिपूर्ण स्वरूप दिसण्याचीच वाट पाहण्यांत स्वारस्य नाही, हें उघड आहे.

## प्रौढांबरोबरच बालांचीहि काळजी घेतली पाहिजे !

ग्रंथालय–विस्तार समितीच्या धोरणामुळे प्रौढ वाचकांची सोय होणार आहे. त्याच योजनेमार्फत बालग्रंथालयाकडेहि विशेष लक्ष देण्यास प्रत्यवाय दिसत नाही. तूर्त कदाचित् स्वतंत्र योजना आखतां येणार नाही. परंतु प्रौढांच्या दालनांत बालविभागालाहि एखाद्या कोपऱ्यांत स्थान मिळाल्यास वावगें होणार नाही. कायद्याने सरकारकडे जाणाऱ्या पुस्तकांत बालवाङ्मयहि येतें. आणि आता सरकारकडून मिळणाऱ्या ग्रंथसंग्रहांत तें समाविष्ट असणारच. अर्थात् नुकतेंच अस्तित्वांत आलेल्या प्रादेशिक केंद्रांत ही व्यवस्था सुरवातीपासूनच करतां येणें शक्य आहे. याखेरीज खाजगी प्रयत्नांतूनहि स्वतंत्र सार्वजनिक सोय झाली तर हवीच आहे. आणि त्या प्रयत्नांनाहि सरकारने द्रव्यसाहाय्य देऊन तीं ग्रंथालयें कार्यक्षम करावीं. लोकनियुक्त सरकारकडून तर ही अपेक्षा निश्चित पुरी होईल असें म्हणणें अप्रासंगिक होणार नाही. इतक्या निग्रहाने हें कार्य हातीं घेतल्यास नजीकच्या काळांत त्यांची वाढ खूपच होईल यांत संदेह नाही.

## आजचे किशोर उद्याचे नरकेसरी !

ग्रंथालयांचा विस्तार आणि साक्षरताप्रसार हे एकमेकांना पोषक आहेत. साक्षरताप्रणीत बुद्धीची धार गंजू न देणें हें कार्य ग्रंथालयांनाच

करतां येईल. सक्तीच्या सार्वत्रिक शिक्षणाने प्राप्त झालेली अक्षरओळख टिकविण्यास त्यांची फार आवश्यकता आहे. आणि ही उपयुक्तता कुणालाहि सहज पटेल. मात्र त्यांच्या गुणवत्तेत भर पडली पाहिजे व त्यांचा योग्य उपयोग करणारा वाचकवर्गहि गुण-वत्तेत श्रेष्ठच ठरणारा असला पाहिजे हें निर्विवाद होय. व तो कर्तव्यदक्ष होण्याची काळजी घेणें हेंहि कर्तव्यच ठरतें. ग्रंथालयांचा उपभोग घेणारा पण उपद्रव न देणारा, सहकार्याची हेटाळणी व ग्रंथांची हेळसांड न करतां सर्वांची सोय जाणणारा, शिस्त, नियम, टापटीप पाळणारा, विनयादराने व खिलाडूपणे वागणारा वाचकवर्ग त्या आदर्श ग्रंथालयासाठी निर्मिण्याचें कार्यहि लहानसहान नाही. आणि तेवढें पद्धतशीरपणे, निष्ठापूर्वक व आत्मीयतेने पार पाडलें तरी राष्ट्राची अमोल सेवा घडेल; वस्तुतः **शिशुसंग्रहालयांत बालकांनी एक वेळ पुस्तकें वाचलीं नाहीत तरी चालेल, पण तीं नीट वापरलीं जाण्याचें शिक्षण घेऊन तें अंगीं बाणणें हें अत्यंत अगत्याचें आहे.** व तें वळण त्यांना येथे लाभेल तर मोठा कार्यभाग होईल. मातेचे भूमिकेवरून हे नीति-पाठ ग्रंथपालानेच त्यांना द्यावे. अर्थात् त्यांची वाचनाभिरुची वाढवावीच; पण नीतिमत्ता, दानत, सदाचार इ० सद्‌गुणांचीं बीजें त्यांचे ठिकाणीं रुजवून तीं वाढीस लावणें, त्यांची जोपासना करणें इष्ट आहे. **कारण आजच्या किशोरांतून उद्याचे नरकेसरी निर्माण व्हावयाचे आहेत** हें विसरतां कामा नये. आणि तसे पराक्रमी पुरुषश्रेष्ठ निर्माण करण्याची शक्ति ग्रंथालयांत आहे असें म्हणणें अतिशयोक्तीचें होईल काय ? बालकांच्या सर्वांगीण वाढींतील चतुर्विध कर्तव्यांपैकी खाणेंपिणें, कपडालत्ता, सेवासंगोपन इ. आईबाप, पालक करीतच असतात. बुद्धि-ज्ञानादि वर्धिष्णु करण्याचा भार शालेय संस्थांकडे जातो. बलसंवर्धनादि

कामगिरी तालमी–आखाडे इ. शरीरशिक्षण–केंद्रें बजावीत असतात. मात्र मानसिक जोपासनेच्या चौथ्या अंगाची उन्नत्ति वरील तिन्ही कार्य–क्षेत्रांत सामग्र्याने होणें सुकर नसल्याने तें कर्तव्य ग्रंथालयांनी शिरावर घेतल्यास बालकांचा सर्वांगपरिपूर्ण विकास होईल हें उघड आहे. हे शुद्ध, श्रेष्ठ, उच्च, उदात्त संस्कार बालवयांतच मनावर बिंबविल्यास तसतशी बुद्धीची, मनाची घडण बनत जाईल.

> "बालपणीं बालांची कोमल तरुतुल्य बुद्धि वाकेल।
> घेईल ज्या गुणाला तो गुण मति वेष्टुनीहि फाकेल॥"

ही कविवाणी तरी हेंच सांगते. "शिवाजी महाराज बंडखोर की देशभक्त ?" या वादाची अपेक्षा या वयांत कोणी धरणार नाही, पण त्यांचें चरित्र वाचून 'मी असाच लोकोत्तर पुरुष होईन' हा आत्मविश्वास त्याला वाटावा असें मात्र कोणीहि म्हणेल.

## कांही महत्त्वाच्या सूचना

मुलांची सर्वांगीण सुधारणा होणें हें राष्ट्राच्या आयुष्याचें आवश्यक अंग आहे, व तें निकोप ठेवणें हें प्रगतशील राष्ट्राच्या निरामय प्रकृतीचें द्योतक आहे. याकडे देशकार्यधुरंधरांचें लक्ष वेधणें अगत्याचें आहे. हें या यथामती लिहिलेल्या साररूप दिग्दर्शनांत नमूद करावेसें वाटतें. याबरोबरच या शिशु ग्रंथालयांत घेतलीं जाणारीं पुस्तकें अत्यंत कसोशीने काळजीपूर्वक निवडलीं गेलीं पाहिजेत. त्यांत बालबुद्धीला आकलन न होणारीं किंवा बालमनावर विपरीत संस्कार करणारीं पुस्तकें मुळीच असूं नयेत. आणि या वाचालयांत ९ ते १२ वर्षें वयांच्या मुलामुलींचाच समावेश झाला पाहिजे, हें शिशुग्रंथालयांच्या चालकांनी लक्षांत ठेवावें.

# ग्रंथालयाचा कायदा

## केशव हरि बोरगांवकर

**परिचय**—जन्म बोरगांव (सातारा) १९१२. हे बी. ए. असून यांनी मुंबई विद्यापीठ ग्रंथालयाचें प्रमाणपत्रहि मिळविलें आहे. यांना ग्रंथालय शास्त्राची बरीच आवड आहे. सध्या हे फर्ग्युसन कॉलेजचे ग्रंथालय, पुणें येथे काम करतात.

समाजाच्या हितासाठी समाजावर घातलेल्या मर्यादित बंधनास सर्वसाधारणपणे "कायदा" असें संबोधण्यास हरकत नाही. कायदा म्हटला की एक प्रकारचें बंधन आलेंच. ज्या गोष्टींचे हितसंबंध जनतेशीं निगडीत असतात अशा गोष्टींवर सरकार नेहमी बंधन घालतें; म्हणजे त्या गोष्टीसंबंधी कायदा करतें. तेव्हा कायदा करण्या-इतकी ग्रंथालय ही बाब आवश्यक आहे किंवा काय? असा प्रश्न मनास चाटून गेल्याशिवाय रहात नाही. म्हणून यासंबंधीचा सांगोपांग विचार करणें जरूर आहे.

### राष्ट्राच्या उन्नतीचें मूळ

अमेरिका, इंग्लंड, रशिया इत्यादि राष्ट्रें आज जगाच्या प्रगतिपथावर आहेत. हींच राष्ट्रें अग्रभागी कां आहेत? इतर राष्ट्रें त्यांच्याबरोबर कां असूं नयेत? इतर राष्ट्रांत काय कमी आहे? ह्या राष्ट्रांत काय जास्त आहे? या प्रश्नांचीं उत्तरें शोधूं लागल्यास असें दिसून येईल की; या सर्व प्रश्नांचीं उत्तरें एकाच गोष्टींत आहेत आणि ती गोष्ट म्हणजे त्या देशांतील 'सुशिक्षित व कर्तव्यदक्ष प्रजा'.

कोणत्याहि राष्ट्राची प्रगति किंवा अधोगति त्या राष्ट्रांतील प्रजेवर अवलंबून असते. प्रजेची उन्नति हीच राष्ट्राची उन्नति होय. प्रजेची उन्नति ही तिच्या बौद्धिक पातळीवर आधारलेली आहे. कारण प्रजा जितकी सुशिक्षित व कर्तव्यदक्ष तितकी तिची उन्नति अधिक. कोणाही व्यक्तीचा आचार बदलावयाचा असल्यास प्रथम विचार बदलावयास पाहिजे व विचार बदलावयास ज्ञान प्राप्त झालें पाहिजे. म्हणजे ज्ञान प्राप्त झाल्यावर विचार व आचार हे दोन्ही बदलतात. तेव्हा प्रजेला जर कर्तव्यदक्ष करावयाचें असेल तर तिला प्रथम ज्ञान दिलें पाहिजे. प्रजा ज्ञानी करण्यांतच प्रजेच्या उन्नतीचा पाया आहे. म्हणून ज्ञान हें प्रजेच्या उत्कर्षाचें एक महत्वाचें व मुख्य कारण आहे; आणि प्रजा ज्ञानी होण्यांतच राष्ट्राच्या उन्नतीचें मूळ आहे.

## ग्रंथालयाची आवश्यकता

आता हें ज्ञान कसें व कोठून मिळवावयाचें हा प्रश्न आहे. ज्ञानार्जनाचें पहिलें ठिकाण म्हणजे कुटुंब व त्यानंतरचें शाळा हें होय. परंतु याठिकाणीं फक्त दैनंदिन व्यवहारांत कसें वागावें यासंबंधीचें अगदी प्राथमिक ज्ञान मिळतें. पण बौद्धिक पातळी कशी वाढवावी व ती वाढविण्यास काय करावें हें जाणण्यास हीं साधनें फारच अपुरीं पडतात. शाळेंत फक्त लिहितां वाचतां येणें व कांही विषयांचें सामान्य ज्ञान होणें यापेक्षा अधिक कार्य होत नाही. या ठिकाणीं बौद्धिक प्रगति होत नसून ती करून घेण्यासाठी दुसऱ्या साधनाचें साहाय्य घेणें जरूर आहे. आपल्या देशांत बहुतेकांना प्राथमिक शिक्षण झालें की शाळा सोडून स्वतःच्या उदर्निर्वाहासाठी कांही तरी उद्योग करावा लागतो. अशा लोकांची साक्षरतेशिवाय सर्वच बौद्धिक प्रगति खुंटलेली असते. या लोकांना त्यांच्या आवडीचीं पुस्तकें त्यांच्या सवडीच्या वेळीं

वाचावयास दिल्यास ते तीं पुस्तकें मोठ्या उत्सुकतेने व आस्थेने वाचतील आणि त्यामुळे त्यांच्या बौद्धिक प्रगतींत भर पडेल यांत शंका नाही. प्राथमिक शाळा सोडल्यानंतर अतृप्त राहिलेली बौद्धिक भूक फक्त एकाच ठिकाणीं शमविली जाते आणि तें ठिकाण म्हणजे 'ग्रंथालय' हें होय. ग्रंथालयांत प्रत्येकाला सर्व प्रकारची (बौद्धिक भूक भागविण्यासाठी लागणाऱ्या बहुतेक सर्व गोष्टींची) मदत मिळू शकते. याच ठिकाणीं फक्त बौद्धिक पातळी वाढविण्यास पूर्ण वाव असतो.

एके काळीं ग्रंथालयें हीं पुस्तकें लिहिण्याची जागा व नंतर तीं पुस्तकें साठविण्याची जागा अशा अर्थाने रूढ होतीं. तदनंतर ग्रंथालयांचा उपयोग विश्रांतीचा वेळ घालविण्यासाठी व करमणुकीच्या वाचनासाठी केला जात असे. परंतु हल्लीच्या जमान्यांत वरील सर्व अर्थ बदलून ग्रंथालय ही एक महत्त्वाची व आवश्यक अशी सामाजिक संस्था समजण्यांत येते. कारण ग्रंथापालाला वाचकांची आवडनिवड लक्षांत घेऊन पुस्तकें खरेदी करावीं लागतात. त्यामुळे त्याला वाचकांचा चांगलाच अभ्यास करावा लागतो. शिवाय हल्लीचें ग्रंथालय हें वाचकांना करमणुकीच्या वाचनाकडून शिक्षणविषयक वाचनाकडे किंवा ज्ञानार्जनाकडे नेण्याचा प्रयत्न करीत असलेलें आपणास दिसून येतें. तेव्हा ग्रंथालय हें समाजाच्या ज्ञानार्जनाचें मुख्य व महत्त्वाचें साधन आहे. यावरून ग्रंथालयाचा समाजाशीं किती निकटचा संबंध आहे व समाजाच्या उत्कर्षासाठी ग्रंथालयें कां आवश्यक आहेत हें सहज ध्यानांत येईल.

## सरकारचें कर्तव्य

सरकारचें मुख्य कर्तव्य म्हणजे प्रजेचें हित पाहणें, तिला ज्ञानी व कर्तव्यदक्ष बनविणें हें होय. वर म्हटल्याप्रमाणे ज्ञानामुळे विचार

बदलतो आणि विचारामुळे आचार बदलतो. यावरून सर्वांचें मूळ ज्ञानांत आहे. जर प्रजा कर्तव्यदक्ष व्हावी असें वाटत असेल तर तिला प्रथम ज्ञान दिलें पाहिजे. प्रजेला ज्ञानी करणें हें राष्ट्राच्या व प्रजेच्या हिताच्या दृष्टीने सरकारचें आद्यकर्तव्य ठरतें. प्राथमिक शिक्षण देणें म्हणजे प्रजा ज्ञानी करणें असें नव्हे. प्राथमिक शिक्षण दिल्यावर आपलें कर्तव्य संपतें अशी सरकारने कल्पना केल्यास ती चुकीची ठरेल. प्रजेला नुसतें साक्षर करून भागणार नाही. तर तिला जरूर असलेलें ज्ञान दिलें पाहिजे. तें ज्ञान देण्यासाठी सरकारला ग्रंथालयाची कास धरणें जरूर आहे. ग्रंथालयांच्या साहाय्यानेच सरकारला आपलें कर्तव्य पार पाडतां येईल. यावरून ग्रंथालयाची जोपासना करून तिची वाढ करणें हेंच सरकारचें अप्रत्यक्ष रीतीने आद्यकर्तव्य ठरतें.

## कर्तव्य पार पाडण्यास लागणारा पैसा

सरकारला आपलें कर्तव्य बजावण्यासाठी पैशाची आवश्यकता आहे. हा पैसा कसा व कोठून उत्पन्न करावयाचा हा महत्वाचा प्रश्न आहे. चालू सरकारची आर्थिक परिस्थिति पाहिल्यास असें दिसून येईल की सध्या प्रजेला नुसतें प्राथमिक शिक्षण मोफत देणें सरकारला फार कठीण झालें आहे. त्यासाठी लागणारा पैसा प्रजेवर निरनिराळे कर बसवून वसूल करावा लागतो. तेव्हा आहे ह्या परिस्थितींत सरकारला ग्रंथालयासाठी जादा खर्च करणें शक्य नाही. एकीकडे ग्रंथालयासाठी खर्च करावयास पैसा नाही आणि दुसरीकडे ग्रंथालयें तर राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीने आवश्यक आहेत. अशा दुहेरी पेचांत सरकार सध्या सापडलेलें आहे म्हणून सरकारने प्रथम ग्रंथालयांचा कायदा करून ग्रंथालयांच्या खर्चासाठी प्रजेकडून निराळा कर वसूल केला पाहिजे. त्याशिवाय दुसरा मार्ग नाही.

सुरवातीस ज्या राष्ट्रांचा उल्लेख केला आहे त्या राष्ट्रांत ग्रंथालयांचा कायदा केलेला असून ग्रंथालयांसाठी लागणारा सर्व पैसा प्रजेकडून कराच्या रूपाने वसूल केला जातो. ग्रंथालयास लागणारा सर्व खर्च प्रजेवर वाटेल तेवढा कर बसवून वसूल करण्याची मुभा त्यांच्या ग्रंथालयांच्या कायद्याने दिलेली आहे. यावरून ह्या राष्ट्रांतील प्रजा व सरकार ग्रंथालयास किती महत्त्व देतात याची कल्पना येईल. ग्रंथालयांचे बाबतींत हिंदुस्थान सरकारने ह्या राष्ट्रांचीं उदाहरणें डोळ्यापुढे ठेवून ग्रंथालयांचा कायदा शक्य तितक्या लवकर करावा व कराच्या रूपाने प्रजेकडून पैसा वसूल करून सध्याची आर्थिक कोंडी फोडावी.

## हिंदुस्थानांतील ग्रंथालयांची सद्यःस्थिति

आज जीं कांही थोडीं ग्रंथालयें हिंदुस्थानांत आहेत तीं बहुतेक सर्व सरकारी मदतीशिवाय चाललेलीं असून तीं खाजगी संस्थांच्या ताब्यांत आहेत. त्यांची आर्थिक स्थिति फारच हलाखीची आहे. पैसा भरपूर नसल्यामुळे तीं खुरटलेलीं दिसतात. ग्रंथालयासाठी लागणाऱ्या पैशाची तरतूद वाचकांकडून वर्गणी घेऊन करावी लागते. आणि नुसत्या वर्गणीवर ग्रंथालय चालविणें शक्य नाही. त्याला धनिकांची व सरकारची मदत आवश्यक आहे. कारण हिंदुस्थानांतील जनता अगोदर निरक्षर. व जे कांही साक्षर व सुशिक्षित आहेत त्या सर्वांना वर्गणी भरणें शक्य नसतें. आजमितीस साधारणपणें शेंकडा १५ टक्के लोक साक्षर आहेत. त्यांतील शेंकडा ५ तरी लोक वर्गणी भरून ग्रंथालयाचा फायदा घेतात किंवा नाही याबद्दल शंका वाटते. तेव्हा हिंदुस्थानांत तरी नुसत्या वर्गणीवर ग्रंथालय चालणें शक्य नाही. त्यासाठी सरकारचीच मदत पाहिजे. हिंदुस्थान

सरकारने ग्रंथालयांचे बाबतींत आजतागायत काय केलें हें डॉ. रंगनाथन् यांनी आपल्या "Post war Reconstruction of Libraries in India" या पुस्तिकेंत दिलेल्या पुढील तुलनात्मक गोष्टींवरून स्पष्ट होईल.

**एकूण ग्रंथसंख्या**—

| | | |
|---|---|---|
| (१) | इंग्लंड | २८,००,००,०० |
| (२) | अमेरिका | ६८,००,००,०० |
| (३) | बडोदें | १,९०,००,०० |
| (४) | मद्रास | १,००,००,०० |
| (५) | पूर्ण हिंदुस्थान | ? |

( टिप—वरील व यापुढील उदाहरणांत 'हिंदुस्थान' याचा अर्थ हिंदुस्थान सरकार असा करावा ).

**प्रत्येक माणशी ग्रंथसंख्या**—

| | | |
|---|---|---|
| (१) | नॉर्वे | २ |
| (२) | स्विडन | १ $\frac{1}{2}$ |
| (३) | इंग्लंड | $\frac{1}{2}$ |
| (४) | अमेरिका | $\frac{1}{2}$ |
| (५) | हिंदुस्थान | $\frac{1}{100}$ पेक्षा कमी. |

**प्रत्येक माणशी घरीं वाचावयास दिलेलीं पुस्तकें**

| | | |
|---|---|---|
| (१) | झेकोस्लोव्हाकिया | १८ |
| (२) | डेनमार्क | ५ |
| (३) | इंग्लंड | ४ |
| (४) | जर्मनी | १ $\frac{1}{2}$ |
| (५) | बडोदे | १ $\frac{1}{2}$ |
| (६) | हिंदुस्थान | $\frac{1}{100}$ |

**ग्रंथालयांचा फायदा मिळणाऱ्या जनतेची शेंकडेवारी**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) | इंग्लंड | शेंकडा ९९ टक्के | ६०० ग्रंथालयांच्या द्वारें | |
| (२) | अमेरिका | ,, ७३ ,, | ७००० | |
| (३) | बडोदें | ,, ८३ ,, | १३४७ | |
| (४) | पूर्ण हिंदुस्थान | ,, १ ,, | ? | |

**प्रत्येक माणशी दरवर्षी ग्रंथालयांवर होणारा खर्च**

| | | |
|---|---|---|
| (१) | इंग्लंड | १ रुपया |
| (२) | अमेरिका | २ रुपये |
| (३) | बडोदें | १ आणा |
| (४) | पूर्ण हिंदुस्थान | एका पैचा कितवा हिस्सा ? |

वरील तुलनात्मक आकडयांवरून हिंदुस्थान सरकारने ग्रंथालयांची किती काळजी घेतली आहे हें ध्यानांत येतें. ह्या आकडयांवरून एवढी गोष्ट निश्चित झाली आहे की हिंदुस्थानांतील बडोद्याचा ग्रंथालयाचे बाबतींत बराच वरचा क्रमांक लागेल यांत शंका नाही. बडोदा सरकारने सर्व ग्रंथालयांची व्यवस्था व आर्थिक बोजा उचललेला आहे. आणि त्याचा परिणाम काय झालेला आहे हें वरील आकडेच सांगतात. हिंदुस्थान व बडोदा हीं एकाच परिस्थितींतील दोन टोकांचीं दोन उदाहरणें डोळयापुढे ठेवल्यास असें दिसतें की एका प्रांतांतील ग्रंथालयांना सरकारी मदत मिळाल्यामुळे त्यांची सुस्थिति आहे आणि त्याच परिस्थितीमधील दुसऱ्या प्रांतांतील ग्रंथालयांकडे सरकारने दुर्लक्ष केलेलें आहे व त्याकरितां एक पै सुद्धा खर्च करीत नाही. त्याचे परिणार काय झाले आहेत याचें प्रत्यक्ष अनुमान वरील आकडयांवरून कोणासहि सहज काढतां येईल. आजपर्यंत हिंदुस्थानांत परकीय सत्ता होती. आणि [illegible] सत्तेने

जाणून बुजून ग्रंथालयांकडे व त्याबरोबरच प्रजेच्या उत्कर्षाकडे दुर्लक्ष केलें असें म्हणून समाधान करून घेतां आलें असतें. परंतु आता आपलें सरकार सत्तारूढ असल्यामुळे वरीलप्रमाणे विधान करून कोणाचेंहि समाधान होणार नाही. यापुढे सरकारने ग्रंथालयासारखी महत्वाची बाब खाजगी संस्थेकडे अगर चालकांकडे सोपवूं नये व त्यांची हलाखीची स्थिति करूं नये. सरकारने सर्व ग्रंथालयें आपल्या ताब्यांत घेऊन त्यांची एकमार्गी अशी व्यवस्था लावावी. त्यासाठी लागणारा पैसा सरकारने प्रजेकडून करांच्या रूपाने वसूल करावा. सद्यःस्थितीला सरकारला दुसरीकडून पैसा उत्पन्न करणें शक्य नाही. म्हणून ग्रंथालयाचा कायदा करून सरकारने पैशाची तरतूद करणें अगदी अत्यावश्यक आहे.

हिंदुस्थानला जर जगाच्या बरोबरीला यावयाचें असेल तर सरकारने किमान पक्षीं पुढील गोष्टी करणें जरूर आहे असें डॉ. रंगनाथन् यांनी वर उल्लेख केलेल्या पुस्तिकेंत म्हटलें आहे.

१. कमीत कमी लोकसंख्येइतकीं पुस्तकें पाहिजेत.
२. प्रत्येक माणशी दरवर्षीं निदान एक तरी पुस्तक घरीं वाचावयास दिलें पाहिजे.
३. देशांत सर्व लोकांना (१०० टक्के) ग्रंथालयांचा फायदा घेतां आला पाहिजे.
४. प्रत्येक १०० वाचकांसाठी ग्रंथालय सेवकांचा निदान ४० तास वेळ खर्ची पडला पाहिजे.
५. ग्रंथालयांसाठी सरकारने प्रत्येक माणशी आठ आणे खर्च केले पाहिजेत.

डॉ. एस्. आर. रंगनाथन् यांनी आपल्या नागपूर येथे भरलेल्या अखिल हिंदुस्थान ग्रंथालय परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत पुढील ३० वर्षांत हिंदुस्थान सरकारने ग्रंथालयांची वाढ कशा प्रकारें

करावी याची रूपरेषा दिलेली आहे. त्यांच्या मताप्रमाणें पुढील तीस वर्षांनी म्हणजे १९८० सालीं खालीलप्रमाणे हिंदुस्थानांत ग्रंथालयें असावींत.

| | | |
|---|---|---|
| १. | राष्ट्रीय केंद्रीय ग्रंथालय | १ |
| २. | प्रांतिक केंद्रीय ग्रंथालयें | २२ |
| ३. | शहर केंद्रीय ग्रंथालयें | १५४ |
| ४. | शहर शाखा ग्रंथालयें | ७१२ |
| ५. | ग्रामीण केंद्रीय ग्रंथालयें | ३७३ |
| ६. | ग्रामीण शाखा ग्रंथालयें | ४१०० |
| ७. | फिरतीं ग्रंथालयें | १३१०७ |
| ८. | लहान लहान वस्तीच्या गावांना पुस्तकें देण्याचीं ठिकाणें | २६८३६१ |

ग्रंथालयासाठी खर्च केलेला पैसा निष्कारणीं खर्चीं पडला असें मानण्याचें मुळीच कारण नाही. उलट तो दसपटीने परत आलेला दिसून येईल. हें मात्र खरें की कांही काळपर्यंत त्याचा मोबदला त्याच प्रमाणांत मिळाल्याचें समजून येत नाही. परंतु कांही दिवसांनी हा सर्व पैसा निरनिराळ्या रूपाने परत येत असलेला स्पष्ट दिसतो. उदाहरणार्थ, ग्रंथालयांत प्रत्येकाला त्याच्या आवडीचीं पुस्तकें वाचावयास मिळतात व त्याच्या आवडीचें ज्ञान त्याला मिळतें. या ज्ञानामुळे कोणी आपल्या कामांत कौशल्य दाखवील, कोणी उत्पादन वाढवील, कोणी आधुनिक पद्धतीने उत्कृष्ट व्यापार करील; अशा तऱ्हेने प्रत्येकजण मिळविलेल्या ज्ञानाचा फायदा घेऊन आपल्या व्यवसायांत प्रगति करून घेण्याचा प्रयत्न करील. हा केवढा मोठा फायदा आहे! म्हणून ग्रंथालयांसाठी झालेला खर्च सत्कारणींच आहे असें म्हणावें लागतें.

हल्ली जीं कांही ग्रंथालयें चालू आहेत त्यांनाच थोडी जास्त मदत देऊन तीं चालवावींत असें कोणी म्हणेल. पण अनुभवावरून ही पद्धत कुचकामी ठरलेली आहे. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे सध्या मुंबई सरकारने सुरू केलेलीं महाराष्ट्र, गुजराथ व कर्नाटक हीं ग्रंथालयें होत. हीं ग्रंथालयें सुरू करतांना एक अट होती. ती अशी की स्थानिक लोकांकडून जितके पैसे दरवर्षी जमा होतील तितकीच रक्कम सरकारकडून मिळेल. निदान महाराष्ट्र ग्रंथालयाचे बाबतींत बोलावयाचें झाल्यास स्थानिक एकहि पैसा जमा होत नसून सर्वच खर्च सरकारला करावा लागतो. तेव्हा मदत देऊन ग्रंथालय चालविण्याच्या भानगडींत सरकारने पडूं नये. दुसरा एक मार्ग म्हणजे वर्गणीवर ग्रंथालयें चालविणें. पण हाही मार्ग यशस्वी होणार नाही. कारण पुस्तकें व वाचक यांच्यामध्ये वर्गणीचा दुवा आल्यामुळे वाचक पुस्तकापासून दुरावतात. शिवाय सुरवातीसच सांगितल्याप्रमाणे वर्गणी भरून वाचनालयांत जाणारे असे फारच थोडे वाचक असतात. म्हणून हा उपायहि निरुपयोगी ठरतो.

एकंदरींत वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट झालेली आहे की, ग्रंथालयांची आर्थिक जबाबदारी सरकारनेच घ्यावयास पाहिजे; आणि त्यासाठी ग्रंथालयाचा कायदा सम्मत करून ग्रंथालयाचा कर जनतेवर बसवून पैशाची तरतूद करणें जरूर आहे.

डॉ. रंगनाथन् यांचे मतें प्रत्येक प्रांताने आपल्याला सोयिस्कर असा ग्रंथालयाचा कायदा सम्मत करून घ्यावा. त्याप्रमाणे त्यांनी मुंबई प्रांताकरितां 'ग्रंथालयाच्या कायद्याचा मसुदा' इ. स. १९४७ सालीं तयार करून दिलेला आहे. परंतु त्याचें कायद्यांत रूपांतर अजूनपर्यंत मुंबई सरकार करूं शकलें नाही, ही दुःखाची गोष्ट आहे. तसेंच डॉ. रंगनाथन् यांनी हिंदुस्थान सरकारसाठी व इतर कांही

प्रांतिक सरकारांसाठी ग्रंथालय कायद्याचे मसुदे तयार करून दिलेले आहेत. त्यांचें कायद्यांत रूपांतर करून घेण्यासाठी जनतेने सरकारकडे वारंवार मागणी केली पाहिजे.

"फूल ना फुलाची पाकळी" या म्हणीप्रमाणे मुंबई सरकारने जरी ग्रंथालयाचा कायदा केला नाही तरी ग्रंथालय चळवळीस थोडा फार हातभार लावलेला आहे. मुंबईमध्ये एक मध्यवर्ति ग्रंथालय उघडून महाराष्ट्र, कर्नाटक व गुजराथ या तीन विभागांसाठी तीन ग्रंथालयें चालू केलेलीं आहेत. तसेंच त्या त्या विभागांतील जिल्हे, तालुके, मोठीं शहरें, याठिकाणीं ग्रंथालयें उघडण्याचें कार्य चालू आहे. ही गोष्ट जरी कौतुकास्पद असली तरी वरील उपक्रमासाठी पैशाची जरूरी आहे व तो भरपूर न मिळाल्यास सरकारला आपला उपक्रम बंद करण्याची पाळी येईल. ती येऊं नये म्हणून सरकारने वेळींच सावध होऊन शक्य तितक्या लवकर ग्रंथालय कायदा सम्मत करून पैशाची तरतूद करून ठेवावी. आज ना उद्या प्रत्येक सरकारला हा कायदा करावा लागेल हें पक्कें ध्यानांत ठेवावें.

---

# देवालय आणि ग्रंथालय !

लोककल्याणासाठी देवालयाइतकीच (किंबहुना जास्त) ग्रंथालयाची गरज व महत्व आहे. कारण

देवळांत देव असतात आणि ग्रंथालयांत ग्रंथ असतात.

भक्त देवळांत देवांची भक्ति करण्याकरिता जातात आणि वाचक ग्रंथालयांतील थोर थोर ग्रंथ वाचनासाठी जातात.

एकाने भक्तीची भूक भागते तर दुसऱ्याने बुद्धीची भूक भागते.

---

# ग्रंथालयें व साक्षरता

## कृष्णाजी शंकर हिंगवे

**परिचय**—जन्म तेल्हारा (विदर्भ). हे बी. ए., डी. एल., एस्. पी. आहेत. यांचा ग्रंथालय विषयक सखोल अभ्यास असून यांनी बरे लेख लिहिले आहेत. शिवाय इतिहासाचे वर्गीकरण या नांवाचें एक पुस्तकहि प्रसिद्ध झालें आहे. हे महाराष्ट्र ग्रंथालयाचे प्रथमपासून सभासद असून भारतीय संघाचे प्रतिनिधि आहेत. यांनी पुणें ग्रंथालय संघाच्या चिटणीसाचें कामहि केलें आहे. हे सध्या पुणें विद्यापीठ ग्रंथालयाचे ग्रंथपाल आहेत.

### ग्रंथालय-महत्वाची जाणीव नाही

ग्रंथालय म्हटलें की अनेक लोकांच्या दृष्टीपुढे एक विशिष्ट चित्र उभें रहातें. पुस्तकें देवघेवीचें ठिकाण किंवा ज्या ठिकाणीं फावल्या वेळीं वर्तमानपत्रें, नियतकालिकें चाळावयास सापडतात अशा स्थळाला ग्रंथालय म्हणण्याची प्रथा आजही आढळते. शैक्षणिक व इतर सर्व क्षेत्रांत ग्रंथालयांचें स्थान किती महत्वाचें आहे याची जाणीव अनेकांना नाही. अशी जाणीव नसण्याचें कारणही तसेंच आहे. आणि तें कारण म्हणजे आमचा ग्रंथालयासंबंधीचा बुरसटलेला दृष्टिकोन ! ज्ञानसंवर्धन व ज्ञानप्रसार करण्याकडे ग्रंथालयांचा उपयोग किती व्यापक व प्रभावी पद्धतीने केला जातो याची माहिती अमेरिकेंतील व पाश्चात्य देशांतील ग्रंथालय चळवळींचे इतिहास सहज देऊं शकतील. भारतांत फार प्राचीन काळापासून ग्रंथालयांचें

अस्तित्व आढळून येतें. तथापि समाजांतील बहुसंख्य लोकांना त्याचा फायदा मिळत नसे. ज्ञान मिळविण्याचे व तें दुसऱ्यास देण्याचे अधिकार एका विशिष्ट जमातीनेच मर्यादित केल्याने आपल्या देशांतील बहुसंख्य नागरिक निरक्षरच राहिले. गेल्या शतकांत ही परिस्थिति बदलून शिक्षणाचें दालन सर्व जातींना खुलें झाले व पुस्तकांच्या द्वारें ज्ञानाचा प्रसार फार व्यापक स्वरूपांत होऊं लागला. छापण्याच्या कलेमुळे ग्रंथसंख्येंत साहजिकच वाढ होऊं लागली व थोड्याच अवधींत सार्वजनिक ग्रंथालयांची लोकांना आवश्यकता भासूं लागली. आज महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख शहरांत सार्वजनिक ग्रंथालयें आढळून येतील. तथापि आंकडेवारी काढल्यास पांच टक्के तरी वाचक या ग्रंथालयांचा फायदा घेतात किंवा नाही याबद्दल शंका आहे. जे सुशिक्षित आहेत व ज्यांना वाचतां येतें असे नागरिक व विद्यार्थीच या ग्रंथालयांचा फायदा घेतात. आपल्यापुढे जो प्रश्न आहे तो असा की या पांच टक्क्यांशिवाय बाकीच्या बहुसंख्य नागरिकांना ग्रंथालयांचा कोणत्या प्रकारें उपयोग होईल. जे काही थोडे-फार लोक ग्रंथालयांत जातात त्यांपैकी बहुसंख्य वाचक मनोरंजन करण्याच्या उद्देशानेच जातात. ज्ञानलालसा किंवा एखाद्या विषयांत पारंगतता मिळविण्याच्या हेतूने अथवा संशोधन करण्याचे जिज्ञासेने ग्रंथालयांत पाऊल टाकणारे नागरिक फारच थोडे ! कादंबऱ्या, लघु-कथा, भावगीतें, नियतकालिकें व इतर मनोरंजनात्मक वाङ्मयासाठी बारी (क्यू) लावणारे वाचकच अधिक ! शाळा, कॉलेजें अथवा संशोधक व विद्यापीठांचीं ग्रंथालयें सोडल्यास बहुसंख्य सार्वजनिक ग्रंथालयांत आपणास एका विशिष्ट प्रकारचेच ग्रंथ व नियतकालिकांचा संग्रह पहावयास मिळेल. दुकानदार गिऱ्हाइकांच्या आवडी निवडी लक्षांत घेऊन मालाचा पुरवठा करतो त्याप्रकारची व्यापारी वृत्ति

ग्रंथालय व्यवस्थापकांच्या मनाचा कबजा घेऊं पहात आहे. कांहीही करून ग्रंथालयाचें अस्तित्व टिकविणें हें ध्येय असूं नये. विविध प्रकारच्या निवडक वाङ्मयाचा संग्रह करून समाजांतील घटकांना त्याची गोडी लावण्याचें ध्येय सार्वजनिक ग्रंथालयांनी सतत नजरे-समोर ठेवणें अत्यंत हितावह आहे. **ज्ञानाचा केवळ संग्रह न करतां ज्ञानाचा प्रसार अधिक वेगाने व मोठ्या प्रमाणावर कसा करतां येईल याकडे ग्रंथालयांच्या व्यवस्थापकांनी अधिक लक्ष देणें अगत्याचें आहे.** रंगेल व हीन दर्जाचें वाङ्मय ग्रंथालयांत ठेवण्याची प्रथा समाजाच्या दृष्टीने अत्यंत अनिष्ट अशी आहे. अशा प्रकारचें वाङ्मय संग्रहीत करण्यापेक्षा ग्रंथालयें बंद झालीं तरी चालतील. याबाबत एक उद्बोधक उदाहरण वाचण्यासारखें आहे. जगप्रसिद्ध 'स्ट्रँड' मासिक नुकतेंच बंद झाल्याची वार्ता अनेकांनी ऐकली असेल. हें मासिक आपखुषीने बंद कां करावें लागलें याचा खुलासा जो प्रसिद्ध झाला आहे त्याचा सारांश असा— "या मासिकाच्या मुखपृष्ठावर एका विशिष्ट प्रकारचींच चित्रें छापलीं जात असत. रंगेल वाचकांच्या हौशीखातर मासिकाचे चालक वाटेल त्या प्रकारचीं चित्रें छापावयास तयार नव्हते. यामुळे मासिकाचा खप अर्थातच रोडावला. हा प्रसंग चालकांनी लक्षात घेऊन स्वतःच मासिक बंद केलें. परंतु केवळ वाचकाच्या मोहबतीखातर वाटेल तीं चित्रें त्यांनी मासिकाच्या मुख-पृष्ठावर छापलीं नाहीत." याला म्हणतात ध्येयनिष्ठा !

## ग्रंथालयांची आवश्यकता केव्हा व कोणाकरिता ?

आपल्या देशांतील बहुसंख्य सार्वजनिक ग्रंथालयांची अवस्था वर वर्णन केल्याप्रमाणे आहे. अर्थात् याला कांही अपवादही असूं शकतील. ग्रंथालय हें ज्ञानप्रसाराचें अत्यंत प्रभावी साधन असूं शकतें,

याची जाणीव बऱ्याच जणांना नसल्याकारणाने 'ग्रंथालयें व साक्षरता' यांचा जवळचा संबंध आहे असें कुणास सांगितल्यास त्याला आश्चर्य वाटणें स्वाभाविक आहे. युनेस्कोच्या ग्रंथालय समितीने जो ठराव नुकताच मंजूर केला तो असा. "Public libraries can be and indeed in some cases are among the most effective agencies now existing for the continuing education of great masses of people." या ठरावानुसार आपल्या देशांतील ग्रंथालयांनी कार्याची दिशा आखल्यास निरक्षरतेचा नायनाट होण्यास फार अवधी लागणार नाही. आपल्या देशांतील ग्रंथालय चळवळीची आखणी करतांना पाश्चात्यांचें अंधानुकरण करतां कामा नये. देशांतील बहुसंख्य नागरिक साक्षर असल्याने पाश्चात्य देशांत ग्रंथालयांची वाढ फार झपाट्याने झाली. भारतांत याच्या उलट परिस्थिति असल्याने म्हणजे बहुसंख्य नागरिक निरक्षर असल्याकारणाने ग्रंथालयांची खेडोपाडीं आजच्या स्थितींत तरी स्थापना करण्यांत कांही अर्थ नाही. "साक्षर" या शब्दाची व्याख्या ज्याला लिहितां वाचतां येते तो "साक्षर" अशी केल्यास आणखी दहापंधरा वर्षें तरी खेड्यापर्यंत ग्रंथालयांचें जाळें पोचविण्याची कांहीच गरज नाही असें जो तो म्हणेल. कारण लोकांना वाचतांच येत नसेल तर नुसतीं ग्रंथालयें तरी काढून त्याचा उपभोग कोण घेणार, हा महत्वाचा मुद्दा आहे. **ज्याप्रमाणे आंधळ्या इसमाला काश्मीरच्या वनश्रीची शोभा आजमावतां येणें शक्य नाही त्याचप्रमाणे निरक्षराला ग्रंथालयाची काय किंमत कळणार?** 'ग्रंथालयें व साक्षरता' यांची जर सांगड घालावयाची असेल तर 'साक्षर' या शब्दाकडे आपण जरा व्यापक अर्थाने बघितलें पाहिजे. अशिक्षित

जनतेला 'ग, म, भ, न' वाचावयास व लिहावयास शिकविलें किंवा सुशिक्षित नागरिकांना पदवीचा लाभ करून दिला म्हणजे जनता साक्षर झाली असें म्हणणें चुकीचें ठरेल. **साक्षरतेचा उपयोग व्यक्तीच्या जीवनाची सर्वांगीण उन्नति करण्याकडे झाला तरच त्यांत कांही स्वारस्य आहे.** साक्षर झालेले किती तरी पदवीधर आपल्या देशांत आहेत. तथापि जीवनाची सर्वांगीण उन्नति करण्याचा कितीजण प्रयत्न करीत असतात? या व्यापक अर्थाने 'साक्षर' व 'निरक्षर' जनतेचें परीक्षण केल्यास त्या दोहोंमध्ये फारच थोडें अंतर आढळून येईल. ज्या पद्धतीने 'साक्षर' व 'निरक्षर' नागरिकांच्या जीवनांत ज्ञानलालसा, आनंद, प्रेम, उत्साह, उद्योगप्रियता, ध्येयनिष्ठा, सचोटी इ० समाजपोषक गुणांची निर्मिती करतां येईल ती खरी 'साक्षरता'. सर्व जनतेला लिहिण्यावाचण्यास शिकविण्यास बराच कालावधि लागेल हें निश्चित! तथापि या काळापर्यंत जनतेला वरील अर्थाने 'साक्षर' करण्याचें काम ग्रंथालयांना खात्रीने करतां येईल.

## खेड्यांतील ग्रंथालयांचीं विविध कार्यें

जनतेला साक्षर करण्याचे अनेक मार्ग आहेत. त्यासाठी सरकारने खेडोपाडीं ग्रंथालयें जरूर स्थापावींत; परंतु ग्रंथ-संग्रह करणें हेंच केवळ त्यांचें ध्येय असूं नये. ज्या खेडुतांना वाचतां येत नाही असे लोक ग्रंथालयांत कशासाठी जातील? या खेडुतांनी ग्रंथालयांतील पुस्तकें वाचावींत असें सरकारला जर खरोखर वाटत असेल तर ग्रंथालयाच्या जागेचा प्रथम पुढीलप्रमाणे उपयोग करावा.

१. ग्रंथालयांच्या मार्फत मोफत 'साक्षर'तेचे वर्ग चालवावेत.
२. शेती कशी करावी, खतें कोणतीं वापरावींत, पिकांचें संरक्षण कसें करावें, आरोग्य व स्वच्छता कशी राखावी इ.

जीवनाशीं निगडित अशा विषयासंबंधी ग्रंथालयाच्या जागेंत सचित्र व सटीकात्मक माहिती द्यावी.

३. आपला देश, आपला इतिहास, आपली संस्कृती याबद्दलची अशिक्षित खेडुतांना सुलभ भाषेंत माहिती सांगावयाचें काम ग्रंथालयांना हातीं घेणें शक्य आहे.

४. उच्च अभिरुचि व शुद्ध संस्कृति यांच्या शिक्षणासाठी ग्रंथालयाच्या जागेंत भजनाचे व कीर्तनाचे कार्यक्रम मधून मधून करणें उपयुक्त ठरेल.

५. कित्येक अशिक्षित खेडुतांना जगांत काय चाललें आहे हें जाणण्याची उत्कंठा असते; तथापि वाचतां येत नसल्याने त्यांचा जगाशीं संबंध तुटलेलाच असतो. अशा खेडुतांना रात्रीच्या वेळीं अर्धा-एक घंटा ग्रंथालयांत जमवून वर्तमान-पत्रांतील माहिती वाचून दाखविण्याचें अथवा रेडिओवरून ऐकविण्याचें पवित्र कार्य ग्रंथालयांना करणें शक्य आहे.

६. शेतीस लागणारीं बी–बियाणें, वेगवेगळ्या प्रकारचे नांगर, गुरें यांचीं प्रदर्शनेंही मधून मधून ग्रंथालयांच्या मार्फत भरवावीं त.

केवळ ग्रंथालयें स्थापून अशिक्षित जनता 'साक्षर' करता येणें शक्य नाही, तर त्यासाठी पहिलीं कांही वर्षें ग्रंथालयांच्या द्वारें वरील पद्धतीचें कार्य झालें पाहिजे. असें करतां करतां अशिक्षित जनतेला अधिक अधिक ज्ञान मिळविण्याची हौस वाटूं लागेल. आपणा स्वतःस लिहितां वाचता आल्यास आपण अधिक माहिती मिळवून अधिक उत्कृष्ट तऱ्हेचें पीक काढूं शकूं असें त्यांना वाटूं लागलें म्हणजे त्या दृष्टीने ते प्रयत्न करूं लागतील व त्या प्रयत्नांत यशस्वी झाले म्हणजे त्यांना ग्रंथालयांची ओढ लागेल.

## ही प्रचंड शक्ति सन्मार्गी लावा!

आतापर्यंत आपण खेडेगावांतील अशिक्षित जनतेला कोणत्या प्रकारें 'साक्षर' करतां येईल याचा विचार केला. यानंतर शहरांतील गिरण्या, कारखाने इ. मोठमोठ्या औद्योगिक व इतर सहकारी संस्थांत काम करणाऱ्या 'निरक्षर' कामगारांना 'साक्षर' कोणत्या पद्धतीने करतां येईल याचा आपण थोडक्यांत आढावा घेऊ. कामगारवर्ग दिवसेंदिवस जागृत होत असून त्याचें भवितव्य उज्वल आहे. आपल्या एकजुटीची व शक्तीची या वर्गाला हळूहळू जाणीव होत चालली आहे. परंतु ही प्रचंड शक्ति साक्षरतेच्या अभावीं कुचकामी ठरण्याचा संभव आहे. तेव्हा त्या संस्थांच्या किंवा कारखान्याच्या चालकांवर वरील प्रमाणे ग्रंथालयामार्फत **प्रत्येक कामगार साक्षर झालाच पाहिजे असें बंधन सरकारने घातलें पाहिजे.** म्हणजे निरक्षरांचा बराच मोठा भाग लवकरच 'साक्षर' झालेला पाहावयास मिळेल. पाश्चात्य देशांतील कामगार हा 'साक्षर' असतो. जेवणाच्या सुट्टींत तो एखादें वर्तमानपत्र किंवा छोटेसें पुस्तक चाळल्याशिवाय राहावयाचा नाही. इतर कामगार वेगवेगळ्या विषयांवर चर्चा करतांना आढळतील. त्यांना आपल्या हक्कांची मर्यादा माहीत असते. पाश्चात्य देशांतील ग्रंथालयें कामगार संघांशीं संबध जोडून संघाच्या सभासदांत ग्रंथाविषयीं आकर्षण निर्माण करण्यासाठी प्रदर्शन, व्याख्यानें, रेडिओ इ० अनक साधनांचा उपयोग करतात. अशा प्रकारचें कार्य आपल्या ग्रंथालयांनी हातीं घेतल्यास 'साक्षरते'च्या कामीं त्याचा बराच उपयोग होईल. परंतु याला जनतेंतील सुबुद्ध लोक व कर्तव्यदक्ष सरकार यांचें कर्तव्यनिष्ठ सहकार्य हवें. आणि हें स्वतंत्र भारतांत मिळेल अशी मी अपेक्षा करतों.

---

# आदर्श ग्रंथालय

## माधव रामकृष्ण पटवर्धन

**परिचय**—हे बी. ए. एल्. एल्. बी. असून यांनी पुणें ग्रंथपालन वर्गाचें व वृत्तसंपादन वर्गाचें प्रशस्ति पत्र मिळविलें आहे. सध्या हे दिल्ली विद्यापीठ ग्रंथपालन वर्गाचे विद्यार्थी आहेत. प्रस्तुत निबंधाला 'मराठी ग्रंथालयांचा इतिहास' ह्या पुस्तकाकरिता ठेवलेल्या 'आदर्श ग्रंथालय कसें असावें'? या निबंध चढाओढीत पहिला नंबर मिळाला आहे.

"A good book is the precious life-blood of a master spirit"—*Milton*

"Nowadays the real university is collection of books."—*Carlyle*

## पूर्वींचीं ज्ञानोपार्जनाचीं साधनें

ग्रंथालय या शब्दाचा सरळ अर्थ ग्रंथांचें 'आलय' म्हणजे जेथे ग्रंथ ठेवले जातात तें स्थान किंवा ग्रंथांचा साठा असा आहे. ग्रंथालयाची कल्पना फार जुनी आहे. ईजिप्त, ॲसीरिया, बॅबिलोनिया, ग्रीस, रोम या देशांत प्राचीन संस्कृतींच्या काळांत उत्तमोत्तम ग्रंथालयें होऊन गेल्याचें दिसतें. अलेक्झाँड्रिया येथील ग्रंथालय सुविख्यातच आहे. भारतवर्षांत पुरातनकाळीं मुखोद्गत ज्ञानावर भर असल्याने प्रारंभीं ग्रंथालयें असल्याचा पुरावा मिळत नाही. परंतु कालान्तराने

तक्षशिला, नालंद यासारख्या विद्यापीठांतून; काशी, पैठण वगैरे धर्मक्षेत्रीं; कनोज, पाटलीपुत्र इत्यादि राजधान्यांतून ग्रंथसंग्रह केला जाऊं लागला. जैनांचीं ग्रंथभांडारें प्रसिद्धच आहेत. पेशव्यांनीहि आपल्या विविध खात्यांत ग्रंथशाळेचा समावेश केला होता. सर्फोजी महाराजांच्या ग्रंथप्रेमाची ख्याति परदेशांतहि गेली होती.

या प्राचीन ग्रंथालयांतून हल्ली ज्या स्वरूपांत आपल्याला ग्रंथ आढळतात तसे ते असत. हे जुने ग्रंथ, दगड, माती, विटा इत्यादि स्वरूपांत असत. हिंदुस्थानांत भूर्जपत्रें, ताडपत्रें, कार्पासपट यांचा वापर केला जाई. आधुनिक ग्रंथालयांत पुस्तकांबरोबरच महत्वाचीं हस्तलिखितें, ऐतिहासिक महत्वाचे कागदपत्र, थोर व्यक्तींचे पत्रव्यवहार, रोजनिशा, चित्रें, नकाशे, फिल्म्स, रेकॉर्डस्, मॅजिक-लॅटर्न, मायक्रोफिल्म्स, नाणीं इत्यादींचाहि संग्रह केलेला असतो. ज्ञान डोळ्यांनी पाहून मिळवितां येतें, तसेंच ब्रेल लिपींतील पुस्तकांतून स्पर्शानेंही प्राप्त होतें. अमेरिकेच्या कॉंग्रेस लायब्ररींत या सर्व प्रकारच्या ज्ञानसाधनांची संख्या तीन कोटींच्या घरांत आहे.

## आदर्श ग्रंथालयाच्या कसोट्या

ग्रंथालयांत कांही वाचक मनोरंजनासाठी येतात, कांही तात्कालिक उपयोगाची माहिती मिळविण्याच्या हेतूने तर कांही ज्ञानलालसेने येतात. या साऱ्या वाचकांच्या गरजा जें उत्तम प्रकारें पुऱ्या करतें तें ग्रंथालय आदर्श होय.

मनुष्याला आदर्श कोटींत बसविण्यापूर्वी आपण त्याचे गुणावगुण, विद्या, कुलशील, रूप यांकडे पाहतों त्याचप्रमाणे ग्रंथालया-लाहि आदर्श संज्ञेला प्रात्र होण्याकरता अशा अपेक्षा पुऱ्या कराव्या लागतील. ग्रंथालयांचे राष्ट्रीय, विद्यापीठ, शालेय, औद्योगिक,

वृत्तपत्रीय इत्यादि अनेक प्रकार संभवतात. यांपैकी कोणतें एखादें विशिष्ट ग्रंथालय आपल्या डोळयासमोर ठेवावयाचें नसून ग्रंथालयांच्या अंगोपांगासंबंधी सर्वसामान्य विवेचन येथे अभिप्रेत आहे.

## इमारत

'आलया'चा विचार करतांना प्रथम हें ध्यानांत घेतलें पाहिजे की ग्रंथालयाची जागा वाचकांच्या आटोक्यांतील हवी. वाचनालय वाचकांना सोयीस्कर ठिकाणीं नसेल तर वाचकांचे पाय सहजा सहजी तिकडे वळणार नाहीत. पुण्यांतील पुणें विद्यापीठाचें ग्रंथालय गणेश-खिंडींत शहरापासून फार लांब असल्यामुळे विद्यार्थी फार संख्येने तिथे उपस्थित नसतात. उलट नगरवाचनमंदिर किंवा महाराष्ट्र ग्रंथालय राजपथावरच असल्यामुळे वाचकांची तिथे नेहमीच गर्दी आढळते. लिफ्टची सोय नसल्यास शक्य तों ग्रंथालय वरच्या मजल्या-वर असूं नये. वाचनाने मानसिक शीण येण्याच्या अगोदरच वाचकांवर शारीरिक श्रमामुळे धापा टाकण्याचा प्रसंग न येणें चांगलें. ग्रंथालयांत डोळयाचें काम असल्यामुळे प्रकाशाची सोय हवी. डोळयांना त्रास होऊं नये म्हणून भिंतींनाहि फिकट हिरवा वा निळा रंग देण्यांत यावा. त्याप्रमाणे मानसिक श्रमाचें काम करणाऱ्या वाचकांच्या सुखाकरता ग्रंथालयांतील एकंदर वातावरण सुप्रसन्न, अभ्यासास अनुकूल असें असलें पाहिजे. ग्रंथालयांत खेळती हवा यावयास हवी, परंतु जोराचा वारा व पावसाचा मारा यांपासून संरक्षण हवें. ग्रंथालयांत पाखरांना निवास मिळतां कामा नये आणि ढेकूण, डास, चिलटें यांनाहि थारा देतां कामा नये. या कृमिकीटकापासून, व पक्ष्यांपासून किती उपद्रव होतो याची प्रचीति 'याचि देहीं, याचि डोळां' प्रस्तुत लेखकाला अनेक ग्रंथालयांतून आलेली आहे.

मुंबईतील U. S. I. S. चें ग्रंथालय कोणालाहि आदर्श वाटण्यासारखें आहे. तेथल्याप्रमाणे air conditioning ची सोय तर हिंदुस्थानां-तील कोणत्याच अन्य लायब्ररींतून आढळत नाही.

ग्रंथालयासाठी नव्यानेच इमारत बांधावयाची असेल तर आधुनिक रचनाकार, हुशार स्थापत्यविशारद, अनुभवी ग्रंथपाल यांचा सल्ला घेतला जावा. मद्रास विद्यापीठाच्या ग्रंथालयाची इमारत तेथील माजी ग्रंथपाल रा. सा. डॉ. रंगनाथन् यांच्या गैरहजेरींतच त्यांच्या सल्ल्याशिवाय बांधली गेली. इमारतीचा विस्तार पुढेमागे करावा लागेल ही गोष्ट प्रथमपासून ध्यानांत घेतली पाहिजे. काँग्रेस लायब्ररीच्या इमारतींत कैक वर्षे नवीं पुस्तकें येत राहिलीं तरी त्यांचा साठा करतां येणें शक्य होईल असें प्रारंभीं वाटलें होतें. परंतु अनुभवान्तीं ती कल्पना चूक ठरली. सोळा वर्षांत पुस्तकांची संख्या दुप्पट होते असा अमेरिकेंतील ग्रंथालयांचा अनुभव आहे.

**ग्रंथालयांच्या इमारतींत सौंदर्य, उपयुक्तता, टिकाऊपणा यांचा संगम झाला पाहिजे.** इमारतींत जास्तींत जास्त पुस्तकांचा संग्रह कसा ठेवतां येईल व ग्रंथालयांतील एकंदर हालचाल कशी सुकर होईल याकडे लक्ष देणें जरूर आहे. मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयांत वरच्या मजल्यावर मागणीपत्रें भरलीं जातात. व शिपाई तीं गोळा करून तळमजल्यावरील संग्रहालयांत जातात. दिवसाकाठीं शंभर वेळां शिपायांना खालीवर फेऱ्या माराव्या लागत असल्यामुळे कांही वेळां वाचकांना पुस्तकें मिळण्यास विलंब लागत असल्यास नवल नाही. काँग्रेस लायब्ररींत मागणीचिठ्ठ्या व पुस्तकें यांची आवक-जावक निर्वातनलिकांतून अल्पावधींत होत असते.

या इमारतींत देवघेव, नियतकालिक, वाचनालय, अध्ययन, संग्रह, बांधणीखातें, कचेरी इत्यादि विभाग असावेत. बडोद्याच्या

मध्यवर्ति लायब्ररींत बाल व महिला वाचकांसाठी वेगळे विभाग ठेवलेले आहेत. कार्यपरत्वें होणाऱ्या व्याख्यानादि समारंभासाठी शक्य झाल्यास एखादा वेगळा हॉलहि बांधून घ्यावा. सामान्यतः देवघेव वगैरे पहिल्या तीन भागांनाच बरीच जागा लागते. नियत-कालिक विभागांत वाचकांची बरीच वर्दळ असणार म्हणून तो विभाग प्रथम दर्शनींच इतरांपासून जरा अलिप्त असावा. सामान्य वाचकांपासूनहि संशोधनासाठी वगैरे येणाऱ्या अभ्यासकांची वेगळी सोय करणें इष्ट असतें. कलकत्त्याच्या इंपीरियल लायब्ररींत अशी व्यवस्था आहे. ब्रिटिश म्युझिअममध्ये अभ्यासिका (कॅरेपल) असून तेथे वाचकाला लेखनसाहित्यहि पुरविलें जातें. कपाटांच्या समांतर रांगांतून पडदे लावून फर्ग्युसन कॉलेजांतीलप्रमाणे वाचकाला जरूर तो एकांत मिळूं देणें शक्य होतें. परंतु अशा 'खोल्या' मुक्तद्वार ग्रंथालयांत निरुपयोगी ठरतात. मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयांतील वाचनविभागांत प्रत्येक टेबलापाशीं विजेचा दिवा असून त्याला तिथेच 'स्विच्' असतें. ही प्रथा खचितच उल्लेखनीय आहे.

## फर्निचर

हल्लीच्या शास्त्रीय युगांत फर्निचरचेंहि एक तंत्र झालें आहे. खुर्च्याच पाहूं गेलें तर भोजनगृहांतील, दिवाणखान्यांतील, बागेंतील खुर्च्या वेगवेगळ्या प्रकारच्या आढळतात. ग्रंथालयांतील खुर्च्या वाचकाला सहज आळस येईल किंवा त्याचें अंग मोडून येईल अशा असून चालणार नाही. खुर्च्यांच्या तळाला रबरी चकत्या लावल्या म्हणजे त्या सरकवतांना आवाज होत नाही. पायरव कमी होण्या-करतांहि जमिनीवर काथ्याच्या चटया टाकणें आवश्यक आहे. टेबलांची उंची ३० इंचांपर्यंत असावी.

कालिकांची सोय चढत्या बैठकीच्या, लिफाफे, कागदपत्र ठेवण्यासाठी वापरतो त्या तऱ्हेच्या वरून उघडया असलेल्या कप्प्यांच्या पेटयांतून करावी. दैनंदिन वृत्तपत्रें घोडयावरून वाचण्यास ठेवावींत. हे घोडे सर्वसाधारण वाचकाच्या उचीचें मान ध्यानांत घेऊन केलेले असावेत. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत भिंतीपासून कडयांच्या आधाराने तिरप्या बसविलेल्या फळ्यांवर दैनिकें लावण्यांत येतात. भिंतींचा सदुपयोग करण्याच्या दृष्टीने ही योजना उत्तम आहे.

पुस्तकांचीं कपाटें शक्यतों दुहेरी म्हणजे मागून व पुढील बाजूंनीं पुस्तकांच्या रांगा राहतील अशीं असावीं आणि तीं भिंतीशीं काटकोनांत प्रकाश अडला जाणार नाही अशा तऱ्हेने ठेवावीं. बडोद्याच्या आणि पुणें विद्यापीठाच्या ग्रंथालयांतून दुहेरी लोखंडी शिडाळें ( हा रे इंडस्ट्रियल म्युझिअमच्या क्युरेटरांचा—श्री. घारपुरे यांचा—Shelves याला प्रतिशब्द आहे ) आहेत. आणि पुस्तकें कललीं जाऊन त्यांची बांधणी, पुठ्ठे खराब होऊं नयेत म्हणून दाबासाठी पट्टयांची सोय केलेली आहे. केसरी-मराठा ग्रंथशाळेंत यासाठी लाकडी ठोकळे वापरण्यांत येतात. या कपाटांची वा शिडाळ्यांची उंची एकसारखी व सामान्यतः सात फुटापर्यंत असावी. त्यांतील खण खालीवरती करतां येण्यासारखे असावेत. आगीपासून संरक्षण या दृष्टीने सूचिपत्रें व फायली ठेवण्याकरतांहि लोखंडी कॅबिनेटस् वापरणें चांगलें. बडोद्याच्या लायब्ररींत तर जाड काचेचें Flooring करण्यांत आलेलें आहे.

ग्रंथालयाची इमारत व आंतील रचना कशी असावी हें येथवर पाहिलें. इमारत हा ग्रंथालयाचा देह झाला. ग्रंथालयाच्या आत्म्याचा आता शोध घेऊं.

## ग्रंथसंग्रह

पुस्तकें हा ग्रंथालयाचा महत्त्वाचा घटक आहे. ग्रंथालयांत वाचक वेगवेगळ्या कारणास्तव येत असतात. प्रत्येक वाचकाच्या आवडीनिवडीहि वयोमानानुसार बदलत असतात. बालपणीं संधि मिळेल तेव्हा रहस्यकथांत गुंगून जाणारा वाचक आयुष्याच्या संधि-कालांत 'गीतारहस्य' अधिक पसंत करतो. दोन समान वयाचे युवक असले तरी एक फडक्यांची 'दौलत' उचलील तर दुसरा दौलतीचें योग्य वाटप कसें व्हावें हें समजण्यासाठी मार्क्स वाचील. ग्रंथालयांत येणाऱ्या वाचकाला त्याच्या आवडीचें पुस्तक मिळालें पाहिजे. त्याच-प्रमाणे ग्रंथालयांतील प्रत्येक पुस्तकाला वाचक असतो हेंहि तितकेंच खरें. कितीहि रुक्ष अपरिचित लेखकाचें पुस्तक असलें तरी भवभूतीची उक्ति सार्थ करण्याकरतां की काय एखादा तरी वाचक त्या पुस्त-काला पुनीत केल्यावाचून रहात नाही.

ज्ञानरूपी अश्वत्थ वृक्षाच्या शाखोपशाखा आज सारख्या वाढत आहेत.

> ' All experience is an arch wherethro'
> Gleams that untravelled world,
> whose margin fades
> Forever and forever... '

या टेनिसनच्या पद्यपंक्तीप्रमाणे ज्ञानाचीं क्षितिजें विस्तृत होत आहेत. म्हणून ग्रंथालयालाहि मर्यादा घालून चालणार नाही. तें गतिहीन (static) होतां कामा नये. वाचकांच्या सूचना, कालिकांतील अभिप्राय, प्रकाशकांच्या याद्या इत्यादींवरून ग्रंथांची निवड करून त्यांची भर सतत ग्रंथालयांत पाडत गेली पाहिजे. अर्थात् ग्रंथालय 'कुठल्या प्रकारचें आहे यावर ही पुस्तकांची निवड अवलंबून राहील.

उदाहरणार्थ, एंजिनिअरिंग कॉलेजमध्ये कायद्याच्या पुस्तकांची किंवा कादंबऱ्यांची भरती करण्यांत अर्थ नाही. परंतु सर्वसामान्यपणे ग्रंथालयाजवळ संग्राहकवृत्ति पाहिजे हें निर्विवाद.

ग्रंथालयाने संदर्भ ग्रंथांचाहि भरपूर साठा केला पाहिजे. निरनिराळया प्रकारचे कोश, वार्षिकें, who's who, गॅझेटिअर्स यांसारखे ग्रंथ अवश्यमेव आदर्श ग्रंथालयांत असले पाहिजेत. सॉक्रेटिस काय किंवा कै. डॉ. आनंद कुमारस्वामी काय यांना या externalised memory त कांही धोके दिसत असले तरी दिवसेंदिवस या संदर्भ ग्रंथाचें माहात्म्य वाढतच जाणार हें निश्चित. संदर्भ ग्रंथांचे प्रकाशकहि त्यांतील माहिती अद्ययावत ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात. आणि संदर्भ ग्रंथ नसणें ही ग्रंथालयांत मोठीच उणीव राहील.

याखेरीज ग्रंथालयाने स्थानिक लेखकांचीं पुस्तकें व स्थानिक कालिकेंहि खरेदी करून त्यांना उत्तेजन दिलें पाहिजे. स्थानिक कालिकांच्या 'फाइल्स' ठेवणेंहि बरेच वेळां इष्ट असतें.

## वर्गीकरण

ग्रंथांची जडणघडण, वेष्टण, मुद्रण, यांचें नीट परीक्षण होऊन तों ग्रंथालयांत दाखल झाल्यानंतर त्यांची व्यवस्था लावणें आवश्यक होतें. नाही तर वाचकाला हवीं असतील त्यावेळीं पुस्तकें मिळणें मुष्कील होईल. वाचकाने पुस्तक मागितलें असतां पुस्तकाऐवजीं तें आता सापडत नाही असें उत्तर मिळणें किंवा दुसऱ्या दिवशीं या असें सांगूनहि कामाच्या गडबडीमुळे वा निष्काळजीपणामुळे तें काढून ठेवलेलें नसणें यामुळे वाचक व सेवक यांचा वेळेपरी वेळ जाऊन शिवाय मानसिक व शारीरिक त्रास पदरांत पडतो. या गोष्टी टाळण्यासाठी पुस्तकांचें वर्गीकरण करावयास लागतें. वर्गीकरण म्हणजे वस्तूंच्या

साधर्म्यानुसार, कल्पनांच्या साहचर्यानुसार केलेली विभागणी होय. आपल्या घरातलीच गोष्ट घ्या ना. आपण आपल्या वेषभूषेचीं साधनें नि स्वयंपाकाचीं उपकरणें अलग ठेवतों. स्वयंपाकगृहांत ताटें वाट्या एकीकडे, फोडणीचें साहित्य दुसरीकडे अशी रचना आपण करतों. याच तत्त्वाची ग्रंथालयांतील अंमलबजावणी म्हणजे वर्गीकरण होय.

प्लेटोच्या काळापासून आतापर्यंत दीडशेंच्यावर वर्गीकरण पद्धति होऊन गेल्या आहेत. प्रारंभीं या पद्धति पुस्तकांचा रंग, आकार, लेखक यांवर आधारलेल्या असत. परंतु विषयवार विभागणी पुरस्कारणाऱ्या शास्त्रीय पद्धति १९व्या शतकाच्या उत्तरार्धापासून सुरू झाल्या. त्यांतील कांही ठळक म्हणजे डयूईची डेसिमल, कटर, कॉंग्रेस, डफब्राउन इत्यादि होत. परंतु या पाश्चिमात्य लोकांनी काढलेल्या पद्धतींत पौर्वात्य वाङ्मयाचा पुरेसा विचार केलेला नाही. पूर्वसूरींच्या पद्धतींतील या व इतर उणीवा दूर करण्यासाठी आपल्याकडील सुप्रसिद्ध ग्रंथपालनशास्त्रज्ञ रा. सा. डॉ. रंगनाथन् यांनी काढलेल्या कोलन वर्गीकरण पद्धतीचा अवलंब ग्रंथालयांनी केला पाहिजे.

कोलन पद्धतींतल्याइतके ज्ञानाचे भाग, पोटविभाग इतर कुठल्याहि अन्य पद्धतीने पडत नाहीत. या पद्धतीने आधारसूचि, शब्दसूचि, चरित्र, संग्रह, वेचे, टीका या क्रमांनी पुस्तकें एकत्र जमा होतात. एखाद्या विषयावरील सारीं पुस्तकें भाषावार वेगळीं होतात. एका भाषेंतील पुस्तकें कालक्रमाने लागतात. आणि ग्रंथांचे खंड एका ठिकाणीं येतात.

कोलनची सूक्ष्म वर्गीकरणपद्धति संशोधनाला वाहिलेल्या ग्रंथालयांना फारच उपयुक्त आहे. कारण या एक प्रकारच्या सांकेतिक लघुलिपींत पुस्तकाचें अंतरंग बरोबर उमटलेलें असतें. परंतु भारत इतिहास संशोधक मंडळाच्या ग्रंथालयांत संस्थेच्या नांवांतील अक्षरेंच

वर्गीकरणासाठी उपयोगांत आणलेलीं दिसतात. कोलन पद्धति सूक्ष्म असल्यामुळेच ती किचकट आहे व सर्वसामान्य ग्रंथालयाला ती कामास येत नाही अशी टीका केली जाते. परंतु ती बरोबर नाही. कारण या ग्रंथालयांनाहि ही पद्धति जास्त खोलांत न जातां स्थूल ढोबळ स्वरूपांत वापरतां येणें शक्य आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास या सरकार व दत्त यांच्या पुस्तकाला V 2 : I : No 111 G7 एवढा नंबर देण्याएवजी सर्वसामान्य ग्रंथालयाला V2 :1/सरकार असा नंबर पुरे होईल. ग्रंथालयांत एकसारखी पुस्तकांची भर पडत असते. वर्गांक व प्रतअंक यांनी या नवागतांचें विशिष्ट स्थान निश्चित केलें जातें. स्थलसंशोधन व संबद्धस्थल संशोधन (Location व collocation) हे वर्गीकरणाचे हेतु कोलन पद्धतीने उत्तम साधले जातात. कोलनची पद्धति अतिशय लवचिक आहे. कुठल्याहि भूत किंवा नवीन प्रकाशित होणाऱ्या पुस्तकाला योग्य नंबर देण्याची शक्ति या पद्धतींत आहे आणि म्हणून मेॅकनो सेटची या पद्धतीला दिलेली उपमा योग्यच वाटते.

## सूचिलेखन

तथापि केवळ वर्गीकरणाने भागणार नाही. वाचक व सेवक यांचा वेळ वाचावा, कार्य सुलभ व्हावें, दगदग टळावी याकरतां वर्गीकरणाच्या जोडीला सूच्याहि तयार ठेवल्या पाहिजेत. ग्रंथालयांतील संग्रहाची माहिती करून देणारे विशिष्टपद्धतीने रचना केलेलें साधन म्हणजे सूचि होय. दिवस, वार, सण, मुहूर्त कळण्यासाठी आपण पंचांग पाहतों. किंवा रेल्वेच्या गाडया केव्हा सुटणार, केव्हा पोचणार इत्यादि माहितीसाठी आपण वेळापत्रक पाहतों त्याप्रमाणे ग्रंथालयांतील ज्ञान-साधनांची माहिती मिळविण्यासाठी आपल्याला सूच्यांची गरज लागते. सूच्यांच्या योगें वाचकाला हवी असलेली माहिती मिळूं शकेल

की नाही हें सूचित होतें. ग्रंथालयांत येणाऱ्या वाचकाला एखाद्या विषयावर प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें हवीं असतात. परंतु वाचकाला त्या पुस्तकांविषयी सारी माहिती असेल असें नाही. त्याला कदाचित एखाद्या पुस्तकाचें फक्त नांव लक्षांत असेल. कदाचित केवळ लेखक स्मरत असेल. अमुक एका मालेंतील तें प्रकाशन आहे असें त्याच्या ध्यानांत असेल किंवा त्या पुस्तकांतील चित्रें कोणी काढलेलीं आहेत तें आठवत असेल. एवढया तुटपुंज्या माहितीवरहि त्याला हवें असलेलें पुस्तक अल्पावधींत सापडण्याकरतां सूच्या हव्यात.

ग्रंथालयांतील सूच्या वर्गीकृत असाव्या. वर्गीकृत सूच्यांत अनुवर्ग व अनुवर्ण असे दोन भाग असतात. आधुनिक पद्धतीच्या या सूचिलेखनांतील उप किंवा जोड संदर्भामुळे ( cross reference ) तर वाचकांची मोठीच सोय होते. यामुळे हल्लीच्या चलनफुगवटयाविषयीं (inflation) कांही वाचूं इच्छिणाऱ्या वाचकाला महमद तघलखाच्या वेळच्या चलनफुगवटयाबद्दलची माहिती पाहाण्यासाठी सुचवितां येतें. वृत्तपत्रासंबंधी वाचणाऱ्या वाचकाला सुदाम्याच्या पोह्यांतील मुष्टीचा आस्वाद घेण्यास सांगतां येते. वाचकाला एखाद्या विषयावर असलेलें सारें लिखाण डोळयाखालून घालण्यास मिळावें याकरतां आदर्श ग्रंथालयाने केवळ ग्रंथांच्याच नोंदी ठेवून उपयोगी नाही तर कालिकांतील, दैनिकांतील उपयुक्त महत्वाच्या लेखांच्या, चित्रांच्या, नकाशांच्याहि नोंदी करून ठेवल्या पाहिजेत.

ग्रंथालयांच्या आपआपसांतील देवघेवीच्या दृष्टीनेहि सूच्यांचें महत्व फार आहे. विशिष्ट विषयावरील सूच्या अभ्यासकांना उपयुक्त असतात. अशा अभ्यास सूच्या ग्रंथालयाने ठेवणें इष्ट आहे. या बाबतींत 'यूनेस्को'चें चाललेलें कार्य अभिनंदनीय आहे. रॉय, मेहेरअल्ली यांनी दोन पुस्तकें तयार केलेलीं आहेत त्यांत विद्यार्थ्यांनी वाचण्यासारख्या

पुस्तकांची यादी दिलेली आहे. अशीं पुस्तकेंहि ग्रंथालयाने जवळ बाळगावीं. सूच्यांचें हें महत्व पाहतां एका प्राचीन लेखकाने सूच्यांविषयीं the thread of Ariadne through the labyrinth असें म्हटलें आहे तें यथार्थ वाटत नाही काय ?

या सूच्या पत्ररूपांत करून कॅबिनेटस मध्ये ठेवणें सर्वांत उत्तम. तथापि जागा व खर्च यांत बचत करण्याकरतां सुट्या पानांच्या सूचीचाहि (sheat catalogue) अवलंब करण्यास हरकत नाही. वह्यांतून विस्तृत रीतीने विविध तऱ्हेच्या नोंदी करणें शक्य होत नाही. वह्या हाताळण्यास फार बोजड वाटतात. त्यांतून कांही दुरुस्त्या करणें कठीण जातें. नवीन माहिती घालणें अडचणीचें वाटतें. कालांतराने वह्यांचीं पानें फाटतात; डागळलीं जातात. व फिरून वह्या करण्यांत श्रम, पैसा, वेळ खर्ची पडतो. वह्या व पत्ररूप सूच्या यांत वापराच्या दृष्टीने जाणवणारा सुटसुटीपणा मुंबईच्या रॉयल एशिॲटिक व विद्यापीठाच्या ग्रंथालयांना भेटी देऊन कळण्यासारखा आहे. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेज ग्रंथालयांत किंवा पुण्याच्या नगर वाचन मंदिरांत सूच्यांच्या वह्या आहेत. तेथील ग्रंथपाल तेथे अनेक वर्षे काम करीत आहेत म्हणून एखादें पुस्तक ग्रंथालयांत आहेत की नाही हें ते चटदिशीं सांगू शकतात; परंतु त्यांच्या गैरहजेरींत इतरांना पुस्तकांचा शोध करण्यांत किती यातायात पडेल याचीहि कल्पना करतां येण्यासारखी आहे.

जातांना येथे हेंहि सांगून टाकण्यास हरकत नाही की ग्रंथालयाने दाखलनोंदीहि पत्ररूपांतच ठेवाव्या. सूच्यांच्या बाबतींत पत्राचे जे फायदे आहेत ते येथेहि मिळतात. शिवाय वार्षिक ग्रंथ मोजणीच्या वेळीं दाखलपत्रकामुळे काम फार सुकर होतें. गुप्तचरांचें खातें ज्याप्रमाणें कांही व्यक्तिविषयक आवश्यक नोंदी करून ठेवत असतें त्याप्रमाणें ग्रंथालयांत येऊन दाखल होणाऱ्या पुस्तकांचा इति-

हास थोडक्यांत ग्रथित करण्याचें साधन म्हणजे दाखलपत्रकें होत. ग्रंथालयांत आजतागायत किती खरेदी झाली, चालू मितीस किती पुस्तकें आहेत, संग्रहाची छापील किंमत किती, इत्यादि गोष्टी दाखल नोंदीवरून कळतात.

## ग्रंथपाल

विश्वाचा पसारा पाहिल्यानंतर साहजिकच जगन्नियंत्याची कल्पना आपल्या मनांत येते. ग्रंथालयाचा पसारा सुव्यवस्थित करण्यासाठी, तेथील कारभार सुरळीत चालण्यासाठी ग्रंथपाल हवा. ग्रंथपाल आपल्या कामांत तंत्रज्ञ हवा. विशिष्ट ज्ञानशाखेला वाहिलेलें ग्रंथालय असेल तर तेथील ग्रंथपाल त्या ज्ञानशाखेंत पारंगत असला तर तो आपली कामगिरी अधिक चांगली बजावूं शकेल. पुण्याच्या लॉ कॉलेजमधील ग्रंथपाळ एल्एल्. बी. झालेले आहेत. येथे स्थापन झालेल्या नॅशनल केमिकल लॅबोरेटरीला ग्रंथपाल एम्. एस्सी. हवा आहे. संशोधनाला वाहिलेल्या संस्थेंतील ग्रंथपालाला दोनचार परकीय भाषा येत असल्या तर फारच चागलें. ग्रंथपालाच्या अंगीं आपल्या हाताखालच्या माणसांना नीट वागवून घेण्याचें कसब हवें. ग्रंथ हे उपयोगासाठी आहेत हें तत्त्व त्यांच्या अंगी बाणलेलें पाहिजे. ग्रंथ वाचल्याने त्यांचा कायापालट होतो म्हणून ते कपाटांतच रहावे असें इच्छिणारा ग्रंथपाल त्या पदवीस लायक टरत नाही. केवळ स्वार्थाचा पुतळा बनून राहण्यापेक्षा कांही ध्येय निश्चित करून त्या ध्येयासाठी देह झिजेतों आटापिटा करणें यांत नरदेहाचें सार्थक आहे, असें बर्नार्ड शॉने म्हटलें आहे. पुस्तकाचें सार्थक तें वाचलें जाण्यांत आहे. वाचून तें जुनेंपुराणें होण्यांत, फाटलें जाण्यांत आहे. एका काळीं पुस्तकें जमवून सांभाळण्यांतच भूषण मानलें जाई. अजूनहि कांहीजण पोस्टाच्या तिकीटा-

प्रमाणे पुस्तकें जमविणें हा एक छंद मानतात. तीं पुस्तकें कधी ते उघडून बघतील असें नसतें. हैद्राबादच्या एका धनाढय गृहस्थांचें खासगी ग्रंथालय प्रसिद्ध आहे. परंतु त्यांतील ग्रंथांच्या निवडींत कांही विशेष दृष्टि दिसून येत नाही. मध्यंतरींच्या काळांत वाचकांनी मागितलीं तर त्यांना पुस्तकें द्यावयाचीं असा दृष्टिकोण आला. परंतु आजच्या ग्रंथपालांत विक्रेत्यांची वृत्ति पाहिजे. आपल्या ग्रंथालयांतील पुस्तकें वाचलीं जावींत, तीं वाचकांच्या नजरेंत कशीं भरतील याची चिंता त्याला एखाद्या उपवर मुलीच्या पित्याप्रमाणे लागली पाहिजे. वाचक आणि ग्रंथ यांची गाठभेट घालून देण्याचें त्यांच्याकडे आलेलें आहे.

याच दृष्टीने एका परीने संदर्भ ग्रंथपालाच्या कार्याचें महत्व आहे. ग्रंथपाल हा कारभाराच्या दृष्टीने कार्यक्षम असला पाहिजे. तर संदर्भ ग्रंथपालाची योग्यता त्याच्या विद्वत्तेवर ठरेल. संदर्भ ग्रंथपाल हा बहुश्रुत असला पाहिजे. कांही ज्ञानशाखांत तो प्रवीण असावा व इतर ज्ञानशाखांशीं त्यांची तोंडओळख असावी. अर्थात एकच माणूस सर्वज्ञानी असूं शकेल हें शक्य नाही. परंतु वाचकाला हवी असलेली माहिती कशी, कुठे मिळूं शकेल यासंबंधी त्याला मार्गदर्शन करतां येईल. पोस्टमनला लोकांचे पत्ते माहित असतात. त्यांच्या स्वभावाविषयी वगैरे तो बहुधा कांही सांगूं शकणार नाही. संदर्भ ग्रंथपालाचेंहि असेंच आहे. त्याला ज्ञानाचे पत्ते ठाऊक असले म्हणजे पुरे; ग्रंथालयांतील पुस्तकें वाचून त्यांच्या प्रस्तावना, अनुक्रमणिका वाचून जरूर तीं टिपणें काढून तो वाचकांना सहाय्य करूं शकेल. एखाद्या विषयावर कोणाचें कांही वाचन चालू आहे असें दिसल्यास तो आपण होऊन कांही पुस्तकें, लेख त्या वाचकाच्या नजरेस आणील. संदर्भ ग्रंथपाल हा कपाळाला आठया घालून, मारक्या म्हशीच्या नजरेने

बघणारा माणूसघाण्या स्वभावाचा असून चालणार नाही. तर तो मन-मिळाऊ, वाचकाला सहज विश्वासांत घेणारा असावा. त्याच्याकडे लोकांनी न कचरतां आपल्या शंका, अडचणी निवारण करण्याकरिता जावें, म्हणून ग्रंथालयांत 'संकोच करूं नका' 'हवें असेल तें जरूर मागा' असे फलक लावणें उपयुक्त ठरतें. संदर्भ ग्रंथपालाने वेळ पडल्यास इतर ग्रंथालयांच्या मदतीने, बाहेरच्या लोकांशीं जरूर तर पत्रव्यवहार करून वाचकांना मदत केली पाहिजे. हुशार संदर्भग्रंथपाल प्रसंगपरत्वें त्याच्या-कडे लोक विचारावयास येतील या अपेक्षेने कांही माहिती अगोदरच तयार करून ठेवील. उदाहरणार्थ, एखाद्या व्यक्तीचें निधन झाल्यास त्या व्यक्तीविषयींची माहिती तो गोळा करील. पुण्यांतील एका वर्तमान-पत्रांत—जिथे कांही समाजवादी व्यक्ति काम करतात—साने गुरु-जींच्या निधनानंतर निघालेल्या अंकांत त्यांचें वय निधनसमयीं ४५ वर्षें होतें असें छापून आलें. हा प्रकार संदर्भ सहाय्याची सोय असती तर घडला नसता.

पाश्चिमात्य देशांत ग्रंथपालाचें काम फार मानाचें समजलें जातें. अमेरिकेंतील येल युनिव्हर्सिटीने कांही ग्रंथपालांना सन्मानदर्शक पदव्या दिलेल्या आहेत. कॉंग्रेस लायब्ररीचे ग्रंथपाल डॉ. एव्हन्स, युनेस्कोचे सभासद आहेत. वर्गात जाऊन व्याख्यानें ऐकण्यापेक्षाहि तज्ज्ञ ग्रंथ-पालाच्या मार्गदर्शनाखाली लायब्ररींत प्रवेश होणें विद्यार्थ्याला फायदेशीर असतें असें क्विलर कूचने लिहिलें आहे. आपल्याकडे अजून तसे ग्रंथपाल नेमण्याचेंहि महत्त्व ओळखलें जात नाही. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजने महाराष्ट्राला 'ग्रंथालयशास्त्राचा ओनामा' शिकविणाऱ्या श्री र. श. पारखींना ग्रंथपाल नेमलेलें आहे. परंतु एल्फिन्स्टन व गुजरात कॉलेज या सरकारी कॉलेजांच्या ग्रंथालयांतून वसतिगृहांचे अधिकारीच (superin-

tendent) ग्रंथपालाचें काम करतांना आढळतात. अशा परिस्थितींत संदर्भग्रंथपालाचा शोध संदर्भग्रंथातच करण्याची पाळी आल्यास नवल काय? नाही म्हणावयाला मद्रास विद्यापीठाच्या लायब्ररींत श्री. सुब्रम् हे संदर्भग्रंथपाल म्हणून नेमले गेले आहेत. ब्रिटिश म्युझिअममध्ये निरनिराळ्या विषयांवरचे तज्ञ वाचकांना मदत करीत असतात.

ग्रंथपालाच्या दिमतीस असलेला दुय्यम सहाय्यक वर्गहि ग्रंथालय शास्त्राशीं थोडाबहुत परिचय असलेला पाहिजे. हे सहाय्यक उत्साही, कर्तव्यदक्ष, चुणचुणीत, कार्यतत्पर असावे. ग्रंथालयांत चांगला नोकरवर्ग ठेवतांना पैशाची काटकसर करून चालणार नाही. सेवकवर्गावर होणारा खर्च अनाठायीं न ठरतां फायदेशीरच ठरतो असें आनील वेनेटनें मत व्यक्त केलें, त्याच्याशीं कोणीहि सहमतच होईल.

## वाचकवर्ग

वाचक हा ग्रंथालयाचा आणखी एक महत्त्वाचा घटक आहे. या तिन्हींशिवाय ग्रंथालय हें आपल्या नामाभिधानास पात्र होऊं शकत नाही. यासाठी यांच्या युतीला इलेक्ट्रो मॅग्नेटची उपमा देण्यात आली आहे. लोखंड, तार व विजेचा प्रवाह या तिन्ही गोष्टी एकजीव झाल्या की इलेक्ट्रो–मॅग्नेट तयार होतो. एरव्हीं नाही. त्याचप्रमाणें ग्रंथ, ग्रंथपाल व वाचक यांच्यामुळे ग्रंथालयाची सिद्धता होते. वास्तव वाचकांसंबंधींहि थोडा विचार करणें क्रमप्राप्त होतें.

वाचकांकरतां साऱ्या सुखसोयी ग्रंथालयाने करावयाच्या असतात. परंतु हक्काचीच दुसरी बाजू ज्याप्रमाणे कर्तव्य, त्याप्रमाणे या सुखसोयी उपभोगतांना वाचकांनाहि कांही जबाबदाऱ्या पार पाडावयाच्या असतात. यांपैकी मुख्य म्हणजे त्यांनी ग्रंथालयांतील नियमांचें

पालन केलें पाहिजे. 'नियमन मनुजासाटी जाणा' या उक्तींत कांही सत्य असलें तरी कांही मूलभूत आवश्यक नियमांचें पालन करण्यांत कुचराई होऊं लागली की ग्रंथालयांत 'बेबंदशाही' निर्माण होण्यास कालावधि लागत नाही. येथील नगरवाचनमंदिराने सभासदांनी ओळखपत्रें लायब्ररींत येतांना जवळ बाळगावीं असा नियम केला; परंतु यांत 'मानापमाना'चा प्रश्न निघून तो नियम अखेर कागदोपत्रींच राहिला आणि त्याचा फायदा वर्गणीदार नसलेल्यांना वाचनालयांत येण्या-साठी मिळाला.

वाचकांनी कांही नैतिक जबाबदाऱ्याहि पाळल्या पाहिजेत. कांही वाचक लायब्ररीचीं पुस्तकें निष्काळजीपणें वापरण्याचा अगदी पण केल्यासारखे वागत असतात. हे वाचक ग्रंथालयांतून आणलेलीं पुस्तकें उशाखाली घेतील, त्यांतील मागलीं पुढलीं कोरीं पानें काढून घेतील, चहाचा कप ठेवण्यासाठी बशीसारखाही त्यांचा उपयोग करतील. ब्रिटिश पार्लमेंटला बाईचा बुवा व बुवाची बाई करणें एवढी गोष्ट सोडून 'कर्तुमकर्तुम्' शक्ति आहे असें म्हणतात. या वाचकांचें इतर कर्तृत्व कांहीही असलें तरी पुस्तकांतील चित्रांच्या बाबतींत पार्लमेंटला असाध्य असलेली गोष्ट करण्याची किमया त्यांच्याजवळ असते खरी. कांही वाचकांना वाचलेल्या लिखाणाविषयीं, लेखका-संबंधी आपला बरावाईट अभिप्राय पुस्तकावरच पानोपानीं व्यक्त करण्याची अनिवार्य इच्छा होते. या गोष्टी करण्याचें वाचकांनी टाळलें पाहिजे. पुस्तकांची खराबी, नासाडी, नुकसान करण्याची वा निष्काळजीपणा होऊं देण्याची वृत्ति सोडली पाहिजे. आपल्या प्रमाणे इतरांनाहि पुस्तकें वाचावयाचीं आहेत याची जाणीव ठेवली पाहिजे. थोडक्यांत म्हणजे त्यांनी सभ्य, सुसंस्कृत नागरिकासारखें वागलें पाहिजे.

ग्रंथालय जर आदर्श असेल तर वाचकहि आपोआप चांगल्या रीतीने वागूं लागतात, व्यवस्थितपणें वागण्याचें वळण त्यांना सहजच लागतें. U.S.I.S. च्या ग्रंथालयाचा असा अनुभव आहे की, अनामत रक्कम न ठेवतांहि वाचकांना बाहेर नेऊं दिलेलीं पुस्तकें त्या ग्रंथालयांत परत येतात. ग्रंथालयांतील सेवक ऐदी असले, वेळेवर पुस्तकें मिळत नसलीं किंवा नवीं पुस्तकें वाचावयास देण्यांत कांही गटबाजी, 'झब्बूशाही' असली की वाचकहि साहजिकच सारे नियम धाब्यावर बसवूं पाहतो.

ग्रंथालयाने वेळेवर पुस्तकें, कालिकें परत न आल्यास अल्पसा दंड घेण्याची पद्धत ठेवण्यास हरकत नाही. या तऱ्हेचा दंड ही कांही ग्रंथालयाच्या उत्पन्नाची बाब नसली तरी केवळ हलगर्जीपणामुळे ठराविक मुदतींत पुस्तकें परत न करण्याच्या सवयीस यामुळे आळा बसण्यास मदत होते. उलटपक्षीं मागणीहक्काची (claim system) प्रथाहि स्वीकारण्यांत आली पाहिजे. यामुळे वाचकांना पुस्तकें मिळतील अशी हमी मिळते. रॉयल एशिॲटिक सोसायटीच्या ग्रंथालयांत नवीन पुस्तकें खरेदी केलीं की तीं सभासदांच्या अवलोकनार्थ एका बुकरॅकमध्ये ठेवण्यांत येतात. या पुस्तकांवर चिठ्ठ्या डकवलेल्या असतात. त्यांत सभासद आपले हक्क क्रमाने नोंदवतात. मुंबईचेंच दुसरें एक ग्रंथालय पेटीट लायब्ररी--वाचकाला त्याने मागितलेलें पुस्तक अन्य वाचकाकडून परत आलेलें आहे, त्याने तें अमुक एका मुदतींत घेऊन जावें, असें पत्र पाठवितें. ग्रंथालयाने इतर ग्रंथालयांशीं सहकार्य करून आपल्या वाचकांना लागतील तीं पुस्तकें उपलब्ध करून दिलीं पाहिजेत. डेक्कन कॉलेज संशोधन संस्थेच्या ग्रंथालयाची मुंबई, मद्रास, कलकत्ता येथील ग्रंथालयांशीं पुस्तकांची देवाण घेवाण चालते. ग्रंथालय जास्तींत जास्त वेळ उघडें ठेवूनहि वाचकांची सोय

पहातां येते. पुण्याचें नगरवाचनमंदिर आपलें कालिकांनी समृद्ध असलेलें वाचनालय सकाळीं सहा पासून रात्रीं दहा वाजेपर्यंत उघडें ठेवतें. कांही ग्रंथालयें कमींत कमी वर्गणींत वाचकांस अनेक पुस्तकें देण्याचा प्रयत्न करतात. रॉ. ए. सो. च्या ग्रंथालयांतून एका वाच-काच्या नांवावर पंधरापर्यंत पुस्तकें देण्यांत येतात. परंतु वाचकाला ग्रंथालयांत केव्हाहि पुस्तक लागलें तर मिळावें या हेतूने सार्वजनिक ग्रंथालयांतून पुस्तकें बाहेर नेऊं न देण्याची मतप्रणाली अलीकडे मूळ धरूं पाहात आहे. आणि सार्वजनिक वा संशोधनाला वाहिलेल्या, किंवा केसरी–मराठा सारख्या वृत्तपत्रीय ग्रंथालयाच्या दृष्टीने हें मत ग्राह्य वाटतें.

## मुक्तद्वार पद्धति

आदर्श ग्रंथालय हें मुक्तद्वार ग्रंथालय असलें पाहिजे. मुक्तद्वार या शब्दाने तीन अर्थ ध्वनित होतात. ग्रंथालय स्त्रीपुरुष, सानथोर, रंक–राव या सर्वांना, सर्वधर्मीयांना, मोफत खुलें राहील असा एक अर्थ होतो. पुण्याचें प्रादेशिक महाराष्ट्र ग्रंथालय या अर्थीं मुक्तद्वार ग्रंथालय आहे. परंतु येथे जो अर्थ अभिप्रेत आहे तो open access system ला अनुलक्षून आहे. ग्रंथ व वाचक याची मन-मोकळी भेट व्हावी, कसली आडकाठी न येतां त्यांचा परिचय व्हावा, याकरितां ही पद्धत अमलांत आणणें आवश्यक आहे. शिडाळ्यांपाशीं जाऊन वाचक पुस्तकें चाळूं लागला की सहजच त्याला इतर अनेक पुस्तकांची माहिती होते. त्याला अज्ञात असलेल्या एखाद्या पुस्त-काचा शोध लागून त्याला चाळीस चोरांच्या गुहेंत शिरलेल्या अलीबाबासारखा आनंद होतो. एरवीं जी माहिती त्याला कळली नसती, ज्या ज्ञानसाधनांविषयीं त्याला केवळ सूच्यांवरून कांहीच

कल्पना आली नसती ती माहिती त्याला मुक्तद्वार पद्धतीमुळे अल्प सायासाने मिळते आणि योग्य ती कल्पना येते. आणि यामुळेच त्याला पुस्तकांची मनासारखी निवड करतां येते. केवळ वयस्थांच्या सांगण्यावरून वधूवरांनी केलेला विवाह व परस्पर परिचयानंतर केलेला विवाह यांत कितीतरी अंतर असतें, नाही का ?

मुक्तद्वार पद्धतीवर एक आक्षेप असा घेण्यांत येतो की वाचक पुस्तकांची उलथापालथ करून टाकतात, वर्गवारी अव्यवस्थित करतात. परंतु यासाठी असा नियम करतां येईल की वाचकांनी स्वतः पुस्तकें जागेवर ठेवूं नयेत. त्यांनी बघण्यासाठी, वाचण्यासाठी काढलेल्या पुस्तकांची सेवक मधूनमधून येऊन त्यांची योग्य स्थानीं स्थापना करत जातील किंवा वाचकाकरतां राखून ठेवलेली वेळ संपल्यानंतर एकदमच सेवक हें काम उरकतील यामुळे सेवकांच्या संख्येंत संस्थेला कदाचित बचत करणें शक्य होईल; कारण वाचकांना स्वतःच जाऊन आपलीं पुस्तकें घेतां येतात. आणि वाचकानाहि मागितलेलीं पुस्तकें मिळण्यासाठी ताटकळत बसावें लागणार नाही.

संदर्भग्रंथांच्या बाबतींत असें म्हणण्यांत येतें की ते मौल्यवान, वारंवार न मिळण्यासारखे असतात व लोकांच्या हाताळण्याने त्यांची स्थिति फारच अनुकंपनीय होते. विपन्नावस्थेस पोचलेल्या अशा ग्रंथांचें मनोगत 'रक्षेत् शिथिलबंधनात्, मूर्खहस्ते न दातव्यम्' असेंच कांहीसें असेल. कांही वेळां वाचकांच्या हस्तलाघवामुळे ग्रंथालयाचें अपरिमित नुकसान होतें. मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयांतील एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिकाचीं कांही पानें फाडून लांबविण्यांत आलेलीं आहेत. या कोशाचे सुटे खंड विकत मिळत नाहीत. मुंबईच्याच एका कॉलेजमधील विद्यार्थ्याने राज्यशास्त्रावरील एका पुस्तकाच्या

अनेक प्रतींतून वेगवेगळीं प्रकरणें फाडून आपल्यापुरतें स्वतंत्र पुस्तक बनविण्याचा प्रयत्न केल्याचें तेथील प्राध्यापकांनी सांगितलें. परतु यालाहि उपाय आहे. मुक्तद्वार ग्रंथालयाला आंत शिरण्याचें व बाहेर पडण्याचें एकच द्वार असावें. या द्वारापाशीं सेवकाकडून दक्षतेने नियंत्रण झालें, आणि आंतल्या बाजूस वाचकांच्या नजरेंत न येतां, त्यांना त्रास न होतां जागरूक पहारा ठेवला तर मुक्तात्म्यांचे पुस्तकें ग्रंथालयांतून मुक्त करण्याचे छंद बंद पडतील कांही मौल्यवान ग्रंथांच्या बाबतींत अपवाद करून बाकीचे ग्रंथ, आणि कांही ठोकठ स्थानिक महत्त्वाचे संदर्भग्रंथ वाचकांना 'खुले' ठेवतां येतील. ग्रंथालयाचें काम शिक्षणदानाचें आहे. तेव्हा इतकें करून ह कांही पुस्तकें चोरीस गेलीं, कांही फाटलींतुटलीं तर या तऱ्हेने होणारें नुकसान हें या शिक्षणदानाची किंमत असेंच समजलें पाहिजे.

कपाटांना दारें नसणें असाहि मुक्तद्वार शब्दाचा अर्थ होऊं शकतो. व ही गोष्टहि ग्रंथालयाला पथ्यकर अशीच आहे. कारण पुस्तकांना मोकळी हवा मिळाल्याने त्यांचें आयुर्मान वाढतें. मधून मधून पुस्तकांना सूर्यप्रकाशहि देणें आवश्यक आहे. पुस्तकांचे कसर, वाळवा इत्यादि शत्रूंपासून रक्षण करण्याकरतां डांबराच्या गोळ्या, बोरिक पावडर, तंबाखू, डी. डी. टी. इत्यादींचा वापर करण्यांत आला पाहिजे.

सुंदर कपाटांतून चांगलीं चांगलीं पुस्तकें ठेवून तीं वाचकांस देणें एवढ्यावरच ग्रंथालयाने आपल्याला कृतार्थ मानून चालणार नाही. ग्रंथालयाकडे नवे नवे वाचक आकृष्ट व्हावे, नेहमीच्या वाचकांची ज्ञानलालसा जागृत राहावी, यासाठी ग्रंथालयाने प्रयत्न केले पाहिजेत. ग्रंथालयांत वाचकांकरतां काय सोयी आहेत, किती ग्रंथ आहेत, किती कालिकें घेण्यांत येतात वगैरे गोष्टी पुस्तिकेंत किंवा पत्रकरूपाने छापून लोकांच्या नजरेसमोर

आणल्या पाहिजेत. महिन्यांतून किती वाचकांनी ग्रंथालयाचा फायदा घेतला याची संख्या महाराष्ट्र ग्रंथालय नेहमीं स्थानिक वृत्तपत्रांतून प्रसिद्धीस देत असतें. यामुळे तेथे कधी न गेलेला वाचक मनांत म्हणतो, 'आपल्यालाहि येथे एकदा डोकावून आलं पाहिजे बरं का?' आणि ग्रंथालयाकडे त्याचीं एकदा पावलें वळलीं आणि ग्रंथालय त्याला आवडलें की तो तिथला नेहमीचाच वाचक बनतो.

ग्रंथालय सधन असलें तर ग्रंथालयांत कोणतीं नवीं पुस्तकें घेण्यांत आलीं याची यादी वाचकांकडे पाठविण्यांत आली पाहिजे. किमानपक्षीं अशी यादी सूचनाफलकावर तरी लावली जावी. मद्रास विद्यापीठ लायब्ररींत पडणारी नित्यनूतन भर 'हिंदु' पत्रांतून प्रसिद्ध होत असते. रीडर्स डायजेस्ट, ऑम्निबुक या मासिकांतून, प्रसिद्ध होणारे सारांश नांवाजलेल्या पुस्तकांचे असतात. टाइम्स या साप्ताहिकांतून, न्यूयॉर्क टाइम्स या दैनिकांतून गाजलेल्या पुस्तकांचा वार्षिक आढावा येतो. या पुस्तकांचीं नांवें फलकावर लावून त्यांतील ग्रंथालयांत किती आहेत हें निर्देशित करावें. 'क्रांतिरसा' बद्दलची चर्चा चालू असतांना प्रा. के. ना. वाटवे व प्रा. रा. श्री. जोग यांचीं पुस्तकें लायब्ररींत आहेत असें वाचकांच्या निदर्शनास आणल्यास वाचकांना तें कां आवडणार नाही? प्रचलित प्रश्नावरचीं कात्रणें सूचनाफलकांवर लावणेंहि औचित्यपूर्ण ठरतें. 'सकाळ' सारख्या पत्रांतून येणाऱ्या छोटया जाहिराती, दैनंदिन पंचांग, 'टाइम्स' वगैरेंतून येणारीं कांही बोधवचनें अशा लहान लहान गोष्टी वाचकांपुढे ठेवल्याने ग्रंथालयाची कीर्ति व उपयुक्तता यांत भर पडत जाते.

थोरामोठयांच्या भेटीचे योगहि ग्रंथालयाने घडवून आणले पाहिजेत. यामुळे ग्रंथालयाची प्रसिद्धि आपोआपच होते. अधूनमधून ग्रंथालयांत प्रचलित प्रश्नांवर तज्ज्ञांचीं व्याख्यानें ठेवावीं.

या सर्व गोष्टी करून ग्रंथालयाला आदर्श पदवीस पोचण्या-करतां पैशाचें पाठबळ हवें. तत्त्वें कितीहि चांगलीं सांगितलीं तरी अखेर 'तत्त्वमसी'शींच गाठ असते. अमेरिकेंत रॉकफेलर, स्मिथरून सारखे दानशूर लोक निघाले. त्यांनी ज्याप्रमाणे कांही विशिष्ट कार्यासाठी देणग्या दिल्या, निधि स्थापले, त्याप्रमाणे अँड्र्यू कार्नेजीने अमेरिकेंत व इंग्लंडमध्ये ग्रंथालय चळवळीला चालना दिली. आपल्याकडे धनाढ्य लोक देवळें बांधण्यांत पैसा खर्च करतात. ग्रंथालयें हींहि 'पवित्र मंदिरें' आहेत हें त्यांना पटवलें पाहिजे. आपल्याकडे ग्रंथा-लयांचा माणशीं होणारा खर्च अगदीच क्षुद्र, अल्प आहे. पण आप-ल्याकडील त्यांतल्या त्यांत बरीं जीं विद्यापीठांचीं किंवा कांही कॉले-जांचीं ग्रंथालयें आहेत, त्यांतून होणारा दर विद्यार्थ्यामागील खर्चहि पाश्चिमात्य विद्यापीठांतील किंवा कॉलेजांतील होणाऱ्या खर्चाशीं तुलना करतां अगदी यःकश्चित् वाटतो. आपल्याकडील आदर्श कालिकांना जशी पैशाच्या अभावीं बंद पडण्याची पाळी येते तशी स्थिति आदर्श ग्रंथालयांच्याहि बाबतींत होण्याची भीति वाटते. मुंबई प्रांतांत सरकारने पुरस्कारलेल्या ग्रंथालय चळवळीमुळे ही परिस्थिति हलके-हलके पालटूं लागेल अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ग्रंथालयाने आपले आर्थिक व्यवहार व एकंदर दप्तर चोख ठेवणें जरूर आहे. या बाबतींत अंदाधुंदी झाली तर संस्थेचा साराच कारभार डबघाईला येऊन पोहोचतो.

वर येऊन गेलेल्या सर्व मुद्द्यांचा साकल्याने विचार करतां आदर्श ग्रंथालयाच्या व्याख्येकडे पुन्हा एकदा वळावयास हरकत नाही. ग्रंथालयशास्त्राचीं पांच मूलभूत तत्त्वें या विवेचनांत गोवलीं गेलेलीं आहेत. **तीं म्हणजे १ पुस्तकें हीं उपयोगासाठी आहेत; २ प्रत्येक वाचकासाठी पुस्तक आहे; ३ प्रत्येक पुस्तकाला वाचक आहे; ४ वाचक**

**व सेवक यांचा वेळ वाचविला पाहिजे** आणि ५ **ग्रंथालय ही वाढती संस्था** आहे, ही होत. ज्या ठिकाणीं ज्ञानप्राप्तीचीं साधनें एकत्र करून त्यांची काही विशेष पद्धतीने मांडणी करून लोकांना उपलब्ध केलीं जातात तें ग्रंथालय होय. आणि जें ग्रंथालय या मूलभूत तत्त्वानुसार चालविलें जातें, तें आदर्श ग्रंथालय !

ग्रंथालयांचें महत्त्व आजमितीस अतिशय आहे. लोकहितवादींनी आपल्या शतपत्रांत ग्रंथांवरून राष्ट्राचें शहाणपण ठरत असतें असें लिहिलें. आपल्या देशांत लोकशाहीचा प्रयोग यशस्वी होण्यासाठी, लोकांना साक्षर केल्यानंतर ती साक्षरता टिकविण्यासाठी, ग्रंथालयांची जरूरी आहे. ग्रंथ विकत घेऊन वाचण्याइतकी आर्थिक पात्रता फार कमी जणाजवळ असते. आणि म्हणून ग्रंथालयांचें अस्तित्व अधिकच आवश्यक वाटतें. साहित्यसम्राटांनी ग्रंथालयांना 'ज्ञानाचीं सदावर्तें' असें संबोधलें आहे. ग्रंथालय ज्ञानाचा संग्रह करतें आणि नवीन ज्ञानाला जन्म देतें. परदेशांतील मार्क्स किंवा आपल्याकडील भीमराव (स्मृतिकार) आंबेडकर ग्रंथालयांनीच तयार केले आहेत. ग्रंथालय मनुष्याला आपल्या फावल्या वेळाचा सदुपयोग करावयास शिकवितें. वाङ्मयाचा रसास्वाद घेण्यास शिकवून त्याच्या सहानुभूतीच्या कक्षा वाढवतें. तें मनुष्याला चांगला 'कामकरी' व कामकऱ्याला चांगला 'माणूस' बनवतें आणि साऱ्या समाजाची बौद्धिक, नैतिक व व सांस्कृतिक पातळी उंचावतें. अशा आदर्श ग्रंथालयांची हिंदुस्थानला गरज आहे. लोकांना शहाणें करून सोडणाऱ्या ग्रंथालयांचा देशांत सुकाळ होवो, अशी इच्छा प्रकट करून हा लेख येथे समाप्त करतों.

# ग्रंथालयांतील ग्रंथांची मांडणी

## विठ्ठल शंकर पारगांवकर

**परिचय—जन्म १९२६ बीड (हैद्राबाद). हे मॅट्रिक असून यांनी पुणें ग्रंथपालन वर्गाचें प्रशस्तिपत्र प्राप्त केलें आहे. यांना ग्रंथालयविषयक कार्याची बरीच आवड आहे. सध्या हे फर्ग्युसन कॉलेज ग्रंथालय, पुणें येथे सहाय्यक ग्रंथपाल आहेत.**

ग्रंथालय आणि ग्रंथालयशास्त्र या विषयावर जागरूकतेने विचार करणारी नवीन पिढी समाजामध्ये निर्माण होऊं लागलेली आहे. ध्येयाचें व व्यवहाराचें असें दुहेरी अवधान बाळगून शास्त्र तयार करणें आणि ध्येयाला शास्त्राच्या चौकटींत चपखल बसवून कार्यसिद्धि साधणें या दोन गोष्टींना महत्त्व असतें. म्हणूनच तें महत्त्व लक्षांत घेऊन जबाबदारीने प्रगतीची पाऊलवाट चालावी लागते. त्या दृष्टीने ग्रंथालय आणि ग्रंथालयशास्त्र या विषयाकडे पाहिलें तर १८०० ते १९५० पर्यंत बरीच प्रगती झाली असल्याचें दिसून येईल.

### प्रगतीचा ओघ !

ग्रंथ आणि आलय या दोन शब्दांची युति यशस्वी करून दाखविण्यासाठी किती देशांत आणि किती लोकसमूहांत जणूं कांही चुरशीने प्रगतीचे सामने जिंकण्याची अभिलाषा वाढत गेलेली आहे याची नोंद ग्रंथालयशास्त्राच्या इतिहासांत मिळूं शकते. कित्येक वेळेस तज्ज्ञ लोक वादाकरिता वाद खेळले असतील तर कित्येक वेळा विचारवंताच्या खऱ्या भूमिकेवर येऊन वादाकरिता वाद खेळण्याची बुद्धि

त्यांना लाभलेली आढळून येईल. तात्पर्य हेंच की या तात्त्विक वादविवादांतून प्रगतीला पोषण मिळून तें लोण १९५१ पर्यंत येऊन पोहचलेलें आहे.

कोणत्याही शास्त्राचा शोध लागतो तेव्हाच्या पिढीला त्या शास्त्रासंबंधीं प्रथम चमत्कार आणि कौतुक व नंतर आत्मभाव वाटत असतो. परंतु पुढची पिढी केवळ या दोन भावनांवरच विसंबून थांबण्याइतकी भाविक नसते, तर तिच्या ठिकाणीं चमत्कारावरोबरच उपयुक्ततासहाय्यक म्हणून त्याकडे पाहण्यास सिद्ध झालेली असते. या दृष्टीने दुसऱ्या पिढीने आपल्या अंगावर जबाबदारीने पुढे प्रगति करण्याचें काम घेतलेलें असतें. यावरून एक गोष्ट समजून येते ती ही की प्रत्येक पुढची पिढी ही नेहमी चिकित्सक, आदर्शवादी, उदारमतवादी आणि उपयुक्ततेची संरक्षक असणें आवश्यक असतें. ज्या ध्येयाला हे गुण लाभतील त्या ठिकाणीं प्रगतीची आशा करण्यास कांही हरकत नाही. ग्रंथालय शास्त्रासंबंधीची गेल्या दीडशें वर्षांतील अनेक राष्ट्रांनी केलेली चळवळ ही खास स्पृहणीय आहे. कुठल्याही नियमाला अपवाद असतो. तेव्हा या बाबतींतील अपवाद म्हणून भारताकडे बोट दाखवावें लागेल. कारण इतर देशांच्या मानाने भारताचीं पावलें अद्याप दोन गुढघे आणि दोन हातांचे तळवे यांच्या मदतीनेच मार्ग आक्रमीत आहेत असें म्हणावें लागतें ! ग्रंथालय व ग्रंथपालन या विषयाचीं अनेक अंगें आहेत. आणि एकेकाचा स्वतंत्र अभ्यासहि आहे.

## ग्रंथांची मांडणी

या अनेक तांत्रिक अंगांपैकी 'ग्रंथांची मांडणी' हें सर्वांत महत्त्वाचें अंग असल्यामुळे त्याचा उहापोह फार काटेकोर पद्धतीने

केलेला आढळतो. अति सूक्ष्म लक्ष्याकडे पाहण्याने डोळयांना कळ लागणारच आणि इतकेंही करून त्या दृष्टीच्या मगदुराप्रमाणेच लक्ष दृग्गोचर होईल हेंही तितकेंच निर्विवाद आहे. प्रश्न येवढाच उरतो की दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या लक्षाच्या आकृतीलाच संपूर्ण सत्य मानावें की त्या बाबतींत थोडी उदारता दाखवावी ? ग्रंथालयांतील ग्रंथांच्या मांडणीला आवश्यक असणाऱ्या वर्गीकरणाच्या बाबतींत वरील प्रश्न नेहमी उपस्थित होत असतो, तेव्हा त्याविषयीं अगोदरच निश्चित एक भूमिका कायम केलेली असली तरच वरील वर्गीकरणाचें कार्य सुलभ होईल. 'चित्रकलेचा इतिहास' या शब्दांतील केवळ शेवटच्या शब्दाचा अर्थ लक्षांत घेऊनच तें इतिहासांत जाऊं नये; 'कादंबरीची गोष्ट' ही कल्पित कथांत जाऊन चालणार नाही तर ती तंत्रविषयक पुस्तकांतच समाविष्ट झाली पाहिजे. 'कुलाब्याची दांडी' या पुस्तकाला स्थलवर्णनांत वर्गीकृत करून चालणार नाही.

## वर्गीकरण

ग्रंथालयाच्या उपयोगानुसार ग्रंथालयाचें वर्गीकरण कसें असावें हें ठरलेलें आहे. शीघ्रोपयोगाकरिता ग्रंथांच्या मांडणीसंबंधी स्थानिक गरजेनुसार विचार करावा लागतो. मांडणी वर्गीकृत असावी हें नव्याने सांगण्याची गरज नाही. वर्गीकरण हें नेहमी विषयानुक्रमें असणें आवश्यक असतें. वर्गीकरण व त्याचें कार्य हीं कांही नवीन नाहीत, तर माणूस स्वतःच्या क्षुल्लक व्यवहारांत देखील वर्गीकरणाची मदत घेतल्याशिवाय वागत नसतो. मनांतील विचारांचें वर्गीकरण, समाजांतील आचारविचारांचें वर्गीकरण, चिरकाल किंवा अल्पकाळाकरतांच आपोआप होतें. या कांहीशा गहन गोष्टीच नव्हेत तर हरघडीच्या व्यवहारांतील वस्तू, पाकगृहांतील भांडीं अशा साध्या-

सुध्या गोष्टी देखील वर्गीकृत असतात. बाहेर निघतांना चुकून देखील आपण सदऱ्याच्या खुंटीवर चप्पल शोधीत नसतों. घरांत चप्पल, चंची, सदरा, छत्री यांचा स्थानक्रम कायमचा निश्चित झालेला आहे. हाच नियम ग्रंथालयाचे बाबतींत विशेष कटाक्षाने पाळावा लागतो. ग्रंथालयांतील नियमपालनाच्या या कृतीलाच ग्रंथांचें वर्गीकरण म्हणतात. तेव्हा वर्गीकरण म्हणजे भिन्न जातीच्या व गुणधर्माच्या वस्तू एकमेकांपासून विलग करून समान जातीच्या व गुणधर्माच्या सर्व वस्तू सलग करणें, ग्रंथांचें वर्गीकरण म्हणजे ग्रंथांमधील विषयांचें वर्गीकरण करून त्याप्रमाणे प्रत्येक ग्रंथाचें ग्रंथालयांतील संग्रहगत नात्यानुसार स्थान ठरविणें. या क्रियेंत वर्गीकरण आणि मांडणी या दोन गोष्टी येतात. वर्गीकरणावाचून मांडणी अशक्य आहे तरी पण मांडणीलाच इतकें महत्व आहे की त्या त्या ग्रंथाच्या वर्गीकृत स्थानापासून ग्रंथ नजरचुकीने देखील इतर स्थानावर जाण्याने ग्रंथालयांत चांगलाच गोंधळ निर्माण होतो. नुसतें वर्गीकरणानुसार चिन्हांचें लेखन पुस्तकावर करून भागत नाही. तर त्यानुसार ठरलेली मांडणी सतत कायम ठेवावी लागते. स्थानिक मागणीच्या कमीजास्त प्रमाणानुसार कदाचित् वर्गीकरणांतील विशिष्ट वर्गक्रम बदलावा लागेल. पण त्या गरजेप्रमाणे बदललेल्या क्रमाप्रमाणे सर्व पुस्तकें त्यांच्या ठरलेल्या जागींच असणें जरूर आहे. नाहीतर 'अनाथमाधव, मालतीमाधव, राधामाधवविलासचंपू' 'चंपी आणि मोत्या,' ही मंडळी हुडकून काढणें कठीण होईल. तसेंच भट्टीकाव्य, (कोणाच्यातरी) षष्ठीचें 'काव्य' ह्या कलाकृती त्यांच्या जन्मजात जागेवरून बेपत्ता होतील. मूल नित्यपरिचित बाळगोपाळांच्या घोळक्यांतून चुकून दूरवर जाऊं नये असें मुलाच्या आईला वाटणें जसें नैसर्गिक असतें तद्वतच ग्रंथपालाची दृष्टि ग्रंथालयांतील प्रत्येक ग्रंथाच्या बाबतींत नैसर्गिक बनणें आवश्यक असतें.

## गरजेप्रमाणे फिरविलेली मांडणी

ग्रंथांची मांडणी करतांना दुसरी गोष्ट लक्षांत ठेवावी लागते ती म्हणजे फिरवलेली मांडणी ( Broken order ) होय या मांडणीचा अवलंब बहुतेक सर्व मोठ्या ग्रंथालयांतून केलेला आढळतो. ज्या ग्रंथालयांत ग्रंथसंचय मोठा असून प्रत्येक विषयावर खूप ग्रंथ असतील अशा ग्रंथालयांत वाचनाची स्थानिक गरज लक्षांत घेऊन मूळ नात्यानुसारी वर्गीकृत मांडणीचे कांही भाग विलग करून मांडणी करावी लागते. ही मांडणी बहुतांशीं वाचकांची सोय वाढविण्याच्या दृष्टीने अनुसरलेली असते. वाचकांचा व ग्रंथालयांतील सेवकांचा वेळ आणि श्रम वाचविण्याच्या दृष्टीने अशा मांडणीला महत्त्व दिलें जातें. दिवसांतून अधिकवेळा लागणारे सर्व ग्रंथ व संदर्भग्रंथ हे सर्व अशा मांडणीने वाचकांच्या समोर सोयिस्कर व ठळक जागीं ठेवतां येतात.

ग्रंथालयांत येणाऱ्या कालिकांचे बांधीव अंकही त्यांच्या मूळ नात्यानुसारी स्थानापासून विलग ठेवणें इष्ट असतें. यांत दोन हेतु असतात; कालिकांतून प्रसिद्ध होणारें वाङ्मय नैमित्तिक व प्रवाही असतें. त्याचा ग्रंथांतील वाङ्मयाशीं निकटच्या नात्याचा संबंध नसतो. म्हणून मूळ ग्रंथांपासून त्या विषयावरील कालिकांचे बांधीव अंक वेगळे ठेवले तरी विशेष बिघडण्यासारखें नसतें. दुसरें म्हणजे असें करण्याने कालिकांचा संग्रह जो सरासरी आकाराच्या ग्रंथांपेक्षा आकाराने व वजनाने मोठा किंवा बारीक असतो तो विलग ठेवला गेल्याने संग्रहाची सोय वाढू शकते.

सारांश मांडणींत जितका गरजेचा विचार, गरजेनुसार ठरलेल्या स्थानक्रमाचा विचार आणि गरज बदलते किंवा कसें याचा दूरदर्शी विचार ठेवला जाईल तितके वाचकांचे व सेवकांचे श्रम आणि वेळ वाचतील.

# संस्था-परिचय

## इंडियन लायब्ररी असोसिएशन, दिल्ली

हिंदुस्थानांत ग्रंथालय चळवळ वाढावी, ग्रंथालयशास्त्राचा अभ्यास केलेले ग्रंथपाल तयार व्हावे, ग्रंथपालांचा दर्जा सुधारावा, या तऱ्हेच्या ध्येयासाठी निघालेल्या इतर राष्ट्रांतील संस्थांशीं सहकार्य करावें इ. उद्देश डोळयापुढे ठेऊन काम करण्याकरता **इंडियन लायब्ररी असोसिएशनची** १९३३ सालीं स्थापना झाली.

स्थापना होऊन जरी दीड तपाएवढा काळ लोटला असला तरी असोसिएशनच्या खऱ्या कार्याला अलिकडेच—म्हणजे १९४९ सालीं डॉ. रंगनाथन् अध्यक्ष झाल्यानंतर—जोर चढूं लागला आहे असें म्हणावयास हरकत नाही.

सध्या असोसिएशनचे २२० सदस्य असून त्यांत ११५ व्यक्ति व इतर संस्था आहेत.

वर्षाला ५ रु. देऊन सर्वसाधारण, व एकमुठी ५० रु. देऊन असोसिएशनचे आजीव सदस्य होतां येतें. ग्रंथालयें व अन्य संस्थां-करता वार्षिक वर्गणीचे दर अनुक्रमें २५ रु. व १० रु. असे आहेत.

असोसिएशनतर्फे 'अॅब्गिला' नांवाचें त्रैमासिक चालविण्यांत येतें. (यापूर्वी एप्रिल ४२ पासून सप्टें. ४६ पर्यंत लायब्ररी बुलेटिन निघत असे. मार्च ४९ मध्ये 'अॅब्गिला' चा अवतार झाला.) यांतील 'अॅनल्स' विभागांत शास्त्रीय वरच्या दर्जाचे लेख प्रसिद्ध होतात. 'बुलेटिन' या भागांत असोसिएशन व सदस्य संस्थांविषयीं

आणि इतर कांही किरकोळ माहिती येते. 'ग्रंथालय' विभाग हिंदी-साठी राखून ठेवलेला आहे.

याखेरीज असोसिएशनने 'लायब्ररी टुअर' व 'ग्रंथ अध्ययनार्थ हें' हीं पुस्तकें प्रकाशित केलीं आहेत. ग्रंथकर्ते डॉ. रंगनाथन् असून दुसऱ्या पुस्तकाच्या बाबतींत हिंदींत रूपांतर करण्याचें काम श्री. मुरारीलाल नागर यांनी पार पाडलेलें आहे.

हिंदुस्थान व द. आशियांतील प्रमुख ग्रंथालयांतील कालिकांच्या संग्रहाची सूचि करण्याचें काम, युनेस्कोच्या द. आशियांतील शास्त्रीय विभागाच्या मदतीने व डॉ. रंगनाथनांच्या मार्गदर्शत्वाखाली, असोसिएशनने अंगावर घेतलें आहे. आणि गणित व पदार्थविज्ञान या दोन विषयांपुरती एक पुस्तिका बाहेरहि पडली असून या कार्यासंबंधी तज्ञांचीं मतें व सूचना अजमावण्यांत येत आहेत.

ग्रंथालय कौमुदी (हिंदी) व अनुवर्गसूचिकल्प (संस्कृत) हीं दोन पुस्तकेंहि प्रकाशनाच्या वाटेवर आहेत.

---

## मुंबई सरकारच्या योजनेप्रमाणे चाललेलें

# मुक्तद्वार महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें २.

मुंबई सरकारने १९३९-४० मध्ये मुंबई इलाख्याकरिता नियुक्त केलेल्या ग्रंथालयविस्तार समितीने असें सुचविलें की मुद्रक, प्रकाशकांकडून आलेल्या पुस्तकांच्या संग्रहप्रतींचें मुंबई येथे एक

मध्यवर्ती ग्रंथालय व अहमदाबाद, पुणें, धारवाड या ठिकाणीं तीन प्रादेशिक संदर्भ ग्रंथालयें म्हणून उघडण्यांत यावींत. तदनुसार १९४७ डिसेंबरच्या २१ तारखेस मुंबई इलाख्याचे मुख्य प्रधान ना. बाळासाहेब खेर यांच्या हस्तें महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय हें सार्वजनिक मुक्तद्वार ग्रंथालय उघडण्यांत आलें.

गोखले हॉलवरील प्रशस्त हॉल ही ग्रंथालयाची सध्याची जागा व सरकारने दिलेलीं सुमारें २५००० पुस्तकें हा ग्रंथसंग्रह आहे. बसण्याच्या सोयीसाठी व सुकर देखरेखीच्या दृष्टीने सध्या उपलब्ध असलेली सर्व जागा अनुक्रमें मासिकविभाग, दैनिक वृत्तपत्रविभाग, अभ्यासविभाग व शिशुविभाग ह्या चार विभागांत विभागली आहे. हे सर्व भाग नेहमी भरलेले असतात. लहान मुलें मोठ्या संख्येने ग्रंथालयाचा दररोज लाभ घेत असतात. त्यांना केवळ वाचनाचीच गोडी लागत आहे असें नव्हे तर त्यांच्यांत दिवसेंदिवस विविध विशिष्ट वाचनाची आवड उत्पन्न होत आहे. ग्रंथालय त्यांना सर्वतोपरी साहाय्य करीत आहे. या चार दालनाना प्रत्येकीं स्वतंत्र प्रवेश आहे. सर्व वाचक या विविध दालनांतील नियम व सूचना प्रथम पाहतात व त्याचें मनापासून पालन करतात. प्रत्येक भागांत बहुतेक सर्व वेळ वाचकांवर सेवकांची देखरेख असते. ग्रंथालय सकाळ संध्याकाळ आणि शनि-रविवारींही चालू असतें. वाचकांचा एकमेकांस उपसर्ग होऊं नये; आसनें, ज्ञानसाधनें आणि एकंदरीने ग्रंथालयाची मालमत्ता गैरकामीं लागू नये; ज्ञानस्थानाला न साजेसें येथे कांही घडूं नये; याबद्दल शक्य ती दक्षता घेतली जाते. येथे गप्पा मारतांना, डुलकी घेतांना, कांही करतांना कोणीही आढळणार नाही. थोड्या जागेंत भरपूर गर्दी असूनही येथील शांतता ध्यानांत रहाण्यासारखी आहे.

सरकारी योजनेने व खर्चाने हें ग्रंथालय चालत असल्याने येथे जागेच्या सोयीनुसार कोणत्याही साक्षर नागरिकाला बिनावर्गणी प्रवेश मिळतो. आणि या मुक्तद्वार सवलतीमुळेच ग्रंथालयाला अत्यावश्य अशी शिस्त येथे अमलांत आणणें शक्य झालें आहे. सरकारी नियंत्रणामुळेच ही गोष्ट अत्यंत सुलभ झाली आहे.

वाचक येऊन रांग लावून ताटकळत उभे असतात हें पाहून कोणाही पाहणारास संतोष वाटतो. कारण त्यावरून ग्रंथालयाचा उपयोग करून घेण्याची लोकांची इच्छा उत्तम तऱ्हेने दिसून येते. परंतु चालकांना मात्र त्यांच्या ताटकळण्यामुळे 'आणखी जागेची सोय कशी करतां येईल ?' याची रुखरुख वाटते.

ग्रंथालयाच्या सध्याच्या वाढत्या गरजेस हल्लीची जागा अत्यंत अपुरी आहे व ग्रंथालयाला स्वतःची स्वतंत्र इमारत लवकर न मिळाल्यास ही उणीव अत्यंत तीव्र होत जाणार आहे.

खालील आकड्यांवरून प्रशस्त जागेची निकड स्पष्ट दिसतेः-

सध्याची ग्रंथालयाची जागा—२५०० चौ. फूट.

ग्रंथालयास आवश्यक जागा—४०,००० चौ. फूट.

वाचकांची सरासरी मासिक उपस्थिति—८०००.

वाचकांचें वयोमान—६ ते ६० वर्षे.

महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय समिति ग्रंथालयाची व्यवस्था पाहते. धनंजयराव गाडगीळ एम्. ए. लिट् हे समितीचे अध्यक्ष व श्री. दि. वि. काळे, एम्. ए. समितीचे चिटणीस आहेत.

---

# कुलाबा जिल्हा वाचनालय संघ

कुलाबा जिल्ह्यांतील वाचनालयांचे कार्यकर्ते व वाचनालय प्रेमी सद्गृहस्थ यांचा एक संघ स्थापन करावा अशी कल्पना अलिबाग सार्वजनिक वाचनालयाचे त्यावेळचे सेक्रेटरी आणि मुंबईच्या मराठी ग्रंथालय संघाचे कार्यकारी सभासद श्री. कृ. के. राहाळकर यांनी काढली. अलिबाग सा. वाचनालयाचा रौप्य महोत्सव १९४६ सालीं विजयादशमीचे दिवशीं साजरा झाला. त्यावेळीं या संघाची स्थापना करण्यांत आली. जिल्ह्यांतील कार्यकर्ते या समारंभास उपस्थित होतेच, शिवाय मुंबईहून श्री. वा. वि. भट, सामंत, कोल्हटकर, धुपकर वगैरे कार्यकर्ते व पुण्याहून श्री. पारखी हे प्रसिद्ध ग्रंथालयशास्त्रज्ञ आले होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली संघाची स्थापना झाली.

संघाच्या प्रयत्नाने १९४७ सालीं गोरेगांव येथे व १९४८ सालीं महाड येथे जिल्हा ग्रंथालय परिषदा भरविण्यांत आल्या. नंतर संघाच्या कार्यकर्त्यांनी जागोजाग जाऊन वाचनालयें स्थापन करणें व असतील त्यांना उत्तेजन देऊन मार्गदर्शन करणें हीं कामें अत्यंत जिव्हाळ्याने केलीं. खेड्यांतील वाचनालयांसाठी नमुन्याची घटना, पुस्तकांची यादी वगैरे संघामार्फत वेळोवेळीं प्रसिद्ध करण्यांत आली. संघाचें कार्यकारी मंडळ १५ इसमांचें आहे. कार्याध्यक्ष श्री. वि. गो. फाटक, B. A., Dip. Lib. मुंबई हे असून कार्यवाह श्री. कृ. के. राहाळकर, शिक्षक, अलिबाग हे आहेत. कार्यकारी मंडळावर प्रत्येक तालुक्यांतून प्रतिनिधी घेतले आहेत. संघास सरकारी मदत मिळविण्याचे प्रयत्न चालू आहेत. महाराष्ट्रांत स्थापन झालेला व यथाशक्ति कार्य करणारा हा पहिलाच जिल्हा संघ आहे, असें म्हणावयास हरकत नाही.

# ज्ञानार्थं ग्रंथमंदिरम्

## ( महाराष्ट्रांतील ग्रंथालयांची माहिती )

**संक्षिप्त नामनिर्देशांचा खुलासा:**—स्था.-स्थापना, सार्व.-सार्वजनिक, वाच.-वाचनालय, रजि.-रजिस्टर्ड, मो.-मोफत, वा.-वार्षिक, दै.-दैनिक, उप.-उपस्थिति, ज. ख.-जमाखर्च.

१ अमरावती नगर वाचनालय, अमरावती— स्थापना इ. स. १८६७. या संस्थेची स्वतःची इमारत आहे. वाचनालयाच्या २ शाखा असून १ फक्त वर्गणीदारांकरता आहे व दुसरी मोफत वाचनालय शाखा आहे. वाचनालयांत ३३२१ मराठी पुस्तकें असून एकुण पुस्तकांची संख्या ७३०४ आहे. वाचनालय रजिस्टर्ड आहे. इ. स. १९५०-५१ ची वार्षिक जमा रु. ८११७ असून रु. ७७१० इतका खर्च आहे.

२ अहमदनगर वाचनालय, अहमदनगर— स्थापना इ. स. १८३८. संस्थेला स्वतःची इमारत आहे. हें सार्वजनिक व रजिस्टर्ड वाचनालय असून मोफत वाचकांकरता व वर्गणीदारांकरता याच्या निरनिराळया शाखा आहेत. वाचनालयांत २९३२ मराठी पुस्तकें असून एकूण पुस्तकांची संख्या ४६२१ आहे. इ. स. १९५०-५१ ची जमा अंदाजें रु. १५०३८ असून खर्च रु. १४००० आहे.

३ अशोक वाचनालय, मु. सातपाटी— स्थापना इ. स. १९४५. वाचनालयास स्वतःची इमारत नाही. हें सार्वजनिक वाचना-

लय असून वर्गणीदार व मोफत वाचक याकरिता खुलें आहे. एकूण ग्रंथ २१० आहेत.

४ आत्मोद्धार वाचनालय, साखळी-गोवा—स्थापना इ. स. १९१९. या संस्थेस स्वतःची इमारत आहे. हें सार्वजनिक व रजिस्टर्ड वाचनालय असून ह्यांत मोफत वाचनालय शाखाही आहे. वाचकांची दैनिक उपस्थिति ४० असते. वाचनालयांत १३५० मराठी पुस्तकें असून एकूण पुस्तकांची संख्या १५०० आहे. सरकारी वा. मदत रु. १०० मिळते. इ. स. १९५०-५१ चा वार्षिक जमा-खर्च ३१०० रु. आहे.

५ आत्मोन्नति वाचनालय, शेंदुर्जनाघाट (जि. अमरावती.)—स्थापना इ. स. १९३७. स्वतःची इमारत नाही. सार्वजनिक ग्रंथालय असून यांत मोफत वाचकांकरिताही सोय आहे. एकूण पुस्तकांची संख्या ९३५ असून इ. स. ५०-५१ चा वार्षिक जमाखर्च रु. ३०० च्या जवळपास आहे.

६ आर्यसमाज वाचनालय, उस्मानाबाद (धाराशिव)—स्थापना इ. स. १९३०. संस्थापक श्री. बापुराव गोविंदराव जगदाळे. हें आर्यसमाज ह्या संस्थेचें वाचनालय असून वर्गणीदाराव्यतिरिक्त मोफत वाचकांनाही खुलें आहे. स्वतःची इमारत नाही. ग्रंथ-संख्या ५०० असून इ. स. १९५०-५१ चा वार्षिक जमाखर्च अदमासें रु. ३०० आहे.

७ आपटे वाचन मंदीर, इचलकरंजी—स्थापना इ. स. १८७०. संस्थापक श्री. स. रा. आपटे. ह्या रजिस्टर्ड वाचनालयास स्वतःची इमारत असून रु. ७५ ची वार्षिक सरकारी मदत आहे. हें ग्रंथालय सार्वजनिक असून वर्गणीदारांव्यतिरिक्त

यांत मोफत वाचनालय शाखाही आहे. यांतील मराठी ग्रंथांची संख्या ६१४८ असून एकुण पुस्तकें ७१२५ आहे. इ. स. ५०–५१ चा वार्षिक जमाखर्च रु. २६५१ च्या घरांत जाईल. यांत दैनिक वाचकांची उपस्थिति ८५ असते.

८ उमाबाई बर्वे वाचनालय, देवगड (जि. रत्नागिरी)—स्थापना इ. स. १९४७. या वाचनालयास स्वतःची इमारत आहे. ह्यांत मोफत वाचनालय शाखा सुद्धा आहे. हें सार्वजनिक असून रु. ४५० ची वार्षिक सरकारी मदत मिळते. दैनिक वाचकांची उपस्थिती १० इतकी आहे. ह्यांत सुमारें ७५८ मराठी पुस्तकें असून एकुण पुस्तक १०८० आहेत. इ. स. १९५०–५१ चा वार्षिक जमा खर्च रु. १०६१ आहे.

९ काळेले महाराष्ट्र वाचनालय, बैतूल–(म. प्र.)—स्थापना इ. स. १९२१. संस्थापक कै. ल. चिं. कानडे. ह्या संस्थेंत एकूण १०८२ ग्रंथ आहेत. ही सार्वजनिक संस्था असून हिच्यांत मोफत वाचनालय शाखाही आहे. वाचकांची दैनिक उपस्थिती २० ते ३० आहे ह्या रजिस्टर्ड वाचनालायाचा वार्षिक जमा खर्च रु. ४५० च्या अंदाजांत आहे.

१० कर्वे महिला वाचनालय, भिलवडी:—स्थापना १९४८. संस्थापक–लक्ष्मीबाई फडके. हें महिलांकरता सार्वजनिक वाचनालय असून ह्यांत मोफत वाचनालय शाखा नाही. ह्या रजिस्टर्ड ग्रंथालयास स्वतःची इमारत आहे. ग्रंथालयांत १७८ पुस्तकें असून रु. १८ ची वार्षिक सरकारी मदत आहे.

११ कँप आणि मोदीखाना ग्रंथालय, कँप सोलापूर. स्थापना इ. स. १८७४. ह्या सार्वजनिक वाचनालयास सोलापूर नगरपालिकेची

इमारत आहे. ह्यांत मोफत वाचनालय शाखा नाही. एकूण ग्रंथसंख्या २७७८ असून मराठी पुस्तकें १८०८ आहेत. दैनिक वाचकांची उपस्थिति ५० ते ६० आहे.

१२ कस्तुरबा वाचनालय, अंकलखोप (जि. सातारा)—स्थापना इ. स. १९४६. संस्थापक श्री. वेणूताई हवालदार. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून वार्षिक १८ रु. ची सरकारी मदत मिळते. दैनिक वाचकांची उपस्थिति ५० असते.

१३ करवीर नगरवाचनमंदीर, कोल्हापूर—स्थापना इ. स. १८५०. संस्थापक—कै. कर्नल अंडरसन. ह्या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून ह्यांत मोफत वाचनालय शाखाही आहे. ह्या ग्रंथालयांत मराठी पुस्तकें सुमारें १३००० असून एकूण पुस्तकें २२२०० भरतील. इथले ग्रंथपाल ग्रंथालय विद्येचा डिप्लोमा मिळविलेले आहेत. ह्या ग्रंथालयास वार्षिक ४००० रु. ची सरकारी मदत मिळते. ह्यांतील दैनिक वाचकांची उपस्थिती सुमारें ५०० असते. इ० स. १९५०-१९५१ करतां ह्या ग्रंथालयाची जमा रु. ९००० असून खर्चहि जवळ जवळ तितकाच आहे. ह्या वर्षी ह्या संस्थेस १०० वर्षे पूर्ण झाल्यामुळे तिचा शतसांवत्सरिक उत्सवहि मोठ्या थाटाने साजरा झाला. यापूर्वीही ह्या संस्थेने आपले रौप्यमहोत्सव व हीरक महोत्सव साजरे केले आहेत. हें फार जुनें, स्थायी व भव्य ग्रंथालय असून महाराष्ट्रांतील व भारतांतील मराठी व इतर भाषांचीं प्रमुख वृत्तपत्रें इथे येतात. ह्या वाचनालयास अनेक थोर व्यक्तींनी भेटी दिल्या आहेत.

२४ कुलाबा जिल्हा वाचनालय संघ:— स्थापना इ. स. १९४६ अलिबाग वाचनालयाच्या रौप्य महोत्सवप्रसंगीं हा संघ स्थापन झाला. जिल्ह्याकरिता स्थापन झालेला हा महाराष्ट्रांतील पहिला संघ आहे.

२५ कुमार वाचनालय, ९७ यशवंतगंज, धार (मध्यभारत)—स्थापना इ. स. १९४७. हें सार्वजनिक वाचनालय येथे भरलेल्या मध्यवर्ति कुमार साहित्य संमेलन प्रसंगीं स्थापन करण्यांत आलें. हें फक्त वर्गणीदारांनाच खुलें असून यांत ७८५ पुस्तकें आहेत. दैनिक वाचकांची उपस्थिति २० असते.

२६ कारवार जनरल वाचनालय, कारवार:—स्थापना इ. स. १८६४. ह्या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून रु. १००० वार्षिक सरकारी मदत मिळते. या वाचनालयांत मोफत वाचनालय शाखाही असून मराठी पुस्तकें २९७ व एकूण ग्रंथसंख्या ५०९० आहे. दैनिक वाचकांची उपस्थिती सुमारें १०० आहे. इ. स. १९५०–५१ ची जमा रु. ७१३६ असून खर्च रु. ६०२१ आहे.

२७ काकाणी नगर वाचनालय, मालेगांव (नासिक)—स्थापना इ. स. १८६४. हें रजिस्टर्ड सार्वजनिक ग्रंथालय असून यांत मोफत वाचनालय शाखा आहे. मराठी पुस्तकें २८१७ असून एकूण पुस्तकें ४१६१ आहेत. ग्रंथालयास रु. ४५० वार्षिक सरकारी देणगी मिळते. ग्रंथालयांतील दैनिक वाचकांची उपस्थिती ७०/७५ असते. येथील ग्रंथपाल ट्रेंड असून इ. स. ५०–५१ चा वार्षिक जमा खर्च सुमारें रु. ३००० होईल.

२८ खेड नगर वाचनालय, खेड (जि. रत्नागिरी)—स्थापना इ. स. १९४७. हें सार्वजनिक रजिस्टर्ड वाचनालय असून यांत मोफत

वाचनालय शाखाही आहे. वाचनालयास स्वतःची इमारत असून त्यांत एकूण १००० ग्रंथ आहेत. वाचनालयास रु. ४५० ची वार्षिक मदत असून इ. स. ५०–५१ चा जमाखर्च रु. २५०० आहे.

१९ गोकुळेश्वर वाचनालय, चारठाणा (परभणी)—स्थापना इ. स. १९२९. संस्थापक श्री. दादासाहेब देशपांडे. वाचनालयास स्वतःची इमारत आहे. या सार्वजनिक वाचनालयात मोफत वाचनालयाची सोय आहे. एकूण ग्रंथसंख्या ५५० असून रोजची वाचकांची उपस्थिति २०–२५ असते. इ. स. ५०–५१ चा जमाखर्च २५० रु. आहे.

२० गर्दे वाचनालय, बुलढाणा -- स्थापना १९१७. ह्या सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून त्यांत २०६० मराठी पुस्तकें आहेत. एकूण पुस्तकांची संख्या ३००७ आहे. दैनिक वाचकांची उपस्थिती ३५–४० असून इ. स. १९५० ५१ ची जमा सुमारें रु. ११२४ असून खर्च रु. ७९० आहे.

२१ ग्रामपंचायत वाचनालय, दोंडाइचें (प. खान्देश)--स्थापना १९३३. ह्या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून वार्षिक सरकारी मदत रु. ४५० मिळते. यांत मोफत वाचनाची सोय आहे एकूण पुस्तकें ५२७ असून इ. स. १९५०–५१ करतां जमाखर्च सुमारें ९०० रु. आहे.

२२ गणेश धार्मिक वाचनालय, शेगांव (विदर्भ)—स्थापना इ. स. १९३४. ह्या सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून यांत मोफत वाचनालय शाखाही आहे. यांत एकूण २००० ग्रंथ असून इ. स. ५०–५१ ची जमा रु. २३०० असून रु. २१०० खर्च आहे.

२३ जनता वाचनालय, सागर—स्थापना इ. स. १९०९. या सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून त्यांत मोफत वाचनाचीही सोय आहे. यांत मराठी पुस्तकें ४०० असून एकूण पुस्तकसंख्या ५००० आहे. इ. स. ५०–५१ करतां वार्षिक जमाखर्च रु. ८०० आहे.

२४ जयहिंद वाचनालय, चांदूर बाजार (जि. अमरावती)—स्थापना इ. स. १९५०. या सार्वजनिक वाचनालयांत मोफत वाचनाची सोय आहे. यांत एकूण ३०१ पुस्तकें आहेत.

२५ जनरल लायब्ररी, बेळगांव—स्थापना इ. स. १८६८. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयांत मोफत वाचनाची सोय असून या संस्थेला स्वतःची इमारतही आहे. मराठी पुस्तकें ३१८ असून एकूण पुस्तकें ९३७ आहेत. रु ४५० वार्षिक सरकारी मदत मिळते. चालू वर्षाचा जमा रु. १२४६ असून खर्च रु. १००३ आहे दैनिक वाचकांची उपस्थिति ५० आहे.

२६ जयहिंद वाचनालय व तालुका ग्रंथालय, धामणी [पुणे]—स्थापना इ. स. १९४७. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयांत मोफत वाचनाची शाखा असून एकूण २३४ पुस्तकें आहेत. वार्षिक सरकारी मदत रु. ४५० मिळते दैनिक वाचकांची उपस्थिती ८० आहे. चालू वर्षीचा जमाखर्च रु. १००० च्या दरम्यान आहे.

२७ जैन ओसवाल भागीरथीबाई वाचनालय, जामनेर (पू. खा.)—स्थापना १९१९. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून यांत मोफत वाचनाची सोय आहे. ग्रंथपाल ट्रेंड असून एकूण ४००पुस्तकें यांत आहेत वार्षिक सरकारी मदत रु. ४५० असून दै. वाचकांची उपस्थिति ४० आहे.

२८ जंजिरा मुरुड सार्वजनिक वाचनालय, जंजिरा मुरुड (जि. कुलाबा) — स्थापना १८८२. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून त्यांत मराठी पुस्तकें १८६६ व एकूण पुस्तकें ३२६२ आहेत, वार्षिक सरकारी मदत रु. ४५० असून दै. वाचकांची उपस्थिति ८०–१०० इतकी असते. चालू वर्षीचा जमाखर्च रु. १२१० च्या दरम्यान आहे.

२९ टिळक वाचनालय, उंबरगांव–जि. ठाणें— स्थापना १९२६. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयास स्वतःची इमारत असून त्यांत मराठी पुस्तकें १२२७ व एकूण पुस्तकें २१९८ आहेत. वार्षिक सरकारी मदत रु. ४५० व दै. वाचकांची हजेरी ६० आहे. चालू वर्षीचा जमाखर्च रु. १७००च्या दरम्यान आहे.

३० टागोर वाचनालय १ मु. कवळे, पो. फोंडा (गोवा):—स्थापना १९४३. या रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालयांत मोफत वाचनाची सोय असून एकूण पुस्तकें १३५६ असून दै. वाचकांची हजेरी ५०–६० असते. चालू वर्षीचा जमाखर्च सुमारें रु. ७६० आहे.

३१ टिळक वाचनालय, बिंदुमाधव घाट, बनारस १—स्थापना १९२१. संस्थापक श्री. अण्णासाहेब नेने. या सार्वजनिक वाचनालयांत मोफत वाचनाची सोय असून मराठी १४९१ व एकूण २५३७ पुस्तकें आहेत. दैनिक वाचकांची उपस्थिति २०–२५ असून चालू सालचा जमाखर्च रु. ४५० आहे.

३२ टिळक ग्रंथसंग्रहालय, वाई (उत्तर सातारा)—स्थापना १९२९. हें रजिस्टर्ड सार्वजनिक वाचनालय; मोफत वाचनाची सोय; स्वतःची इमारत; मराठी पुस्तकें २८१६ व एकूण ग्रंथसंख्या ३८६९ असून वार्षिक सरकारी मदत रु. ४५०. दै. वाचकांची

